मराठी साहित्य परिषदेने
म.म. दत्तो वामन पोतदार पारितोषिक देऊन गौरवलेले
संताजीचे पहिले संशोधनात्मक चरित्र

# सेनापती संताजी घोरपडे

डॉ. जयसिंगराव पवार

॥ मराठीदेशा ॥
FOUNDATION
www.marathidesha.org

# सेनापती संताजी घोरपडे

लेखक : डॉ. जयसिंगराव भाऊसाहेब पवार
'शिवतेज,' १०८, सानेगुरुजी वसाहत,
राधानगरी रोड, कोल्हापूर - ४१६०११
दूरध्वनी: (०२३१) २३२२६४२

पहिली आवृत्ती : १९८७
दुसरी आवृत्ती : डिसेंबर २००८
तिसरी आवृत्ती : डिसेंबर २०१८



मुद्रक आणि प्रकाशक: मराठीदेशा फाउंडेशन
कल्पतरू हार्मनी, ई-२०५,
क्रोमा शोरूममागे, डीपी रोडसमोर,
वाकड, पुणे- ५७.
मोबाईल: ९४२१०५१८८९ /
७७९८०४४०५५
Email: marathidesha@gmail.com

मुखपृष्ठ व अंतर्गत सजावट : जयवंत दत्तात्रय फाळके
मुखपृष्ठ तैलचित्र : प्रमोद मोर्ती
मुद्रितशोधन : बाजीराव पां. जठार (कोल्हापूर)
किंमत : ३५० रुपये
ISBN No. : ९७८-८१-९२८०२८-७-९




॥ मराठीदेशा ॥
FOUNDATION
www.marathidesha.org

हिंदवी स्वराज्याच्या
या महान सेनापतीचे चरित्र
भारतीय फौजेचे शूर सेनापती,
महाराष्ट्राचे थोर सुपुत्र
**ले. जनरल एस. पी. पी. थोरात**
यांना आदरपूर्वक अर्पण...

# लेखकाचे मनोगत

स. १९६४-६५ च्या दरम्यान मी शिवाजी विद्यापीठाच्या मराठा इतिहास विभागात कुलगुरू डॉ. अप्पासाहेब पवार व डॉ. व.दी. राव यांच्या मार्गदर्शनाखाली शिवकालीन कागदपत्रांच्या संशोधनाभ्यासास सुरुवात केली. विशेषतः महाराणी ताराबाईंच्या चरित्र-साधनांचे संशोधन व संपादन आमच्या विभागात चालू होते. इतिहास संशोधन क्षेत्रातील तो माझा काल उमेदवारीचा होता. ऐतिहासिक कागदपत्रांचे संपादन करीत असता ऐतिहासिक व्यक्ती व घटना यांचे संदर्भ उपलब्ध इतिहासग्रंथांतून कसून शोधावे लागत. त्यामुळे स्वाभाविकच अनेक इतिहासग्रंथ नजरेखालून गेले. काही वाचले गेले. त्यातून एक गोष्ट मला जाणवली, की मराठ्यांच्या इतिहासातील अनेक कालखंड अद्यापि दुर्लक्षित आहेत. तसेच अनेक मोठ्या ऐतिहासिक व्यक्ती अद्यापही उपेक्षित राहिल्या आहेत. त्यांची इतिहासातील कामगिरी म्हणावी तशी पुढे आलेली नाही. अशा ऐतिहासिक व्यक्तींमधील सेनापती संताजी घोरपडे याचे उपेक्षितपण मला अधिक तीव्रतेने जाणवले.

सतराव्या शतकात छत्रपती शिवाजी महाराजांच्या खालोखाल लष्करी पराक्रम करून दाखविणाऱ्या व मोगलांना सळो की पळो करून सोडणाऱ्या मराठ्यांच्या या महान सेनापतीचे चरित्र लिहिले जाऊ नये, याचे मला त्यावेळी मोठे आश्चर्य वाटले. संभाजी महाराजांच्या हत्येनंतरच्या आणीबाणीच्या काळात ज्या संताजी-धनाजीच्या पराक्रमांनी मराठ्यांचे हिंदवी स्वराज्य रक्षिले गेले; परिणामी मराठ्यांची संस्कृती व अस्मिता रक्षिली गेली, त्या संताजी-धनाजीच्या चरित्राची

महाराष्ट्रात अशी उपेक्षा व्हावी, ही गोष्ट मला मोठी खेदजनक वाटली. आपण आपल्यापरीने काही प्रयत्न करावा व त्या थोर पूर्वजांच्या ऐतिहासिक ऋणातून थोडेबहुत तरी मुक्त व्हावे, या भावनेपोटी मी संताजीचरित्राच्या अभ्यासाकडे आकृष्ट झालो. ही सन १९६५ सालातील घटना आहे.

या सुमारास मला दोन व्यक्तींनी या कामी प्रोत्साहन दिले. प्रस्तुत संताजीचरित्र वाचकांच्या हाती देत असता त्यांचे स्मरण झाल्याशिवाय राहात नाही. त्यापैकी एक होते आमचे विभागप्रमुख डॉ. व. दी. राव. आपल्या सहकाऱ्यांच्या लहानसहान गोष्टींचेही त्यांना कौतुक असे. शाबासकीचा हात पाठीवर टाकून ते त्यास पुढचे कार्य करावयास उत्साहित करीत असत. त्यांनी मला प्रथम संताजीचरित्राचा अभ्यास करण्यास उत्तेजन दिले. त्यावेळी संताजी-चरित्रासंबंधी माझ्या ठिकाणी असा उत्साह संचारला होता, की त्या भरामध्ये मी उपलब्ध इतिहासाच्या आधारावर संताजीच्या जीवनावरील सात-आठ लेखांची एक लेखमाला 'दै. नवसंदेश'या स्थानिक वृत्तपत्रात प्रसिद्धही केली.

संताजीच्या जीवनावरील ही लेखमाला कोल्हापुरातील घोरपडे घराण्याच्या दत्तवाडकर शाखेतील श्रीमंत विश्वासराव घोरपडे यांच्या वाचनात आली. त्यांना ती इतकी आवडली, की त्यांनी माझा खास शोध घेऊन भेट घेतली आणि आपल्या घरी येण्याचे निमंत्रण दिले. त्यांच्या निवासस्थानी झालेल्या भेटीत 'तुम्ही संताजीचे चरित्र लिहा, या कामी लागेल ते सहकार्य देण्यास मी तयार आहे' असे आश्वासनही त्यांनी मला दिले. मला आठवते, की त्यानंतर त्यांच्या माझ्या अनेक भेटी झाल्या. प्रत्येक भेटीत ते संताजीबद्दल अपार श्रद्धेने व अभिमानाने बोलत असत. वास्तविक श्रीमंत विश्वासराव घोरपडे हे संताजीचे कनिष्ठ बंधू मालोजी यांच्या वंशामधील. असे असूनही त्यांना संताजीबद्दल एवढा अभिमान वाटावा, ही गोष्ट मला विशेष वाटत होती.

लवकरच मी डॉ. रावांच्या मार्गदर्शनाखाली 'सेनापती संताजी घोरपडे' हा विषय पीएच. डी. च्या प्रबंधासाठी घेतला. जानेवारी १९६६

मध्ये या विषयाची माझी पीएच. डी. साठी अधिकृत नोंदणीही झाली. आता प्रबंधासाठी ऐतिहासिक साधन-ग्रंथांतून टाचणे तयार करण्याचे माझे काम सुरू झाले. बरीच टाचणे, नोंदी तयार झाल्या; पण काही कालावधीनंतर मला असे वाटू लागले, की उपलब्ध साधन ग्रंथांतून संताजीच्या चरित्राचा प्रबंध मी करू शकेन इतकी माहिती मिळणे कठीण आहे. परिणामी माझ्या प्रबंधाचा विषय मला बदलावा लागला. छत्रपती राजाराम महाराज हा नवा विषय मी प्रबंधासाठी निवडला आणि त्या संदर्भात काम सुरू केले. यानंतर अनेक घटना घडल्या. मी शिवाजी विद्यापीठ सोडले. डॉ. रावही विद्यापीठ सोडून अमेरिकेत गेले. श्रीमंत विश्वासराव घोरपडे यांचे निधन झाले. या सर्वांतून संताजीच्या चरित्राचे काम मागे पडले.

संताजीचरित्राचे काम माझ्या हातून बाजूस पडले, तरी ते माझ्या डोक्यातून गेलेले नव्हते. आपण हे काम केव्हा तरी करायला हवे असे मला वाटत राहिले. या विचारातूनच सन १९७५ मध्ये संताजीचरित्राची एक योजना मी शिवाजी विद्यापीठास सादर केली. विद्यापीठाने या विषयाच्या संशोधनासाठी दीड हजार रुपयांचे अनुदान मंजूर केले. संताजीचरित्राच्या कामास पुन्हा गती प्राप्त झाली. उपलब्ध साधनांच्या आधारे मी संताजीचरित्र लिहून तयार केले. त्याचा अहवालही विद्यापीठास मी सादर केला. अशा प्रकारे संताजीच्या चरित्राचे पहिले हस्तलिखित तयार झाले; पण आवश्यक त्या आर्थिक तरतुदींच्या अभावी ते तसेच पडून राहिले. दरम्यान मी अनेक ग्रंथांच्या लिखाणात गुंतून राहिलो. 'महाराणी ताराबाई'हा माझा संशोधनात्मक चरित्रग्रंथ प्रसिद्ध झाला. छत्रपती राजाराम महाराजांवरील प्रबंध तयार करून तो विद्यापीठास सादर केला. इतरही काही लेखन-संपादनाची कामे हाती होती. परिणामत: संताजीच्या चरित्राची प्रकाशनाच्या दिशेने काही वाटचाल होऊ शकली नाही.

पुढे सन १९८६ साली मी माझ्या इतर कामाच्या व्यापातून बराचसा मुक्त झालो. आता मला आवडीच्या विषयावरील संशोधन-

लेखन हाती घ्यायचे होते. त्या दृष्टीने दोन महत्त्वाची कामे माझ्यासमोर होती. माझ्या पीएच. डी. च्या प्रबंधाचे मराठीत रूपांतर करून 'छत्रपती राजाराम महाराजांचे चरित्र' प्रसिद्ध करायचे हे त्यांपैकी एक होते. दुसरे म्हणजे मागे पडलेले 'संताजीचे चरित्र'. या दोहोंपैकी प्रथम प्राधान्य कुणास द्यावे, यावर माझा विचार चालू असता माझे एक सन्मित्र प्रा. आनंद वैराट यांनी संताजी-चरित्र मी प्रथम प्रसिद्ध करावे, असा आग्रह धरला. प्रा. वैराट हे गेली २०-२२ वर्षे माझे मित्र व सहकारी म्हणून राहिले आहेत. इतिहासाचे ते एक जाणकार प्राध्यापक व अभ्यासक आहेत. त्यांना या संताजी-चरित्राच्या दीर्घकाल रेंगाळलेल्या कामाचा इतिहास माहीत होता, म्हणूनच त्यांना हे चरित्र लवकर प्रकाशित व्हावे, असे वाटत होते. त्यांचा सल्ला मलाही मनोमन पटत होता.

पण १९७५ साली मी तयार केलेले संताजीचे चरित्र आता जसेच्या तसे छापणे मला योग्य वाटेना. कारण त्यानंतरच्या दहा वर्षांच्या कालखंडात मराठ्यांच्या इतिहासाची, विशेषत: १७ व्या शतकातील मराठ्यांच्या इतिहासाची, बरीच साधनसामग्री प्रकाशात आलेली होती. विशेषतः आतापर्यंत अप्रकाशित असणारी फारसी भाषेतील मोगल दरबारची बातमीपत्रे पं. सेतुमाधवराव पगडी यांनी साहित्य व संस्कृती मंडळाच्या विद्यमाने मराठीत अनुवादित करून प्रकाशित केली होती. ही बातमीपत्रे म्हणजे शिवकालीन मराठ्यांच्या इतिहासाच्या दृष्टीने अमोल असे रत्नभांडारच आहे. संताजीच्या चरित्राच्या संदर्भात ही साधने फार मोलाची ठरणार होती. संताजीच्या अनेक हालचाली व लढाया यांचा तारीखवार तपशील प्रथमच प्रकाशात येत होता. दुसरा महत्त्वाचा साधनग्रंथ म्हणजे आमचे मित्र डॉ. वि. गो. खोबरेकर यांनी महाराष्ट्र सरकारच्या पुराभिलेख विभागातर्फे प्रसिद्ध केलेला Records of Shivaji Period हा होय. शिवकालातील अनेक घराण्यांची महत्त्वाची कागदपत्रे या ग्रंथात प्रकाशित झालेली आहेत. विशेषतः संताजीचा खून म्हसवडकर माने या घराण्यातील ज्या नागोजी मानेने केला, त्याच्यासंबंधी अस्सल कागदपत्रे प्रथमच पुढे येत होती. तात्पर्य, अशा

प्रकारे नव्यानेच उपलब्ध झालेल्या साधनांचा परामर्श घेतल्याशिवाय संताजीच्या चरित्रास न्याय दिला जाणार नव्हता. त्यासाठी चरित्राचे पुनर्लेखन ही आवश्यक बाब होती.

...आणि असे पुनर्लेखन करूनच प्रस्तुत चरित्र मी वाचकांच्या हाती ठेवीत आहे. नव्याने उपलब्ध झालेल्या साधनांमुळे संताजीच्या अनेक मोहिमा व हालचाली मला देता आल्या. संताजीच्या खुनासारखी संदिग्ध घटना निःसंदिग्धपणे सिद्ध करता आली. माझ्यापरीने मी संताजीचे हे चरित्र परिपूर्ण करण्याचा नम्र प्रयत्न केला आहे. भविष्यकालात आणखी काही साधनसामग्री प्रकाशात आली, तर चरित्र नायकाच्या जीवनाचे आणखी काही पैलू उजेडात येतील. एवढेच नव्हे, नव्या साधनसामग्रीमुळे मी काढलेले निष्कर्ष बदलावे लागले तर त्याचे स्वागतच केले पाहिजे.

कोणत्याही संशोधन कार्याच्यामागे त्याचा थोडाफार इतिहास हा असतोच. या इतिहासाची आठवण कार्यपूर्तीच्या वेळी माझ्यासारख्या लेखकास होणे अपरिहार्य असते. म्हणूनच हा चरित्रलेखनाचा पूर्वेतिहास सांगण्याचा येथपर्यंत प्रपंच केला.

संताजीच्या या चरित्राचे एक महत्त्वाचे वैशिष्ट्य सांगितले पाहिजे. ते म्हणजे हे चरित्र ८०/९० टक्के शत्रूच्या गोटातील - मोगलांच्या बाजूच्या - साधनसामग्रीवर आधारित आहे. फक्त स्वकीयांच्याच साधनसामग्रीवर आधारित असे हे चरित्र लिहायचे झाले, तर ते ४०/५० पृष्ठांहून अधिक होणार नाही. याचे कारण आमच्याकडे इतिहास लेखनाची पूर्वीपासून उपेक्षा होत आलेली आहे. मराठ्यांच्या इतिहासाचा कालखंड त्यास अपवाद नाही. संताजीच्या मोहिमांचे व पराक्रमांचे वर्णन मोगल इतिहासकार आपल्या ग्रंथांत पानेच्या पाने देतात; पण आमच्याकडे या कालखंडात असे इतिहासकारच निर्माण न झाल्याने आपण स्वकीयांच्या अशा इतिहास ग्रंथांपासून वंचित राहिलो आहोत. या काळातील, म्हणजे मराठ्यांच्या स्वातंत्र्ययुद्ध कालातील, मराठ्यांच्या बाजूंवरील महत्त्वाची साधने म्हणजे जेधे शकावलीसारख्या

काही शकावल्या अथवा संभाजी महाराज, राजाराम महाराज, ताराबाई या राज्यकर्त्यांची सनदापत्रे. ही साधने अस्सल व तत्कालीन आणि म्हणूनच महत्त्वाची असली, तरी शकावलीसारख्या अथवा सनदेसारख्या साधनांमधून एखाद्या दुसऱ्या ओळीचीच माहिती आपणास मिळते.

उदाहरणार्थ, सन १६९५ साली संताजीने कासिमखान, खानाजादखान इत्यादी नामांकित मोगल उमरावांवर जो दणदणीत विजय प्राप्त केला त्याचे रसभरीत वर्णन मोगलांचे इतिहासकार खाफीखान व साकी मुस्तैदखान यांनी केलेले आहे. मोगलांच्या फजितीचे जिवंत चित्रच त्यांनी उभे केले आहे; पण मराठ्यांच्या इतिहासातील या महत्त्वाच्या लढाईसंबंधी मराठी कागदपत्रांत फक्त एक नोंद सापडते. ती अशी -'पौष शुद्ध ११. ते दिवशी संताजी घोरपडे याणी खानाजादखान व कासिमखान सिरियाजवळ डोडेरी म्हणऊन गाव आहे तेथे कैद केले. कासिमखान तर मेला. खानाजादखानास लाख रुपये घेऊन वाट दिल्ही.' ही नोंद जेधे शकावलीमधील आहे. शकावलीतील नोंदींना मर्यादा असतात हे खरे; पण संताजीच्या पराक्रमांचे वर्णन करताना अशा नोंदींनी अभ्यासकावर किती मर्यादा पडतात, हे यावरून ध्यानात यावे.

मुस्लीम राज्यकर्त्यांनी इतिहासाची उपेक्षा केली नाही. त्यांच्यापैकी बाबर, जहांगीर यांच्यासारख्यांनी आपली आत्मचरित्रेही लिहिली आहेत. महान मोगल बादशहा अकबर याच्या पदरी असलेल्या अबुल फजल या विद्वानाने लिहिलेला 'अकबरनामा' हा ग्रंथ तर सुप्रसिद्धच आहे. एवढेच नव्हे तर मोगल राजघराण्यातील स्त्रियाही या कामी मागे नव्हत्या. बाबरकन्या व हुमायूनची बहीण गुलशन बेगम हिने लिहिलेला 'हुमायूननामा' हा इतिहासग्रंथ हुमायून-चरित्राचा महत्त्वाचा साधनग्रंथ मानला जातो. मोगलकालीन इतिहास लेखकांची अशी किती नावे सांगावीत? खुद्द औरंगजेब बादशहास इतिहासाची फारशी आवड नसली, तरी त्याच्या कारकिर्दीतील साकी मुस्तैदखान, भीमसेन सक्सेना, खाफीखान इत्यादी अनेकांनी त्याची चरित्रे लिहिली. आज ती

चरित्रे केवळ औरंगजेबाच्या कारकिर्दीसाठीच नव्हे, तर मराठ्यांच्या इतिहासातील शिवाजी महाराजांपासून महाराणी ताराबाई यांच्यापर्यंतच्या राज्यकर्त्यांच्या कारकिर्दीच्या अभ्यासास अत्यंत मोलाची ठरली आहेत. उपरिनिर्दिष्ट इतिहासकारांच्या ग्रंथांशिवाय औरंगजेबाच्या कारकिर्दीतील मोगल दरबारची बातमीपत्रे आणि त्याच्या पदरी असणाऱ्या मिर्झा राजा जयसिंग, असदखान, जुल्फिकारखान, लुत्फुल्लाखान, मातबरखान इत्यादी उमरावांनी लिहिलेली पत्रे मराठ्यांच्या इतिहासाची महत्त्वाची साधने आहेत.

संताजीच्या चरित्राच्या संदर्भात अशा प्रकारची फारसी साधनसामग्री अतिशय उपयुक्त ठरली आहे. संभाजी महाराजांच्या हत्येपासून ते खुद्द संताजीच्या हत्येपर्यंतच्या सात-आठ वर्षांच्या कालात संताजी खानदेशपासून अर्काटपर्यंतच्या दक्षिणेच्या विस्तीर्ण भूभागावर आपल्या पराक्रमाने एकसारखा चमकत होता. शेकडो लहान-मोठ्या लढाया त्याने दिल्या असल्या पाहिजेत. या सर्व लढायांची माहिती या फारसी साधनांतून मिळतेच असे नाही; पण त्यापैकी बऱ्याच लढायांची, तसेच संताजीच्या अनेक हालचालींची माहिती ही साधने देतात. विशेषतः मोगल दरबारची बातमीपत्रे यासाठी फार महत्त्वपूर्ण कामगिरी बजावतात. मोगलांच्या बाजूवर ही साधने तयार झाली नसती, तर या कालखंडातील मराठ्यांचा इतिहास कालोदरात केव्हाच लुप्त होऊन गेला असता. नमुनादाखल एक उदाहरण द्यायचे झाल्यास सन १६९० साली सातारा भागात खटावच्या परिसरात लुत्फुल्लाखान या मोगल सरदाराशी संताजीने दिलेल्या गनिमी लढायांचे देता येईल. या लढायांचा वृत्तांत आपणास खुद्द लुत्फुल्लाखानाने बादशहास लिहिलेल्या पत्रांतूनच मिळतो. अन्य कोणत्याही साधनांतून या लढायांविषयी आपणास माहिती मिळत नाही. लुत्फुल्लाखानाने बादशहाला ही पत्रे लिहिलीच नसती तर आज ती आपणास उपलब्ध झालीच नसती आणि संताजीच्या या गनिमी लढाया त्याच वेळी विस्मृत होऊन गेल्या असत्या.

या फारसी साधनांचे आणखी एक वैशिष्ट्य ध्यानात घेतले पाहिजे. ते असे, की ही सर्व साधने शत्रुपक्षीयांची असल्याने ती बऱ्याच वेळी एकांगी माहिती देणारी ठरतात. अनेक प्रसंगी मराठ्यांवरील विजयांची अचूक नोंद देणारी बातमीपत्रे मोगलांच्या पराजयाची उडती बातमी नोंदविताना दिसतात किंवा अशा पराभवाच्या बातम्याच वगळून टाकतात.मोगल सरदारांची पत्रे तर आत्मप्रौढीने खच्चून भरलेली दिसतात. आपण रणांगणावर पाय रोवून कसे जिद्दीने लढलो आणि गनीम (मराठे) आपणाला घाबरून कसे पळाले, याची वर्णने ते बादशहाला लिहिलेल्या पत्रांत करतात. दुर्दैवाने आपण लढाया कशा दिल्या, याचा वृत्तांत देणारी आमच्या संताजी-धनाजीची पत्रे उपलब्ध नसल्याने (कारण त्यांनी ती कधी लिहिलीच नव्हती) आपणांस या कालातील मोगल-मराठा संघर्षासाठी शत्रुपक्षाच्या सेनानींच्या वृत्तांतांवर अवलंबून राहावे लागते. या वृत्तांतांमधील सत्य हंसक्षीरन्यायाने शोधून काढण्याची जबाबदारी अभ्यासकावर येते.

असे असले तरी शत्रुपक्षावरील साकी मुस्तैदखान, खाफीखान व भीमसेन सक्सेना या तीन इतिहासकारांचे लिखाण संताजीच्या चरित्रास मोलाचे साहाय्य करणारे ठरले आहे. या तिन्ही इतिहासकारांनी औरंगजेब बादशहाची कारकीर्द आपल्या डोळ्यांनी पाहिली होती, अनुभवली होती. तिन्ही इतिहासकार औरंगजेबाच्या दक्षिणेच्या युद्धात कमी-जास्त फरकाने हजर होते. यामुळे त्यांनी दिलेल्या दक्षिणेच्या युद्धाच्या वृत्तांतास साधन चिकित्सेच्या दृष्टीने उच्च स्थान प्राप्त होते; पण हे तिन्हीही इतिहासकार मोगल साम्राज्यवाद्यांच्या बाजूचे असल्याने त्यांना औरंगजेब बादशहाची दक्षिणेतील युद्धातील भूमिका न्यायाची वाटते आणि मराठे हे त्यांच्या दृष्टीने प्रस्थापित मोगली सत्तेच्या विरुद्ध लढणारे बंडखोर वाटतात. या साम्राज्यवादी दृष्टिकोनातूनच त्यांनी मराठ्यांच्या स्वातंत्र्ययुद्धाच्या घटनेकडे पाहिल्यामुळे त्यांचे इतिहास लेखन हे पक्षपाती निर्माण होणे स्वाभाविक होते; पण असा पक्षपाती इतिहास लिहीत असताही त्यांना मराठ्यांच्या मोहिमांची, त्यांच्या

पराक्रमाची व त्यांनी मोगलांच्या केलेल्या फटफजितींची दखल घ्यावीच लागली. तथापि अशी दखल घेत असता ते मराठ्यांसंबंधी मोठ्या संतापाने लिहिताना दिसतात. विशेषतः खाफीखान हा तर संताजीच्या लढायांची वर्णने देताना त्यास शिव्यांची लाखोली वाहतो. मोगल बादशहा व त्याचे लष्कर यांची संताजीने जी बेइज्जत केली त्यातून खाफीखानाचा संताप उफाळून येतो व तो त्यास "नालायक, हलकट, कुत्रा" या ग्रंथकाराच्या लेखणीस न शोभणाऱ्या शिव्या देतो; पण अशा शिव्या मोजल्यानंतर तोच खाफीखान संताजीच्या पराक्रमाचे वर्णन व त्याने मोगली फौजेत निर्माण केलेल्या धास्तीबद्दलही तेवढ्याच तीव्रतेने लिहितो, हे या ठिकाणी नमूद करावयास हवे.

खाफीखानाने संताजीस दिलेल्या शिव्या जशा त्याच्या प्रामाणिक संतापाच्या पोटी उत्पन्न झाल्या आहेत तशी त्याची मोगली फौजांच्या फटफजितीची कबुलीही प्रामाणिक असहायपणाच्या पोटी उत्पन्न झाली आहे. कारण खाफीखानाने संताजीच्या मृत्यूनंतर आपला ग्रंथ तयार केला असला, तरी संताजीने मोगली फौजांवर केलेले आघातच एवढे जबरदस्त होते, की त्यांच्या जखमा खाफीखानाच्या मनात त्यावेळीही ओल्या होत्या. म्हणूनच संताजीविषयी लिहिताना त्याच्या लेखणीस संयम राहत नाही; पण जेव्हा हाच खाफीखान लिहितो की -"युद्ध करण्यासाठी जिकडे तिकडे म्हणून तो नालायक आणि हलकट कुत्रा तयार होऊन जाई तिकडे तिकडे त्याचा मुकाबला करण्यास बादशहाच्या प्रतिष्ठित सरदारांपैकी एकही तयार होत नसे. जगात धडकी भरून सोडणारी फौज घेऊन तो कोठेही पोहोचला, की नरव्याघ्राप्रमाणे असलेल्या अनुभवी योद्धयांची हृदये कंपायमान होत," तेव्हा त्याचे हे लिखाण संताजीच्या चरित्रास किती मोलाचे ठरते हे या ठिकाणी आवर्जून सांगण्याची गरज नाही.

मराठ्यांच्या बाजूवर शिवकालात अशा प्रकारचे इतिहास लेखन झाले नाही, ही सर्वांत मोठी खंत आहे. दुधाची तहान ताकावर भागवणारी एखादी सभासद बखर अथवा एखादा शिवभारतासारखा काव्यग्रंथ अशी

काही साधने निर्माण झाली हे खरे; पण त्यांना मुस्लीम ग्रंथांची सर येत नाही. आपल्याकडील हे इतिहास ग्रंथ पुराणाच्या थाटावर तयार केले गेल्याचे दिसून येते. आपल्या राज्यकर्त्यांच्या कारकिर्दीचा इतिहास भावी पिढ्यांसाठी साद्यंत वर्णन करून ठेवावा, ही कल्पनाच आमच्या ठिकाणी नव्हती; असली तरी ती अगदी जुजबी स्वरूपाची होती आणि म्हणूनच छत्रपती शिवाजी महाराजांचे आद्य चरित्र म्हणून आपण जिचा गौरव करतो त्या सभासद बखरीचे लिखाण त्रोटक व सारांश स्वरूपात झाले आहे. शिवाजी महाराजांची कारकीर्द पाहिलेल्या कृष्णाजी अनंत सभासदाला साद्यंत व विस्तारपूर्वक शिवचरित्र लिहिणे काय अवघड होते? पण इतिहास लेखनासंबंधीच्या आमच्या कल्पनाच अस्पष्ट व भोंगळ स्वरूपाच्या होत्या. तेव्हा बिचाऱ्या कृष्णाजी अनंतास दोष देण्यात काय अर्थ? त्याने तेवढी बखर लिहिली हीच गोष्ट लाख मोलाची झाली, असेच शेवटी म्हणावे लागते!

शिवाजी महाराजांच्या कारकिर्दीवर निदान सभासद बखर, ९१ कलमी बखर, शिवभारत असे काही इतिहास ग्रंथ तरी निर्माण झाले; पण त्यांच्यानंतरच्या मराठ्यांच्या स्वातंत्र्ययुद्धाच्या कालखंडावर असे काही इतिहास ग्रंथच निर्माण होऊ नयेत, ही मोठी आश्चर्याची बाब म्हटली पाहिजे. खुद्द मोगल सम्राट मराठी सत्तेस नष्ट करण्यासाठी दक्षिणेत धावून येतो व त्याच्याशी मराठे एक-दोन वर्षे नाही, तर सतत २५/२६ वर्षे संघर्ष करतात, ही घटना काही सामान्य नव्हे. मराठ्यांच्या बाजूवर संभाजी महाराज, राजाराम महाराज व महाराणी ताराबाई या राज्यकर्त्यांनी व रामचंद्रपंत, प्रल्हाद निराजी, संताजी-धनाजीसारख्या कर्त्या पुरुषांनी प्रयत्नांची पराकाष्ठा करून औरंगजेबसारखा शत्रू हतबल करून टाकला व मराठी राज्याचे संरक्षण केले, हे केवढे ऐतिहासिक कार्य आहे, याची जाणीव महाराष्ट्रातील कुणा पंडिताला होऊ नये, अगर संभाजी राजाच्या हत्येने कोसळलेल्या भयानक संकटाने व या संकटावर मात करणाऱ्या संताजी-धनाजीच्या पराक्रमाने कुणा मराठी विद्वानाच्या लेखणीला जाग येऊ नये, ही मोठी आश्चर्याची बाब म्हटली पाहिजे.

मराठ्यांच्या बाजूवर एखादा 'खाफीखान' अगर एखादा 'भीमसेन सक्सेना' पैदा झाला असता, तर संताजी-धनाजीसारख्या आमच्या पूर्वजांच्या कीर्तीचे पोवाडे याहीपेक्षा बहारदारपणे आपल्यासमोर सादर करता आले असते.

उपरिनिर्दिष्ट कालखंडात अपवाद म्हणून केशव पंडित नावाच्या विद्वानाचा निर्देश करावा लागेल; पण राजाराम महाराजांच्या जिंजीच्या प्रवासावर या पंडिताने "राजारामचरितम्" असे भारदस्त नाव दिलेल्या या ग्रंथात राजाराम महाराजांचा संपूर्ण जिंजीचा प्रवासही वर्णिलेला नसावा आणि महाराजांस जिंजीच्या अर्ध्या वाटेवरच नेऊन सोडावे, यास काय म्हणावे? तेव्हा केशव पंडितासारख्या विद्वानाची लेखणी जागी झाली; पण तिने अधिक श्रम घेण्यास नकार दिला, असेच शेवटी म्हणावे लागते.

महाराष्ट्रात विद्वान मंडळींची वानवा होती, असे नाही. राज्यकर्त्यांपैकी रामचंद्रपंत, प्रल्हाद निराजी, शंकराजी नारायण ही मंडळी मोठी बुद्धिमान होती. शिवाय कृष्णाजी अनंत, केशव पंडित यांसारखे पंडित सरकार दरबारी होते. यांपैकी कुणी मराठ्यांच्या स्वातंत्र्ययुद्धावर लेखन करायचे म्हटले असते, तर खाफीखानापेक्षाही सरस व दर्जेदार ग्रंथनिर्मिती त्यांनी केली असती; पण पुढे मल्हार रामरावाने १०० वर्षांनी या कालखंडातील राज्यकर्त्यांची चरित्रे बखरींच्या रूपाने सजवून जे कार्य केले ते कार्य यांपैकी कुणा मराठी विद्वानाच्या हातून घडले असते, तर मराठ्यांच्या इतिहासास याहीपेक्षा वैभव प्राप्त झाले असते. या विद्वानांपैकी रामचंद्रपंत अमात्याने पुढे शिवाजी महाराजांच्या राजनीतीवर 'आज्ञापत्र' हा दर्जेदार ग्रंथ लिहिला. आज्ञापत्रासारख्या राजनीतीवर ग्रंथ लिहिणाऱ्या रामचंद्रपंतास मराठ्यांच्या स्वातंत्र्यसंग्रामावर ग्रंथनिर्मिती करून पुढच्या पिढ्यांना स्फूर्तिप्रद असे काही निर्माण करून ठेवावे, असे वाटले नाही, हे मराठ्यांचे दुर्दैव होय.

या संदर्भात असा एक प्रतिवादाचा मुद्दा उपस्थित करता येईल

की, मराठे या कालखंडात जीवन-मरणाचा संघर्ष करीत होते. इथे इतिहास लेखनासारखा उद्योग करायला वेळ होता कुणाजवळ? संताजी-धनाजी शत्रूंशी लढाया देतील की पत्रे लिहीत बसतील? पण शत्रुपक्षाकडील सेनानींकडे व त्याच्या इतिहासकारांकडे पाहिल्यावर हे प्रश्न निरर्थक आहेत, असे वाटते. संताजी-धनाजीप्रमाणेच मोगलांचे जुल्फिकारखान, लुत्फुल्लाखान, मातबरखान यांसारखे सेनानी एकसारख्या धावपळीच्या लढाया करीत होते आणि तरीही ते आपल्या मोहिमांचे वृत्तांत देणारी पत्रे लिहीत होते. त्यांना पत्रलेखनासाठी सवडही मिळत होती. इतिहासकारांपैकी भीमसेन सक्सेनाचे उदाहरण पाहण्यासारखे आहे. १७०० साली शाहजादा बेदारबख्त, जुल्फिकारखान, राव दल्पत बुंदेला यांनी पन्हाळगडास वेढा घातला. भीमसेन हा राव दल्पतबरोबर गडाच्या पायथ्याशी कोकणी दरवाजासमोरच्या राहुटीत होता. तोफांची गोळाबारी चालू झाली असली तरी अद्यापि किल्ल्याच्या वेढ्याचे खरे काम सुरू व्हायचे होते. भीमसेनला थोडी उसंत मिळाली. तेव्हा तो काय लिहितो पाहा - 'किल्ल्यापाशी छावणी घातल्यामुळे आतापर्यंतच्या धावपळीतून आणि नासाडीतून आम्हाला उसंत मिळाली... मी या ग्रंथाच्या लेखनात आपल्याला गुंतवून घेतले." मोगलांचा इतिहासकार वेढ्यातील राहुटीत असतानासुध्दा थोडी उसंत मिळताच इतिहास लेखनाचे काम हाती घेतो, ही बाब मोठी विचार करण्यासारखी आहे. मोगलांच्या बाजूवर समोर घडत असणाऱ्या ऐतिहासिक घटनांविषयी जाण होती. मराठ्यांच्या बाजूवर ती तशी नव्हती, याच निष्कर्षाप्रत येण्याशिवाय आपल्यासमोर काही पर्याय उरत नाही.

फारसी साधनांच्या खालोखाल परकीयांची म्हणजे मद्रास किनाऱ्यावरील इंग्रज व फ्रेंच या वखारवाल्यांची कागदपत्रे संताजीच्या चरित्रास महत्त्वाची साधने ठरतात. विशेषतः पांदेचरीचा फ्रेंच गव्हर्नर मार्टिन याची रोजनिशी व मद्रास किनाऱ्यावरील इंग्रज वखारवाल्यांचा पत्रव्यवहार यांच्यामधील संताजीच्या कर्नाटकातील हालचालीं-

विषयीच्या व मराठ्यांच्या जिंजीमधील राजकारणाच्या नोंदी मोठ्या महत्वपूर्ण आहेत. उदाहरणच घ्यायचे झाल्यास सन १६९६ साली संताजीशी राजाराम महाराजांचे झालेल्या बिघाडाचे घेता येईल. कासिमखान, खानाजादखान इत्यादी सरदारांवर विजय मिळवून संताजी राजाराम महाराजांच्या दर्शनास जिंजीत गेला; पण लवकरच त्याचे महाराजांशी वितुष्ट आले. या वितुष्टाचे कारण इंग्रजांच्या पत्रव्यवहाराशिवाय अन्य कोणत्याही साधनातून मिळत नाही. इंग्रज वखारवाल्यांनी मात्र आपल्या पत्रात म्हटले आहे-

"Our spies from the Moratta Camp and several other hands doe give an account of the nondutifull behaviour of Santogee Goarpurrow and his brother Virogee Goarpurrow which has caused a General Dissatisfaction amongst the Moratta Commanders."

*[मराठ्यांच्या छावणीतील आमच्या हेरांकडून आणि इतर अनेक विश्वसनीय गोटांतून आम्हास संताजी घोरपडे व त्याचा बंधू बहिर्जी (विरोजी) घोरपडे यांच्या बेशिस्त वर्तनाबद्दल निश्चित स्वरूपाची माहिती समजली आहे. त्यांच्या या वर्तनामुळे (जिंजीतील) मराठा सरदारांत मोठी अस्वस्थता निर्माण झाली आहे.]*

राजाराम महाराजांशी संताजीचे वितुष्ट येण्यास त्याचे बेशिस्त वर्तनच कारणीभूत झाले, हे आपणास सांगणारे हे इंग्रज वखारवाल्यांचे पत्र संताजीचरित्रास किती उपयुक्त ठरते, हे आणखी विशद करून सांगण्याची गरज नाही!

१७ व्या शतकातील मराठ्यांचा इतिहास हा एका विजिगीषू समाजाचा इतिहास आहे. शिवप्रभूंसारखा युगकर्ता पुरुष व संताजी-धनाजीसारखे महान पराक्रमी सेनानी या शतकाने महाराष्ट्रात दिले आहेत; पण या कालाचा इतिहास समोर मांडताना अभ्यासकासमोर स्वकीयांच्या साधनांच्या कमतरतेमुळे कशा अडचणी उत्पन्न होतात, हे विशद करण्याच्या हेतूनेच ही साधनचिकित्सा येथे केली आहे. आता

संताजीच्या ऐतिहासिक कामगिरीसंबंधी थोडे लिहिले, तर ते अप्रस्तुत होणार नाही, असे वाटते.

राष्ट्राच्या अंगी अस्मिता जागी असेल, तर त्याच्यावर कितीही मोठे संकट आले, तर ते नष्ट होत नाही. त्या संकटाशी मुकाबला करणारी नररत्ने अशा राष्ट्राच्या भूमीवर आपोआपच उदयात येतात. संकटाची तीव्रता जेवढी मोठी तेवढी या नररत्नांच्या कर्तबगारीची उंची मोठी होत जाते. व्हिएतनाम हे राष्ट्र केवढेसे; पण त्याच्यावर पाश्चात्त्यांच्या असुरी महत्त्वाकांक्षेने केवढे भयानक संकट लादले; पण या संकटातून व्हिएतनामी राष्ट्रास तारून नेणारा तेवढ्याच उंचीचा राष्ट्रपुरुष हो ची मिन्हच्या रूपाने तेथे पैदा झाला. एका अर्थाने पाश्चात्त्य साम्राज्यवादी संकटानेच हो ची मिन्ह यांचा असामान्य स्वातंत्र्यसेनानी म्हणून उदय घडवून आणला. अन्यथा एक सामान्य नेते म्हणून त्यांचा आग्नेय आशियाच्या इतिहासात उदयास्त घडून आला असता.

१७ व्या शतकातील मराठ्यांच्या इतिहासास हेच सूत्र लागू होते. संभाजी महाराजांनंतरच्या भयानक आपत्तीच्या कालात मराठी सत्ता आता संपुष्टात आली, अशीच सर्वांची भावना झाली होती. मराठ्यांचा एक राजा मारला गेला, त्याच्या जागी आलेला दुसरा राजा दूर कर्नाटकात परागंदा झाला, मागे राजधानी शत्रूच्या हाती पडली आणि तिच्याबरोबर मृत राजाची राणी व राजपुत्र हे कैद झाले; अशा परिस्थितीत राज्याचे परगण्यापाठीमागून परगणे व किल्ल्यापाठीमागून किल्ले शत्रूस काबीज झाले. वतनदार मंडळी 'कालाय तस्मै नमः' या तत्त्वानुसार मोगलांच्या चाकरीत गेली. सर्वत्र निराशेचा काळोख दाटला. सारांश, शिवप्रभूंनी एवढ्या हिमतीने व हिकमतीने ज्या राज्याची उभारणी केली त्याचे तुकडे तुकडे झाले आणि तेही अवघ्या ४-६ महिन्यांच्या अल्पावधीत! यापेक्षा भयानक संकट ते कोणते असू शकते? औरंगजेब बादशहास मोठे समाधान झाले, की मोगली साम्राज्याच्या जिवावर उठलेली या बंडखोर मराठ्यांची सत्ता आपण रसातळाला पोहोचविली! आता मराठ्यांच्या परागंदा झालेल्या राजास पकडून नष्ट केले की या सत्तेची उरलीसुरली

मुळीही उखडली जाईल; तेवढे काम झाले की आपली दक्षिणेची मोहीम संपली. आपण दिल्लीस जाण्यास मोकळे झालो!

खरोखरच कुणासही औरंगजेब बादशहाप्रमाणे वाटावे, अशीच परिस्थिती निर्माण झाली होती; पण मराठ्यांची ही असहाय अवस्था फार काळ टिकली नाही. अवघ्या वर्षभरात मराठ्यांनी आपणास सावरले. पाऊणशे वर्षांपूर्वी शिवप्रभूंनी ज्या एका महान शक्तीची प्राणप्रतिष्ठा मराठी समाजात केली होती, ती पुन्हा एकदा नव्या छत्रपतीच्या नेतृत्वाखाली प्रगट झाली. छत्रपती राजाराम महाराजांच्या नेतृत्वाखाली मराठ्यांनी मोगली आक्रमणाची लाट थोपवून तर धरलीच, शिवाय लवकरच ती परतवून लावून शत्रूने काबीज केलेला मुलूख गडकोटासह परत जिंकून घेण्याचा सपाटा लावला. शत्रूच्या ताब्यातून आपल्या ताब्यात येणाऱ्या प्रत्येक गडकोटाबरोबर मराठ्यांचा आत्मविश्वास वाढत गेला. मराठी राज्य बुडत तर नाहीच, उलट ते जोमाने वाढू पाहत आहे, असा हा आत्मविश्वास मराठ्यांच्याठायी निर्माण करणाऱ्या मराठी नेत्यांच्या कामगिरीत संताजी घोरपडे याचा सिंहाचा वाटा होता. संताजीची ही कामगिरी म्हणजे मराठी राज्याच्या रक्षणाची कामगिरी होती.

संताजीने आपल्या महान पराक्रमाने स्वराज्याचे रक्षण केले, याची स्पष्ट कबुली रामचंद्रपंत अमात्यासारख्या मुत्सद्यासही द्यावी लागली होती, ही गोष्ट या ठिकाणी नमूद करावीशी वाटते. संताजीच्या कामगिरीचे वर्णन करताना एका पत्रामध्ये पंत अमात्याने म्हटले आहे - "राजश्री संताजी घोरपडे सेनापती यासी राजश्री छत्रपती स्वामी कर्नाटकात जाते समई या प्रांते ठेऊन गेले होते. त्या समई इकडे गनिमाची धामधूम बहुत होऊन कुल देश व दुर्गे हस्तगत केली होती. राज्यामध्ये काही अर्थ उरला नव्हता. कुल मऱ्हाटे याही इमानास खता करून गनिमाकडे गेले. याही (संताजीने) राजश्रीच्या पायासी बहुतच एकनिष्ठा धरून इमानास खता न करिता जमाव करून सेख निजाम व सर्जाखान व रणमस्तखान व जाननिसारखान येसे उमदे वजीर बुडविले. जागाजागा गनिमास कोटगा घालून नेस्तनाबूद केला आणि देश

सोडविला. राज्य रक्षणतेच्या प्रसंगास असाधारण श्रम केले. औरंगजेबास दहशत लावली."

रामचंद्रपंत अमात्यासारखा मराठ्यांचा मुत्सद्दी कारभारी म्हणतो की, औरंगजेबाच्या स्वारीचे संकटच असे जबरदस्त की, राज्यात काही अर्थच उरला नव्हता. अशा संकटकालात संताजीने गनीम नेस्तनाबूद केला आणि देश सोडविला. याहून महत्त्वाचे म्हणजे मराठ्यांच्या राजास पकडून आपल्या छावणीत क्रूर पद्धतीने हत्या करणाऱ्या व त्यायोगे समस्त मराठी समाजास दहशत लावण्याचा उद्योग करणाऱ्या खुद्द औरंगजेब बादशहासच संताजीने दहशत लावली.

बलाढ्य मोगल बादशहा औरंगजेबास मराठ्यांचा फक्त एकच सेनानी दहशत लावू शकला आणि तो म्हणजे सेनापती संताजी घोरपडे. संताजीच्या रणनीतीने जिथे खुद्द औरंगजेबानेच दहशत खाल्ली होती तिथे मोगली लष्करातील सामान्य शहाजादे, उमराव व सैनिक यांचे काय? केवळ संताजी जवळपास आलेला आहे, असे समजताच मोगलांचा नामांकित सरदार गाजिउद्दीखान फिरोजजंग बहादूर याची गाळण उडाल्याचे मोगलांच्या इतिहासकारानेच नमूद करून ठेवले आहे. संताजीशी बहादूरपणे मुकाबला करण्याचे सोडून या मोगल बहाद्दराने आडवाटेने विजापूरच्या रोखाने पलायन केले!

खाफीखानाने म्हटले आहे, की संताजीशी ज्याला लढण्याचा प्रसंग येई त्याच्या नशिबी तीनपैकी एक परिणाम ठेवलेला असे - पहिला म्हणजे तो सरळ सरळ मारला जाई; दुसरा म्हणजे तो जखमी होऊन कैदेत सापडे आणि तिसरा म्हणजे त्याचे सैन्य गारद होऊन त्यास रणांगणावरून पळ काढावा लागे. याशिवाय चौथ्या परिणामाची म्हणजे संताजीवरील विजयाच्या परिणामाची आशा मोगल सरदारांना करता येत नव्हती, हे केवढे त्यांचे दुर्दैव! आणि संताजीची आणि मराठ्यांची ही केवढी मोठी कामगिरी!

अशा प्रकारे संताजीने मोगलांचे नीतिधैर्यच खच्ची करून टाकले होते. स्वातंत्र्ययुद्ध कालातील संताजीची हीच सर्वांत श्रेष्ठ कामगिरी

होती, असे मानावे लागेल. नीतिधैर्य असेल तर शंभर सैनिक हजार सैनिकांशी मुकाबला करू शकतील आणि ते जर नसेल तर हजार सैनिकही शंभर सैनिकांसमोर हतबल ठरतील. नीतिधैर्याचे खच्चीकरण झाल्यामुळेच बादशहापासून सामान्य सैनिकांपर्यंत सर्वांनाच संताजीसमोर हतबल बनावे लागले. म्हणूनच खाफीखानाने यथार्थपणे म्हटले आहे, की संताजीच्या पराक्रमाची दहशत समस्त मोगलांनी अशी खाल्ली होती, की त्याचे नाव ऐकताच नरव्याघ्राप्रमाणे शूर असणाऱ्या योद्धयांच्या हृदयातही धडकी भरत असे!

अशा या मराठ्यांच्या महान सेनापतीचे चरित्र वाचकांच्या हाती देताना मला आनंद होत आहे. संताजीच्या चरित्राचे माझे स्वप्न इतक्या कालावधीनंतर का होईना, पण ग्रंथरूपाने साकार होत आहे, याचे मला स्वाभाविक समाधान आहे. चरित्र कितपत यशस्वी झाले आहे, याचे मोजमाप सुज्ञ वाचकांनी करावयाचे आहे; पण या ठिकाणी शेवटी एक मुद्दा आवर्जून सांगावा असे वाटते, तो म्हणजे आपला चरित्रनायक म्हणजे सर्वगुणसंपन्न आणि असे असूनही त्याच्यावर इतरांनीच अन्याय केला, असे गृहीततत्त्व डोक्यात घेऊन मी हे चरित्र लिहिलेले नाही. ऐतिहासिक कागदपत्रांच्या चिकित्सेतून जसा संताजी मला दिसला तसा मी या चरित्रात उभा केला आहे. म्हणूनच संताजीच्या पराक्रमाप्रमाणेच त्याच्या अंगभूत दोषांचीही मांडणी मी केलेली आहे. काहींना ते आवडेल तर काहींना ते रुचणार नाही; पण इतिहास हा आपल्या आवडी-निवडींचा विचार करीत नाही. कारण तो घडून गेलेला असतो. अभ्यासकाचे काम केवळ त्याचे यथार्थ व सत्य दर्शन घडविणे हे असते. मला वाटते, संताजीचे हे चरित्र वाचकांना सादर करताना मी तसा थोडाफार प्रयत्न केला आहे.

**-डॉ. जयसिंगराव पवार**

***

## तिसऱ्या आवृत्तीच्या निमित्ताने

'सेनापती संताजी घोरपडे' या मी लिहिलेल्या चरित्रग्रंथाची पहिली आवृत्ती मार्च १९८७ मध्ये प्रकाशित झाली. महाराष्ट्रातील इतिहासप्रेमींनी व इतिहाससमीक्षकांनी या ग्रंथाचे स्वागत मोठ्या उत्साहाने केले. मराठी साहित्य परिषदेने इतिहास क्षेत्रातील सर्वोत्कृष्ट मराठी ग्रंथ म्हणून म. म. दत्तो वामन पोतदार पुरस्कार देऊन या ग्रंथाचा गौरव केला. परिणामी या ग्रंथाची पहिली आवृत्ती वर्षभरात संपून तो दुर्मीळ सदरात जाऊन बसला.

दुसरी आवृत्ती तब्बल २१ वर्षांनी स. २००८ मध्ये प्रसिद्ध झाली. पण तीही अल्पावधीत संपली. तेव्हापासून महाराष्ट्रातील इतिहासप्रेमी या ग्रंथाची सातत्याने चौकशी करीत राहिले. तथापि आमच्या संशोधन कार्यातील व्यग्रतेमुळे ग्रंथाचे पुनर्प्रकाशन होऊ शकले नाही.

शेवटी आमचे तरुण इतिहासप्रेमी मित्र डॉ. दामोदर मगदूम नाईक यांनी त्यांच्या 'मराठीदेशा' या प्रकाशन संस्थेच्या वतीने ही जबाबदारी आनंदाने स्वीकारून चिकाटीने पार पाडली आहे. त्याबद्दल मी त्यांचा व त्यांच्या सर्व इतिहासप्रेमी सहकाऱ्यांचा अंत:करणपूर्वक आभारी आहे. विशेष म्हणजे प्रस्तुत ग्रंथातील छायाचित्रे व नकाशे यांच्या संदर्भात श्री. रवी पवार, श्री. अनिल दुधाने, श्री. अनिकेत वाघ, श्री. जयवंत फाळके इत्यादींनी बहुमोल सहकार्य केले आहे. मुखपृष्ठासाठी चित्रकार श्री. प्रमोद मोर्ती यांनी संताजीच्या शौर्याला साजेल असे जोशपूर्ण चित्र पुरविले आहे. पुस्तकाचे मुद्रितशोधन श्री. बाजीराव जठार यांनी केले आहे. या सर्वांची आम्ही आभारपूर्वक नोंद घेत आहोत.

**-डॉ. जयसिंगराव पवार**

**नोव्हेंबर २०१८**



# * अनुक्रम *



# १.
# घोरपडे घराणे : क्षात्र परंपरा

**महाराष्ट्र** ही पुण्यशील आणि पराक्रमी पुरुषांची भूमी आहे. या भूमीत जसे ज्ञानेश्वर, एकनाथ, तुकाराम, रामदास यांसारखे संतपुरुष निर्माण झाले, तसे शहाजी, शिवाजी, संताजी, धनाजी यांसारखे पराक्रमी वीर पुरुषही जन्मास आले. महाराष्ट्रातील मराठ्यांची संस्कृती या थोर पुरुषांनी घडविली आहे. ईशभक्ती आणि शक्तीची उपासना हे मराठी संस्कृतीचे अंतःप्रवाह आहेत. या उपासनेतून मराठी संस्कृतीची जडणघडण झाली आहे. यवनी आक्रमणाने म्लान झालेल्या हिंदू धर्मास संतांनी भागवत धर्माची संजीवनी दिली, तर शहाजी-शिवाजीसारख्या वीर पुरुषांनी यवनी आक्रमणाने नष्ट होऊ पाहणाऱ्या समाजाच्या अस्मितेचे रक्षण केले. स्वधर्म व स्वराष्ट्र यांचे संरक्षण व संवर्धन हे या वीर पुरुषांनी आपले कर्तव्य मानले. या कर्तव्यालाच शिवकालात 'महाराष्ट्र धर्म' असे म्हटले गेले.

या महाराष्ट्र धर्मात जी शौर्य, पराक्रमाची परंपरा अभिप्रेत आहे ती शिवकालपूर्व दोन-तीनशे वर्षे महाराष्ट्रात अनेक क्षत्रिय घराण्यांनी उदयास आणली होती. निंबाळकर (पवार), भोसले, घोरपडे, जाधव, मोरे, सावंत, शिर्के, घाटगे, माने अशी ही अनेक क्षत्रिय मराठा घराणी बहामनी कालापासून दक्षिणेत प्रसिद्धी पावली होती. बहामनी सत्तेच्या अस्तानंतर त्यांपैकी काही आदिलशाही दरबारात, तर काही निजामशाही दरबारात रुजू झाली. भोसले-घोरपडे घराण्यांतील पुरुषांनी दोन्ही शाहींची लष्करी सेवा केली. एवढेच नव्हेतर दक्षिणेचा इतिहास घडविण्याच्या कार्यात मोलाची कामगिरी बजावली.

भोसले घराण्याने छत्रपती शिवाजी महाराजांसारखा युगपुरुष देशास दिला, तर घोरपडे घराण्याने संताजीसारखा दक्षिणेतील महान सेनापती निर्माण केला.

## मूळ पुरुष सुजनसिंह

वास्तविक दक्षिण हिंदुस्थानच्या इतिहासात आपले महत्त्वाचे स्थान निर्माण करणारी भोसले आणि घोरपडे ही दोन क्षात्र घराणी म्हणजे एकाच वंशवृक्षाच्या दोन शाखा होत्या. या दोन्ही घराण्यांचा मूळ पुरुष सुजनसिंह हा उदयपूरच्या शिसोदे राजघराण्यातील असून, तो चौदाव्या शतकात, शिवजन्मापूर्वी तीनशे वर्षे, आपले भाग्य अजमाविण्यासाठी उत्तरेतून दक्षिणेत उतरला -(सन १३३४).

दक्षिण हिंदुस्थानच्या इतिहासाच्या दृष्टीने हा काल मोठ्या संक्रमणावस्थेचा होता. दक्षिणेतील देवगिरीचे यादवांचे राज्य अस्तास जाऊन १६ वर्षे झाली होती. उत्तरेतील इस्लामी सेनानी मलिक काफूरने दक्षिणेतील सर्व हिंदू राज्ये धुळीला मिळविली होती; पण लवकरच इस्लामी सत्तेच्या या जबरदस्त लाटेस थोपवून धरणारी हिंदू सत्ता विजयनगरच्या रूपाने तुंगभद्रेच्या तीरावर उदयास आली. ही घटना सुजनसिंह दक्षिणेत आल्यावर दोनच वर्षांनी घडून आली. पुढे लवकरच दिल्लीच्या सुलतानाविरुद्ध बंड पुकारून त्याचा सुभेदार जाफरखान उर्फ हसन गंगू याने सन १३४७ साली गुलबर्गा येथे बहामनी राज्याची स्थापना केली. अशा प्रकारे दक्षिणेत फार मोठे राजकीय स्थित्यंतर होत असता भोसल्यांचा मूळ पुरुष इथे आपले नशीब काढण्यासाठी आला होता.

हसन गंगू हा मोठा चाणाक्ष राज्यकर्ता होता. शिसोदे वंशीय सुजनसिंहासारख्या पराक्रमी पुरुषास त्याने आपल्या लष्करी सेवेत घेऊन प्रतिष्ठेस चढविले. सुजनसिंह व त्याचा पुत्र दिलीपसिंह या पितापुत्रांनी हसन गंगूची सत्ता दृढ करण्याच्या कामी मोठी कामगिरी बजावली. त्यांच्या कामगिरीचे फल म्हणून हसन गंगूने त्यांना देवगिरीच्या आसमंतात एक छोटी जहागीर बहाल केली. तसेच दिलीपसिंहास 'खाशांच्या घोडेस्वारांचा मुख्य' हे पद दिले - (सन १३५२).[१]

दिलीपसिंहाचा पुत्र सिद्धजी हा कर्तबगार होता. त्याने बहामनी

१. मुधोळ संस्थानच्या घोरपडे घराण्याचा इतिहास, परिशिष्ट, पृ. २

सत्तेच्या रक्षणार्थ प्राण खर्ची घातले. तेव्हा त्याचा पुत्र भैरवसिंह उर्फ भोसाजी यास बहामनी सुलतानाने मुधोळ कर्यातीची ८४ गावांची जहागीर बक्षीस दिली- (सन १३९८).[२] मुधोळच्या जहागीर सत्तेची स्थापना यावेळी झाली.

भैरवसिंह उर्फ भोसाजी याच्या पिढीपासून या घराण्यात 'भोसले' हे उपनाव रूढ झाले. भोसाजीचे वंशज ते भोसले. ही भोसले आडनावाची पारंपरिक उपपत्ती सांगितली जाते. भोसाजीनंतरच्या दोन पिढ्यांनी बहामनी सत्तेची इमानेइतबारे लष्करी सेवा केली आणि आपल्या घराण्याचा लौकिक वाढविला.

## भोसल्यांचे घोरपडे बनले

कर्णसिंह आणि शुभकृष्णसिंह हे भोसाजीचे पणतू. पैकी कर्णसिंहापासूनच्या पुढील पिढ्यांना घोरपडे हे उपनाव प्राप्त झाले आणि शुभकृष्णसिंहाची शाखा भोसले म्हणूनच पुढे चालू राहिली-(वंशावळ पाहा). या घोरपडे नावाची उपपत्ती ही मोठी ऐतिहासिक आहे. सन १४६९ साली बहामनी वजीर महंमद गवान याने दक्षिण कोकण जिंकण्यासाठी लष्करी मोहीम हाती घेतली. कर्णसिंह आपल्या भीमसिंह या पुत्रासह या मोहिमेत सहभागी झाला होता. कोकणात उतरत असता मार्गात खेळणा उर्फ विशाळगड हा किल्ला लागला. तो कोकणातील राजा शंकरदेव मोरे याच्या ताब्यात होता. तो घेण्यासाठी बहामनी फौजा प्रयत्नांची शर्थ करू लागल्या; पण सह्याद्री पर्वताच्या बिकट रांगेतील हा दुर्गम किल्ला सहजासहजी हल्ला करून जिंकता येण्यासारखा नव्हता. बहामनी फौजेचे सर्व प्रयत्न हरल्यावर कर्णसिंह व भीमसिंह या पितापुत्रांनी एक अभिनव क्लृप्ती लढविली. त्यांनी घोरपडीच्या साहाय्याने कडा चढून किल्ला हस्तगत केला. किल्ल्यावरील लढाईत कर्णसिंह धारातीर्थी पडला; पण त्याच्या पराक्रमाने बहामनी सत्तेस दक्षिण कोकणाचे प्रवेशद्वार असलेला खेळणा किल्ला प्राप्त झाला. या प्रसंगानंतर बहामनी सुलतानाने कर्णसिंह व भीमसिंह यांचा गौरव करून भीमसिंहास मुधोळ

---

२. कित्ता, पृ. ६

जहागीरसह 'राजा घोरपडे बहाद्दर' हा किताब बहाल केला. बहामनी सुलतानाने या प्रसंगी दिलेले फर्मान मुळातून वाचण्यासारखे आहे -

"मलिक उत्तुज्जार महमूद गावान यांच्या सांगण्यावरून आमच्या ध्यान्यात आले की, उग्रसिंघांचा मुलगा करणसिंह यांनी कोकणच्या किल्ल्याच्या बाबतीत विलक्षण शौर्य प्रगट केले. त्यांनी काही घोरपडींच्या कमरांना दोऱ्या बांधून त्या कड्यावर पाठवून काही शूर लोक वर चढविले. पहारेकरी निष्काळजी असल्यामुळे त्यांना हे समजले नाही. तेव्हा चढून आलेल्या लोकांनी दरवाजे उघडले व अडथळा करणाऱ्या लोकांस यमसदनास पाठविले. दरवाजाबाहेर वाट पाहात असलेले लोक आत शिरले व त्यांनी सर्वांना कापून काढले आणि किल्ला सर केला. या लढाईत करणसिंह कामास आला. करणसिंहाचा स्वार्थत्याग व भीमसिंहाची निष्ठा या दोन्ही गोष्टी ध्यान्यात आल्या. या कुलाच्या शाश्वतीसाठी अशा प्रकारच्या चाकरीला ८४ गावांसह मुधोळ पूर्वीप्रमाणे बहाल करण्याचे फर्मावितो. याशिवाय किल्लासुद्धा रायबाग व वाई हे परगणे बक्षीस देतो व राणा याऐवजी राजा घोरपडे बहाद्दर हा किताब बहाल करतो आणि घोरपडीच्या रंगाचे निशाण देतो. ते त्यांनी आपल्या स्वारीत ठेवावे. त्यांनी हे बक्षीस घेऊन वंशपरंपरेने चाकरी करण्यात गर्क होऊन राहावे" - (२२ ऑक्टोबर १४७१).[३]

बहामनी राज्य अस्तास गेल्यावर त्याच्या जागी निजामशाही, आदिलशाही इत्यादी पाच शाह्यांचा दक्षिणेत उदय झाला. घोरपडे मंडळींनी आदिलशाही दरबाराची सेवाचाकरी स्वीकारली आणि ते पिढ्यान्‌पिढ्या त्या शाहीसाठी लष्करी पराक्रम करीत राहिले. अनेक

३. मुधोळ संस्थानच्या घोरपडे घराण्याचा इतिहास, परिशिष्ट, पृ. १६, हिंदुराव घोरपडे गजेंद्रगडकर घराण्याच्या कैफियतीत या नावाविषयी थोडी अधिक माहिती दिलेली आहे.-"...असे दर जागी पराक्रम स्वतः फौजेनिसी केले. त्यामुळे बादशहाची मर्जी खूश होऊन "घोरपडे" म्हणोन किताब दिल्हे कारण हेच की जेथे जेथे प्रसंग पडेल तेथे घोरतर युद्ध करून जय मिळवितात... निरुपाय असले ठिकाणीसुद्धा घोरपडीचे कंबरेस दोरी बांधून आत्मादेह क्षात्र धर्माकडे चित्त पुरवून हल्ला करतात. सबब त्यास घोरपडे असे किताब आबदागिरी वगैरे चिन्हे द्यावी, असी योजना करून दिल्हे." करवीर सरदारांच्या कैफियती, पृ. ६९

प्रांतांत त्यांनी ठिकठिकाणच्या पाटीलक्या व देशमुख्या प्राप्त केल्या. सन १५६५ च्या तालीकोटच्या लढाईत घोरपडे घराण्यातील कर्णसिंह (दुसरा) आणि त्याचा बंधू भीमसिंह यांनी मोठे शौर्य गाजविल्याचा उल्लेख मिळतो. या इतिहासप्रसिद्ध लढाईत कर्णसिंह ठार झाला. तेव्हा त्याच्या कामगिरीची दखल घेऊन आदिलशहाने त्याचा पुत्र चोलराज यास सप्तहजारी मनसब व तोरगल प्रांतात काही गावांची नवी जहागीर बहाल केली. या लढाईच्या प्रसंगाचे वर्णन करीत असता घोरपडे घराण्याच्या बखरकाराने घोरपडे कुलोत्पन्न पुरुषांच्या रणांगणावरील लढण्याच्या पद्धतीविषयी मोठा लक्षणीय वृत्तांत दिलेला आहे. बखरकार म्हणतो, "शूरांच्या शरीरातून कृष्णेप्रमाणे रक्ताचे पूर वाहू लागले. योद्धे तलवारीने व खंजीराने एकमेकास मारून गतप्राण होऊ लागले. अशा वेळी कर्णसिंह व भीमसिंह यांचा पराक्रम अवर्णनीय होता. युद्धभूमीत वाघाप्रमाणे उडी घेऊन उड्डाण करून जो कोणी पुढे येईल त्याचे काम ते संपवीत असत. या लोकांचा (घोरपड्याचा) संप्रदाय असा आहे की, तलवार व खंजीर ही उपयोगात आणावयाची. याशिवाय दुसरी अग्निवर्षाव करणारी आयुधे म्हणजे बंदुका, तोफा व बाण यांना हात लावावयाचा नाही. बाणांनी व बंदुकांनी शत्रूंचा नाश करणे हे शौर्याचे काम नाही, असे ते समजत व ते शिपाईगिरीच्या विरुद्ध मानीत."[४] चोलराजाचा ज्येष्ठ पुत्र पिलाजी यास मुधोळची जहागीर प्राप्त झाली, तर कनिष्ठ पुत्र वल्लभजी यास महाराष्ट्रातील वाई प्रांतातील देशमुखी व काही गावांच्या पाटीलक्या मिळाल्या. वल्लभजींची शाखा महाराष्ट्रातच स्थिर झाली. वल्लभजी हा प्रस्तुत चरित्रनायक संताजी घोरपड्याचा पणजोबा होय.[५] या शाखेतील घोरपडे मंडळींचा महाराष्ट्रातील शहाजीराजे भोसले या पराक्रमी पुरुषाशी कसा संबंध जडला आणि त्यातून वल्लभजीचा नातू म्हाळोजी व पणतू संताजी यांनी छत्रपती शिवाजी महाराजांच्या काळात स्वराज्याच्या उभारणीत आणि संरक्षणात कशी मोलाची कामगिरी बजावली, याचा वृत्तांत पुढील प्रकरणात पाहणार आहोत.

---

४. कित्ता, बखर, पृ. २०२.

५. परिशिष्ट क्रमांक- १ पाहा.



२.

# संताजीचे पिते म्हाळोजी घोरपडे

## महाराष्ट्रातील घोरपडे घराणे

सन १५७८ साली चोलराज घोरपडे बहादूरचा मृत्यू झाल्यावर त्याचा ज्येष्ठ पुत्र पिलाजी यास मुधोळजी जहागीर, राजा घोरपडे बहादूर हा किताब, फौजफाटा व इतर सरंजाम प्राप्त झाला. मुधोळच्या या घोरपडे घराण्याची महाराष्ट्रातही काही वतने होती. ही वतने चोलराजाचा कनिष्ठ पुत्र वल्लभजी याच्या वाटणीस येऊन तो महाराष्ट्रात दाखल झाला. वल्लभजीच्या वाट्यास आलेल्या वतनामध्ये वाई प्रांतातील भाळवणी व विटे या कर्यातींच्या देशमुख्या व जांब, वांगी, भाळवणी व न्हावी या गावांच्या पाटीलक्या मोडत होत्या.[1] ही वतने सांभाळीत वल्लभजी व त्याच्या पुढील पिढ्या महाराष्ट्रातच स्थायिक झाल्या. इथल्या भूमीशी हे घराणे इतके समरस झाले की, ते पूर्णपणे महाराष्ट्रीय बनले, इतके की त्यांनी महाराष्ट्रात स्वीकारलेल्या ध्येयधोरणांमुळे हे घोरपडे म्हणजे मुधोळकर घोरपड्यांचीच एक शाखा होती, ही बाब सहजासहजी लक्षात येण्यासारखी राहिली नाही.

## दोन घराण्यांच्या भिन्न प्रवृत्ती

या ठिकाणी आणखी एक गोष्ट लक्षात ठेवली पाहिजे, की याच काळात सुजनसिंहाचा वंशज शुभकृष्ण याची शाखा भोसले या नावाने महाराष्ट्रात वावरत होती. या भोसले घराण्यातील मालोजीराजे भोसले, शहाजीराजे भोसले व शिवाजीराजे भोसले या पुरुषांनी चढत्या श्रेणीने आपला अभ्युदय घडवून आणला.

---

१. कापशीकर सेनापती घोरपडे घराण्याचा इतिहास, पृ. २६

वास्तविक कर्नाटकातील मुधोळकर घोरपडे घराणे व महाराष्ट्रातील हे भोसले घराणे या एकाच वंशवृक्षाच्या शाखा होत्या; पण या दोन शाखांनी दक्षिण हिंदुस्थानच्या इतिहासात भिन्न भिन्न मार्ग स्वीकारल्याचे दिसून येते.

महाराष्ट्रातील शहाजी राजे भोसल्यांनी स्वसामर्थ्याने एका मोडलेल्या शाहीचे, निजामशाहीचे पुनरुज्जीवन करण्याचा प्रयत्न केला, तर त्यांच्या पुत्राने, शिवाजीराजे भोसले यांनी त्याही पुढे जाऊन नवीच शाही - मराठेशाही - स्थापन करून दक्षिण हिंदुस्थानाच्या नव्हे, तर अखिल हिंदुस्थानच्या इतिहासात नवे पर्व सुरू केले; पण शिवाजीराजांच्या या मराठ्यांच्या अस्मितेच्या उभारणीच्या कार्यात कर्नाटकातील मुधोळकर घोरपडे घराण्यातील पुरुषांनी, बाजीराजे घोरपडे व त्यांचे पुत्र मालोजीराजे घोरपडे यांनी साथ दिली नाही. एवढेच नव्हे तर भोसले घराण्यातील पुरुषांशी संघर्ष करून यवनी सत्तेची सेवाचाकरी करण्यातच धन्यता व आयुष्याची इतिकर्तव्यता मानली. एकाच वंशवृक्षाच्या दोन शाखांच्या या भिन्नभिन्न स्वभावप्रकृती अभ्यास करण्यासारख्या आहेत.

## महाराष्ट्रातील घोरपड्यांचे भोसल्यांशी साहचर्य

असे असले तरी मुधोळकर घराण्यातून फुटून महाराष्ट्रात आलेल्या वल्लभजीच्या घोरपडे घराण्याचे भोसल्यांशी साहचर्य घडून येऊन त्याने आपला वेगळाच इतिहास घडविला. या घराण्यातील म्हाळोजी घोरपडे यांनी शहाजीराजे भोसले यांना आपली निष्ठा वाहून आपला अभ्युदय घडवून आणला. मुधोळकर घोरपड्यांकडे जसे पिढ्यान्‌पिढ्याची जहागीर व सरंजामी वैभव होते, तसे म्हाळोजीकडे काही नव्हते आणि हे सरंजामी वैभव टिकविण्यासाठी मुधोळकरांना यवनी सत्तेच्या एकनिष्ठपणाचे व्रत

चालविणे जसे आवश्यक वाटत होते, तसे म्हाळोजीस वाटण्याचे काही कारण नव्हते. म्हाळोजी हे देशमुखी-पाटीलकी यांसारखी वतने सांभाळणारे एक सामान्य वतनदार होते. या वतनदाराच्या मनात राजनिष्ठा ती काय असणार ! आणि दक्षिणेतील राजकारणाच्या इतिहासात तिचे मोल ते काय असणार ! सारांश, म्हाळोजीच्या मनाची पाटी कोरी होती. स्वाभाविकच या पाटीवर शिवाजी राजांच्या स्वराज्याची प्रतिमाही चटकन उमटली. म्हाळोजींनी स्वराज्याच्या उभारणीत मनःपूर्वक सहकार्य दिले, त्याची ही पार्श्वभूमी.

## म्हाळोजी घोरपडे

या पार्श्वभूमीवर संताजी घोरपडेचे पिते म्हाळोजी घोरपडे यांची कामगिरी तपासून पाहिली पाहिजे. महाराष्ट्रात भोसले व घोरपडे ही दोन घराणी शहाजीराजे भोसल्यांच्या कालखंडात सहकार्यासाठी एकत्र आल्याचे इतिहास सांगतो. जेव्हा शहाजीराजांसारखा समर्थ सेनानी लष्करी व राजकीय डावपेच खेळून मोडलेल्या निजामशाहीची पुनःस्थापना करू लागला, तेव्हा महाराष्ट्रातील अनेक मराठा घराणी त्यांस येऊन मिळाली. घोरपडे हे त्यांपैकी प्रमुख होत. कवींद्र परमानंदाने या घटनेचा उल्लेख आपल्या 'शिवभारत' या काव्यग्रंथात केलेला आहे. कवींद्र परमानंद म्हणतो -

*"शक्रप्रस्थस्य शक्रेण विरुद्धोऽयमभृद्यदा।*
*महाराजममुं भेजुर्महाराष्ट्रनृपास्तदा॥५॥*
*घांटिकाः कांटिकास्तद्वन्दोकपाटाश्च कांकटाः।*
*तोमराश्चाहुबाणश्च महिताश्च महाद्रिकाः॥६॥*
*खराटाः पांडरास्तद्वद् व्याघ्रघोरफटादयः।*
*तदा शाहनरेन्द्रेण पृतनापतयः कृताः॥७॥*

"शहाजी दिल्लीच्या बादशहाविरुद्ध झालेला पाहून घाटगे, काटे, गायकवाड, कंक, ठोमरे, चव्हाण, मोहिते, महाडिक, खराटे, पांढरे, वाघ, घोरपडे इत्यादी महाराष्ट्रीय राजे त्यास येऊन मिळाले आणि शहाजीने त्यांना (आपल्या लष्करात) सेनानी केले."[२]

निजामशाहीच्या पुनरुज्जीवनाचा शहाजीराजांचा प्रयत्न निष्फळ झाल्यावर त्यांनी आदिलशाही दरबारची सेवा स्वीकारून कर्नाटक हे आपले कार्यक्षेत्र बनवले आणि तिकडेच ते अखेरपर्यंत वावरत राहिले. इतर अनेक मराठा सेनानींबरोबर म्हाळोजी घोरपडे हे शहाजी राजांबरोबर कर्नाटकात गेलेही असतील; पण लवकरच राजांनी त्यांची रवानगी महाराष्ट्रातील शिवाजीराजांकडे केली असावी, असा तर्क बांधण्यास जागा आहे. कर्नाटकात गेल्यावर पुणे जहागिरीतील आपल्या पुत्राकडे जे अनेक कर्तबगार मुलकी व लष्करी अधिकारी शहाजीराजांनी पाठविले त्यात म्हाळोजींचा समावेश असावा.

## स्वराज्य स्थापनेच्या कार्यात सहभाग

शिवाजी महाराज आणि म्हाळोजी घोरपडे यांचा स्वराज्य स्थापनेच्या प्रारंभीच्या काळात कसा संबंध घडून आला, या संबंधाची रूपरेषावजा माहिती घोरपडे घराण्याच्या कागदपत्रांत मिळते. कापशीकर सेनापती घोरपडे घराण्याच्या कैफियतीत म्हटले आहे -

"मूळ पुरुष म्हाळोजीराजे घोरपडे व शककर्ते शिवाजी महाराज यांचे वडील शहाजीराजे भोसले बादशाहीत सरदार होते. हिंदू धर्माच्या कामात पादशाहीत विकल्प आलेवरून म्हाळोजीराजे व शककर्ते शिवाजीराजे यांचे हिंदू धर्म संस्थापन करण्याबद्दल एकमत होऊन बेलभंडार परस्पर देऊन तह जाहला. तेथून

२. शिवभारत, अध्याय ९ वा, श्लोक ५ - ७

पादशाहाचे हुकमतीत न चालता राज्याधी वृद्धीस आरंभ करून प्रांत काबीज करत चालले. तेव्हा मराठी फौजेचा बंदोबस्त करण्याबद्दल पादशाहाकडून मुसलमान सरदार येऊन त्याजबराबर कितीएक युद्धप्रसंग जाहले. त्यात दिवसे दिवस मराठी फौजेस जय प्राप्त जाहला..”[३]

हिंदुराव घोरपडे गजेंद्रगडकर घराण्याच्या कैफियतीत शिवाजी महाराज - म्हाळोजी घोरपडे यांच्या संबंधाचे हेच सूत्र सांगितले आहे : “बादशां तक्त मोडकळीस आल्या समई म्हाळोजीराव घोरपडे व शककर्ते श्रीमन्महाराज शिवछत्रपती यांचा त्यांचा रीनानबंद घडोन ते आपले राज्य स्थापनेचे मसलतीस मदतीबद्दल चाकरीस ठेवले व परम विश्वासाने म्हाळोजीराव घोरपडे यांनी हरएक कामात कितिएक प्रसंगी मरदुमकीची मेहनत व मशागत तलवारीने करून बादशाही फौजा पराभविल्या. त्याजवरून महाराज बहुत संतोशी होऊन राज्ये बे राज्ये आपल्या राज्यात (म्हाळोजीस) मोठे योग्यतेस आणिले.”[४]

उपरिनिर्दिष्ट उल्लेखावरून एक गोष्ट स्पष्ट होते की, शिवाजी महाराजांनी हिंदू धर्माच्या रक्षणासाठी जो स्वराज्य स्थापनेचा उद्योग आरंभिला होता, त्यामुळे महाराष्ट्रातील अनेक कर्तबगार पुरुषांची मने भारावून गेली होती. अशा कर्तबगार पुरुषांपैकी म्हाळोजी घोरपडे हे एक होते. त्यांच्यासारखा पराक्रमी सेनानी शिवाजी महाराजांच्या अनेक मोहिमांत सहभागी असणार; पण साधनांच्या अभावी त्यांच्या कामगिरीचा स्पष्ट आलेख रेखाटता येत नाही. एक गोष्ट मात्र निश्चितपणे प्रतित होते आणि ती म्हणजे म्हाळोजी हे शिवाजी महाराजांच्या सेवेतील एक निष्ठावंत व शूर

---

३. करवीर सरदारांच्या कैफियती, पृ. १७
४. कित्ता, पृ. १६२

सेनानी होते.

शिवाजी महाराजांनी आपल्या कारकिर्दीच्या शेवटी संभाजी राजांस पन्हाळगडी ठेविले होते, त्यावेळी युवराजांवर नजर ठेवण्याचे मोठ्या जोखमीचे व नाजूक काम महाराजांनी म्हाळोजीवर सोपविले होते. एका अस्सल सनदेमधील म्हाळोजीवर सोपविलेल्या या कामगिरीचा उल्लेख असा आलेला आहे -

"श्री शिव छत्रपती शककर्ते महाराज यांनी राज्यास प्रारंभ केला, त्यासमयी घोरपडे यांचा पुरुष महालोजी हे छत्रपतिपाशी पाचशे स्वारानिशी चाकरीस राहिले. काही दिवसांनी महाराज यांचे ज्येष्ठ पुत्र संभाजी महाराज हे पन्हाळ्यावर होते. महालोजी घोरपडे यास स्वारांसुद्धा पन्हाळ्यास छत्रपतींनी पन्हाळा किल्ल्याचे सरनोबती देऊन संभाजी महाराज याजपाशी ठेविले. पुढे शिवाजी महाराज यांचा रायगडी काळ जाहला. नंतर संभाजी महाराज यांनी म्हाळोजीबुवा घोरपडे पन्हाळ्यावर ठेवून आपण रायगडास गेले."[५]

वरील उल्लेखावरून स्पष्ट होते की, शिवाजी महाराजांच्या कारकिर्दीत पन्हाळ्यासारख्या महत्त्वाच्या किल्ल्याची सरनौबती म्हाळोजींना दिलेली होती आणि त्याचबरोबर वडिलकीच्या नात्याने त्यांनी संभाजी राजांवर देखरेख करावी, अशीही खास कामगिरी त्यांच्यावर सोपवलेली होती.

## स्वामिकार्यावर प्राणार्पण

संपूर्ण संभाजी काळात म्हाळोजी घोरपडे हे पन्हाळगडावरील सरनौबत म्हणूनच काम पाहत होते, असे

---

५. कापशीकर सेनापती घोरपडे घराण्याचा इतिहास, पृ. २७

दिसते.[६]

संभाजी महाराजांच्या कारकिर्दीच्या शेवटी पन्हाळा - खेळणा प्रदेशातील शिर्क्यांच्या बंडाचा मोड करण्यासाठी काढलेल्या मोहिमेत म्हाळोजी सामील होते.

शिर्क्यांचा पाडाव करून खेळण्याहून रायगडाकडे जात असता संगमेश्वर मुक्कामी मोगल सेनानी शेख निजाम याने टाकलेल्या छाप्यात संभाजी महाराज पकडले गेले. याप्रसंगी संभाजी महाराजांबरोबर कवि कलश, खंडो बल्लाळ, म्हाळोजी, संताजी अशी अनेक नामांकित मंडळी व थोडेबहुत सैन्य होते. या सैन्याची मोगली सैन्याशी जी लढाई झाली, तिच्यात म्हाळोजी स्वामिकार्यावर खर्ची झाले. घोरपडे घराण्यातील वीर पुरुषाने हिंदवी स्वराज्याच्या व छत्रपतीच्या रक्षणासाठी केलेले हे पहिले आत्मबलिदान होते.[७]

***

६. म्हाळोजी हे पन्हाळगडाचे सरनौबत होते. "सरनौबत" या शब्दाचा मूळ अर्थ सेनापती असा जरी असला, तरी "सर्व लष्कराचा प्रमुख" अशा अर्थाने तो येथे आलेला नाही. प्रमुख किल्ल्यांवर सरनौबत, तट सरनौबत असे किल्ल्याच्या संरक्षणाची जिम्मेदारी बाळगणारे लष्करी अधिकारी असत. अशाच एका अधिकाऱ्यांपैकी म्हाळोजी एक होते; पण म्हाळोजींचा उल्लेख सरनौबत असा आढळल्याने व पुढे त्याचे पुत्र संताजी सेनापती बनल्याने वा. सी. बेंद्रेसारख्या संशोधकांनीही असा ग्रह करून घेतला, की हंबीरराव मोहितेच्या मृत्यूनंतर संभाजी महाराजांनी म्हाळोजीस सरनौबत - सेनापती - म्हणून नेमले. (छत्रपती संभाजी महाराज, पृ. १३२, ६०७) वास्तविक म्हाळोजींस सरनौबत हे पद यापूर्वीच शिवाजी महाराजांनीच दिलेले होते, हे आपण पाहिलेच आहे.

७. सेनापती घोरपडे कापशीकर यांच्या कैफियतीत म्हाळोजी घोरपडे स्वामिकार्यावर कसे ठार झाले, याचा वृत्तांत दिला आहे - "(औरंगजेब बादशहाने) संभाजी महाराजांचा बंदोबस्त करण्याबद्दल फौज ठेविली. तेव्हा संभाजी महाराज संगमेश्वर मुक्कामी होते. हे वर्तमान म्हाळोजी घोरपडे यास समजल्यावरून ते महाराजांकडे संगमेश्वरी गेले. तेथे लढाई झाली. म्हाळोजी घोरपडे ठार पडल्यावर संभाजी महाराज यांस धरून नेले" -करवीर सरदारांच्या कैफियती पृ. १८



# ३. संताजी घोरपडे : पूर्वचरित्र

**क्षात्रपरंपरा** व क्षात्रतेज लाभलेल्या घोरपडे घराण्यात सेनापती संताजी घोरपडे याचा जन्म झाला होता. संताजीच्या जन्माचे साल इतिहासाला ज्ञात नाही; पण ते इ. स. १६४५ च्या सुमाराचे असावे, असा तर्क बांधावयास हरकत नाही. हा काल महाराष्ट्राच्या राजकीय व सांस्कृतिक जीवनाच्या दृष्टीने अत्यंत महत्त्वपूर्ण होता. कारण याच सुमारास शिवाजी महाराजांनी मराठ्यांच्या राज्याची संस्थापना केली आणि महाराष्ट्रातच नव्हे, तर दक्षिणेत एक नवे पर्व सुरू केले. या महान कार्यात शिवाजी महाराजांबरोबर संताजीचे पिते म्हाळोजी घोरपडेही सहभागी होते. स्वाभाविकच स्वराज्यनिष्ठेचे व स्वातंत्र्यप्रेमाचे उदात्त संस्कार संताजीस बालपणीच मिळाले होते.

## चरित्राचे दोन कालखंड

संताजीच्या चरित्राचे प्रामुख्याने दोन कालखंड पडतात. पहिला कालखंड म्हणजे संताजीची शिवाजी महाराज व संभाजी महाराज यांच्या कारकिर्दीतील कामगिरी व दुसरा कालखंड म्हणजे त्याची राजाराम महाराजांच्या कालातील त्याच्या मृत्यूपर्यंतची (स. १६९७) कामगिरी. या दोन्ही कालखंडांपैकी पहिल्या कालखंडातील संताजीच्या कामगिरीचे उल्लेख फार कमी मिळतात. त्याचे पहिले मुख्य कारण असे की, शिवकालीन ऐतिहासिक साधनांची कमतरता आणि दुसरे कारण असे की, हा कालखंड म्हणजे संताजीच्या उमेदवारीचा कालखंड होता.

या पहिल्या कालखंडात संताजी हंबीरराव मोहितेसारख्या सेनानीच्या हाताखाली लष्करी मोहिमांत वावरताना दिसतो.

शिवकालात त्यास एखादी मोहीम स्वतंत्रपणे दिलेली आढळत नाही; पण संभाजी महाराजांच्या हत्येनंतरच्या कालखंडात मात्र तो अनेक मोहिमांत आश्चर्यचकित करणारे पराक्रम करणारा मराठ्यांचा

सर्वश्रेष्ठ सेनानी ठरल्याचे दिसून येते.

या दुसऱ्या कालखंडातील, म्हणजे राजाराम महाराजांच्या कारकिर्दीतील संताजीचे पराक्रम म्हणजेच संताजीचे चरित्र आहे. असे जरी असले, तरी संताजीच्या जीवनगाथेस पूर्णत्व येण्याच्या दृष्टीने त्याची पूर्वकालातील कामगिरीही समोर मांडणे अगत्याचे आहे.

## सेनापती हंबीररावाची शिफारस

लष्करी मोहिमेत असताना संताजीच्या लष्करी गुणांकडे पहिल्यांदा लक्ष गेले ते शिवाजी महाराजांच्या हंबीरराव मोहिते या महान पराक्रमी सेनापतीचे. स. १६७४ साली प्रतापरावांच्या मृत्यूनंतर त्याच्या जागी महाराजांनी हंसाजी उर्फ हंबीरराव यास नेमले होते.

या हंबीररावाच्या हाताखाली जे अनेक पराक्रमी लोक वाढले त्यात संताजी हा प्रमुख होता. हंबीररावाने संताजीच्या ठिकाणी असलेले लष्करी कर्तृत्व अचूकपणे हेरले होते. म्हणून अशा गुणी तरुणास महाराजांनी आपल्या लष्करात घोडदळाच्या जुमलेदाराची जागा द्यावी, अशी शिफारस हंबीररावाने केली होती. मल्हार रामराव चिटणीस म्हणतो, "अहमदाबाद प्रांतापर्यंत जाऊन मुलूक लुटून शहरे मारीत खंडणी घेऊन (हंबीरराव) नर्मदातीराकडून बराणपुरी आले. खानदेशीची खंडणी करून माहूर तालुकियात जाऊन तेथील खंडणी केली. जालनापूर, शिंदखेड येथील खंडणी घेऊन गंगातिरी देशी आले. तो दिलेरखान व आणखी उमराव चालून आले... त्यास दबाऊन यश घेऊन महाराजांचे दर्शनास आले... महाराज बहूत संतोष झाले... संताजी घोरपडे यांणी कामे बहूत केली. शिपाई मर्द जाणोन हंबीरराव यांणी विनंती केलियावरून तैनात जाजती करून जुमलेदारी दिल्ही...."[१]

---

१. चिटणीसकृत श्री शिवछत्रपतींचे सप्तप्रकरणात्मक चरित्र, पृ. १७२ - १७३. ही जुमलेदारी घोडदळातील पागा या विभागातील होती. कित्ता, पृ. २०३. पागा म्हणजे सरकारी घोडदळ. पागेची श्रेणी अशी असे - २५ बारगिरांवर १ हवालदार, ५ हवालदारांवर १ जुमलेदार, १० जुमलेदारांवर १ हजारी, ५ हजारीवर १ पंचहजारी आणि सर्व पंचहजारींवर लष्करप्रमुख, सरनौबत अथवा सेनापती. पागेच्या जुमलेदारास दरसाल ५०० होन वेतन व पालखीचा मान असे - Shivaji & His Times, pp. 363 -364.

कृष्णाजी अनंत सभासदानेही आपल्या बखरीत शिवाजी महाराजांच्या राज्याची मोजदाद दिलेली आहे, त्यात पागा (घोडदळ) शिलेदार या सदराखाली शिवकालीन नामवंत सेनानींची नावे दिलेली आहेत. आनंदराव, उदाजी पवार, गणोजी शिर्के, धनाजी जाधव, संताजी जगताप, नेताजी पालकर, परसोजी भोसले, मानाजी मोरे, येसाजी काटकर या पराक्रमी सेनानींबरोबर संताजी घोरपड्याचाही उल्लेख आढळतो.[२]

## संताजीने तलवार गाजविली

स. १६७७ साली शिवाजी महाराजांनी कर्नाटकातील प्रदेश जिंकण्याची मोहीम हाती घेतली. या मोहिमेत तुंगभद्रेच्या उत्तरेकडील कोपल प्रांत जिंकणे हीही एक योजना होती. कोपल प्रांतावर आदिलशाही सुभेदार हुसेनखान मियाणा व कासिमखान या पठाण बंधूंची सत्ता होती. त्यांच्या विरुद्ध महाराजांनी हंबीररावास ससैन्य रवाना केले. हंबीररावाने हुसेनखानास पराभूत करून कैद केले आणि मोठा विजय प्राप्त केला. या मोहिमेत हंबीररावाबरोबर संताजी असून, त्याने मोठी तलवार गाजविल्याचे इतिहास सांगतो. एक्याण्णव कलमी बखर म्हणते, "त्या उपर विज्यापूरच्या पातशाहाची फौज हंबीरराऊ सेनापति याजवर वाटेस आडवी (आली.) प्रथम हुसेनखान मायेणा दाहा हजार फौजेनिसी युद्धास आला....युद्ध बहुत जाले. हुसेनखान मायेणा पाडाऊ केला. फौज कुल बुडविली... त्याउपर तेच समई किले कोपल व बहादूरबिंडा किला घेतला. हंबीरराऊ त्यासमागमे संताजी घोरपडे व बहीरजी घोरपडे यांणी तलवार केली म्हणून नावाजिले"...[३]

## महाराजांची इतराजी

यानंतर संताजीच्या शिवकालातील कामगिरीचा उल्लेख येतो तो जालन्याच्या स्वारीच्या संदर्भात. जालन्याची स्वारी ही शिवाजी महाराजांच्या कारकिर्दीतील शेवटची स्वारी. या स्वारीत जालना शहर

---

२. सभासदकृत छत्रपती श्री शिवाजीराजे यांची बखर, पृ. ९८

३. श्री शिवछत्रपतींची ९१ कलमी बखर, कलम ८४ व ८५, पृ. ५५

चार दिवस मराठ्यांनी लुटले आणि प्रचंड संपत्ती पैदा केली; पण ही लूट घेऊन परतताना रणमस्तखान या मोगल सरदाराने मराठ्यांच्या पिछाडीवर हल्ला चढविला. महाराजांच्या लष्करातील पराक्रमी सेनानी सिधोजी निंबाळकर हा पिछाडी सांभाळत होता. त्याने आपल्या पाच हजार सैन्यानिशी खानाशी तीन दिवस लढाई दिली. तिच्यात तो रणांगणी ठार झाला. दरम्यान केसरीसिंग व सरदारखान हे दोन मोगल सरदार औरंगाबादेहून रणमस्तखानाच्या मदतीस धावून आले. तथापि मोगलांचे हे दुसरे सैन्य येण्यापूर्वीच महाराजांनी चपळाईने माघार घेतली व सतत तीन दिवस कूच करून ते पट्टा किल्ल्यावर सुखरूप पोहोचले. या धावपळीत बरीच लूट शत्रूच्या हाती पडली. चार हजार घोडेस्वार धारातीर्थी पडले. खुद्द हंबीरराव सेनापतीही जखमी झाले. एकूण या मोहिमेत मराठ्यांचे जबर नुकसान झाले. या मोहिमेत संताजी मराठी लष्करात होता. विशेष म्हणजे याप्रसंगी त्याने लढाई करताना उतावळी केली म्हणून त्याजवर ठपका आला.

बखरकार म्हणतो, "त्याउपर फौज कुल घेऊन कसबे जाल्हापूर (जालना) मारिले. फकीरास कस्टी केले. द्रव्य घेतले. ते समई रणमस्तखान धावोन आला. युद्ध जाले. सिदोजी निंबाळकर पंचहजारी त्यास गोला लागोन पडताच राजे रातोरात किले पटियास फौजेसह वर्तमान आले. गडाचे नाव विश्रामगड ठेविले. मानाजी मोरे व संताजी घोरपडे यांजवर इतराज जाले. युद्धसमई उतावेली (केली) म्हणून मजुरियास येऊ दियले नाही"[४] (नोव्हें. १६७९).

संताजीने युद्धसमयी कोणती उतावळी केली याचा तपशील बखरकाराने काही दिलेला नाही; पण अशी उतावळी केल्यामुळे इतराजी होऊन त्यास व मानाजी मोरे यास मुजऱ्यास न येण्याची शिक्षा महाराजांनी फर्माविली, हे तो सांगतो. वास्तविक जालन्याची स्वारी ही महाराजांच्या गनिमी काव्याच्या पद्धतीनेच केली गेली. अशा पद्धतीच्या लढाईत अचूक हालचाली, सुरक्षित व शिस्तबद्ध माघार या गोष्टींना महत्त्व असते. अशा

४. श्री शिवछत्रपतींची ९१ कलमी बखर, कलम ८८, पृ. ५५

वेळी एखादी लहानशी चूकही सर्व लष्कराला भोगावी लागते. संताजीने शिवाजी महाराजांच्या तालमीत वाढत असता, जसे पराक्रम केले, तशा चुकाही केल्या असतील; पण अशा चुकांतून संताजी युद्धनीतीचे, विशेषतः गनिमी युद्धनीतीचे धडे शिकत गेला आणि त्यातूनच मराठी राज्याच्या ऐन संकट प्रसंगी त्यास तारणारा गनिमी काव्याचा महान सेनानी म्हणून त्याची जडणघडण होत गेली.

## पठाण, बेरड बंडखोरांचा पाडाव

संताजीच्या शिवकालीन कामगिरीपेक्षा संभाजीकालीन कामगिरीचे अधिक संदर्भ मिळावयास हवे होते. तथापि दुर्दैवाने ऐतिहासिक साधनांभावी संताजीच्या संभाजीकालीन हालचालींविषयी विशेष माहिती मिळत नाही. कापशीकर घोरपडे घराण्याच्या दप्तरात संभाजी महाराजांनी संताजीस स. १६८२ साली दिलेली एक महत्त्वाची सनद उपलब्ध आहे. त्यात म्हटले आहे की, संताजीने कर्नाटकातील पठाण, बेरड इत्यादी बंडखोरांविरुद्ध बारा हजार सैन्यानिशी मोहीम काढली आणि सतत तीन महिने संघर्ष करून त्यांचा पराभव केला. सनदेतील महत्त्वाचा मजकूर असा :

"…. क्षत्रिय कुलावतंस श्री शंभु छत्रपती स्वामी याणी राज्यमान्य राजश्री संताजी घोरपडे यांसी आज्ञा केली ऐसी जे पठाण मुसलमान बेरड वगैरे लोक xxxx ठाणी घालून सात हजार घोड्यांची व फौजेची xxxx करून आपला देश काबीज करीत चालून मुलखात xxxx[५] अडविले वेळोवेळी साह्य होत नसता तुम्ही काटकरांची वगैरे बारा हजार सेना जमवून तीन महिने लढाई करून सर्व शत्रूचा पराजय केला आणि तुंगभद्रा पावेतो मुलूख काबीज करून आपली ठाणी सर केली. हा उपयोग राज्याचा चांगला केला आणि सर्व सरकारांत चाकरी हिमतीने आणि इमानाने केली व आपला प्राण रक्षण करून आमचे रक्षण केले…"[६] (१६ जाने.१६८२).

५. मूळ कागद फाटला आहे.
६. कापशीकर सेनापती घोरपडे घराण्याची कागदपत्रे, पृ. १७

संताजीच्या या उत्तर कर्नाटकातील लष्करी मोहिमेविषयी अन्यत्र काही माहिती मिळत नाही. अन्य तशी काही साधने उपलब्ध झाल्यास संभाजीकालातील या महत्त्वाच्या लष्करी मोहिमेवर प्रकाश पडेल.

## संभाजी महाराजांच्या कैदेच्या प्रसंगी

संभाजीकालीन मराठ्यांच्या हालचालींमध्ये[७] संताजीचा शेवटचा आणि महत्त्वाचा निर्देश होतो तो संभाजी महाराजांच्या संगमेश्वर मुक्कामी झालेल्या कैदेच्या प्रसंगीचा. आप्तस्वकीय असणाऱ्या शिर्क्यांचे बंड मोडून संभाजी महाराज व कवि कलश विशाळगडाहून रायगडाकडे जात असता त्यांनी संगमेश्वरावर मुक्काम केला होता. या मुक्कामी बातमी राखून कोल्हापूरचा मोगली ठाणेदार शेख निजाम याने त्यांच्यावर अचानक छापा टाकला. या प्रसंगी संभाजी महाराजांबरोबर कवि कलश, म्हाळोजी घोरपडे, खंडो बल्लाळ, संताजी घोरपडे व सैन्याची एक छोटी तुकडी होती. मोगली सैन्याची चाहूल लागताच संभाजी महाराज हाताशी असणाऱ्या सैन्यानिशी शत्रूस तोंड देण्यासाठी संगमेश्वराबाहेर पडले; पण शत्रू संख्येने अधिक असल्याने त्यांचा निभाव लागला नाही. या चकमकीत म्हाळोजी घोरपडे ठार झाले. कवि कलश जखमी झाला.

---

७. डॉ. कमल गोखले यांनी आपल्या " शिवपुत्र संभाजी" या ग्रंथात संताजीच्या संभाजीकालीन सन १६८७-८८ च्या कर्नाटकातील हालचाली दिलेल्या आहेत. वस्तुतः त्या हालचाली संताजी घोरपडे याच्या नसून त्या संताजी भोसले या शिवाजी महाराजांच्या सावत्र बंधूच्या आहेत. संताजी भोसले हा शहाजीराजे भोसले यांच्या नरसाबाई नावाच्या नाटकशाळेचा पुत्र होता. शिवाजी महाराजांनी जेव्हा कर्नाटकातील जिंजी वगैरे प्रदेश जिंकला तेव्हा त्या प्रदेशावर रघुनाथपंत हणमंते, संताजी भोसले इत्यादी मराठा अधिकारी नेमले. हा संताजी भोसले पुढे संभाजीकालात हरजी राजे महाडिक, केसो त्रिमल यांच्याबरोबर कर्नाटकात मराठी लष्कराचे आधिपत्य करून मराठी प्रदेशांचे संरक्षण करताना दिसतो. मद्रासकर इंग्रजांच्या कागदपत्रांत या संताजी भोसलेचा उल्लेख फक्त संताजी/संतोजी असा आल्याने डॉ. गोखल्यांचा घोटाळा झालेला आहे, असे वाटते. वा. सी. बेंद्रे यांनी मात्र आपल्या संभाजी चरित्रात या सर्व हालचाली संताजी भोसले याच्याच म्हणून दिलेल्या आहेत. पाहा - शिवपुत्र संभाजी, पृ. ३३३, ३३६, ३३७, ३३९, ३४१. छत्रपती संभाजी महाराज, पृ. १४, ३१, १२३-१२४, ५१८, ५२९, ५३३, ५३६, ५४१, ५४६, ५४८.

मराठ्यांची दाणादाण उडाली. संभाजी महाराज व त्यांचे सहकारी यांनी संगमेश्वरात ठिकठिकाणी आश्रय घेतला. दुर्दैवाने संभाजी महाराज कवि कलशासह पकडले गेले. मराठ्यांमध्ये मोठा हाहाकार माजला. शत्रूच्या संख्येपुढे संताजी व खंडो बल्लाळसारख्या एकनिष्ठ सेवकांचाही निरुपाय झाला व शेवटी हतबल होऊन शत्रूच्या तावडीतून वाचलेल्या आपल्या सहकाऱ्यांसह ते रायगडी कसेबसे पोहोचले. संभाजी महाराज पकडले गेल्याची वार्ता बहुधा त्यांनीच रायगडावर प्रथम आणली असावी."[८]

***

८. चिटणीस घराण्याची संक्षिप्त माहिती व सनदपत्रे, पृ. ६; छत्रपती संभाजी महाराज, पृ. ६०७



# ४.
# महान संकटकालातील संताजीचे पराक्रम

## स्वराज्यावरील महान संकट

विशाळगडाहून रायगडाकडे येत असता संगमेश्वर मुक्कामी संभाजी महाराज पकडले गेले, ही वार्ता समस्त महाराष्ट्राला धक्का देणारी ठरली. मराठ्यांच्या हिंदवी स्वराज्यावर कोसळणाऱ्या संकटांची जणू मालिकाच आता सुरू झाली. राजधानी रायगडावर जेव्हा ही वार्ता येऊन थडकली असेल, तेव्हा तेथे केवढा हाहाकार उडाला असेल, याची आपण कल्पनाही करू शकत नाही! मराठ्यांचे पहिले छत्रपती आग्र्यास मोगली बादशाहीच्या गुहेत जाऊनही अद्भुतरीत्या महाराष्ट्रात परत आले; पण त्यांचाच पुत्र स्वतःच्याच प्रदेशात शत्रूकडून पकडला गेला, हा केवढा दैवदुर्विलास होय!

संगमेश्वराहून संभाजी महाराज व कवि कलश यांना घेऊन शेख निजाम एवढ्या वेगाने त्या प्रदेशातून बाहेर पडला की, विशाळगडाच्या परिसरातील मराठी लष्करी तुकड्यांना त्याची बातमीही मिळू शकली नाही. परिणामी कोणी मराठी लष्कराने शेख निजामाचा पाठलाग करण्यापूर्वीच तो या राजबंद्यांसह औरंगजेब बादशहाच्या समोर हजर झाला. मोगली छावणीतील संभाजीराजांचे भवितव्य हे जवळजवळ ठरल्यासारखे होते. ते आता जिवंत राहणे, ही गोष्ट असंभवनीय होती.

अशा प्रकारे संपूर्ण मराठी राज्यावरच मोठा बिकट प्रसंग आला होता. संभाजी महाराजांची राणी येसूबाई यांच्यावर तर आकाशाची कुऱ्हाडच कोसळली होती; पण अशाही परिस्थितीत या मराठ्याच्या राणीने विलक्षण मनोधैर्य दाखविले. वैयक्तिक दुःख बाजूला ठेवून संभाजी महाराजांच्या कैदेने निर्माण झालेल्या अभूतपूर्व अशा परिस्थितीवर मात करण्यासाठी येसूबाईंनी रायगडावरील राजकारणाची सूत्रे हाती घेतली. त्यांनी पहिली महत्त्वाची गोष्ट केली, ती

म्हणजे रायगडाचा किल्लेदार चांगोजी काटकर यास हाताशी धरून त्यांनी राजाराम महाराजांचे मंचकारोहण केले आणि त्यांना हिंदवी स्वराज्याचा प्रमुख म्हणून, छत्रपती म्हणून घोषित केले-(९ फेब्रु., १६८९). संभाजीपुत्र शाहूराजे यांचे वय सात वर्षांचे होते. राजाराम महाराजांचे वय एकोणीस वर्षांचे होते. अशा वेळी शाहूराजांस छत्रपती म्हणून घोषित करून राज्याची सर्व सूत्रे आपल्या हाती येसूबाईंना घेता आली असती; पण तसे न करता राज्याचे हित नजरेसमोर ठेवून अत्यंत निःस्वार्थीपणे त्यांनी आपणहून पुढाकार घेऊन राजाराम महाराजांच्या हाती राज्याची सूत्रे दिली.

## रायगडावरील राजकारणी मसलत

राजाराम महाराजांच्या मंचकारोहणानंतर एक महिन्याने ११ मार्च रोजी तिकडे बादशाहा छावणीत संभाजी महाराजांची हालहाल करून हत्या करण्यात आली. सर्व महाराष्ट्र या घटनेने थरारून गेला. बादशाही छावणीत आनंदोत्सव साजरा होत असता महाराष्ट्राच्या भूमीवर मात्र निराशेचा अंधकार पसरत होता. अशा परिस्थितीत राजधानी रायगडावर स्वराज्यातील प्रमुख मातब्बर मंडळी जमू लागली होती. त्यामध्ये प्रल्हाद निराजी, रामचंद्रपंत, शंकराजी नारायण, निळो मोरेश्वर, जनार्दनपंत हणमंते, राहुजी सोमनाथ, खंडो बल्लाळ हे प्रमुख मुत्सद्दी, तर संताजी घोरपडे, धनाजी जाधव, मानाजी मोरे, हंबीरराव मोहिते सरलष्कर[१], रूपाजी भोसले, बहिर्जी घोरपडे, मालोजी घोरपडे, विठोजी चव्हाण हे प्रमुख सेनानी यांचा समावेश होता. राजघराण्यातील ज्येष्ठ व्यक्ती म्हणून राणी येसूबाईंकडे सर्व जण मार्गदर्शक देवता म्हणून पाहात होते. रायगडावर जमलेल्या सर्व मुत्सद्द्यांनी व सेनानींनी त्यांच्याकडे जाऊन सल्लामसलत मागितली. तेव्हा अत्यंत दूरदृष्टीने त्यांनी मसलत सांगितली की, आपण स्वतः शाहूराजांसह रायगड लढवू; तथापि राजघराण्यातील सर्वांनीच एकत्र राहून इथे अडकून पडण्यापेक्षा राजाराम महाराजांनी प्रमुख मंडळींसह गडाबाहेर पडावे आणि शत्रूशी

१. हा राजारामकालात उदयास आलेला मराठ्यांचा एक शूर सेनानी होय. याचे उल्लेख फारसी कागदपत्रांत मिळतात.

संघर्ष चालू ठेवावा आणि तशीच परिस्थिती उदभवल्यास, कर्नाटकात जावे व तेथून संघर्ष चालू ठेवावा. राणी येसूबाईंची ही मसलत सर्वांना मान्य होऊन त्याप्रमाणे राजाराम महाराजांनी रायगडाबाहेर पडण्याचे ठरले.[२]

## संताजीचा प्रमुख नेता म्हणून उदय

दरम्यान औरंगजेब बादशहाने वजीर असदखानाचा पुत्र एतिकादखान उर्फ जुल्फिकारखान यास रायगडास वेढा घालून मराठ्यांचे संपूर्ण राजघराणेच कैद करण्यासाठी रवाना केले होते. खानाने बादशाही आज्ञेनुसार गडास वेढा घालण्याचे काम हाती घेतले होते. हा वेढा अधिक कडक होण्यापूर्वीच राजाराम महाराजांनी गडाबाहेर पडणे आवश्यक होते. त्याप्रमाणे येसूबाई व शाहूराजे यांचा निरोप घेऊन ते गडाबाहेर पडले. त्यांच्यासोबत ताराबाई व राजसबाई या त्यांच्या राण्या व प्रल्हाद निराजी, संताजी व धनाजी ही राज्यातील प्रमुख मंडळीही होती - (५ एप्रिल, १६८९).

येथून पुढे राजाराम महाराजांची कारकीर्द सुरू होते व त्याचबरोबर संताजी घोरपडेचेही खरे कर्तृत्व सुरू होते. आतापर्यंत संताजी हा राज्यातील दुय्यम स्थानावरील लष्करी अधिकारी मानला जात होता. आता राजाराम महाराजांच्या कारकिर्दीत तो प्रल्हाद निराजी, रामचंद्रपंत, शंकराजी नारायण यांसारख्या प्रथम श्रेणीच्या अधिकाऱ्यांत गणला जाऊ लागला.

म्हाळोजी घोरपडे रणांगणी पडल्यावर घोरपडे घराण्यातील ज्येष्ठत्वाचा वारसा संताजीकडे सहजी चालत आला होता आणि दुसरे असे की, संभाजीराजांच्या हत्येने निर्माण झालेल्या असाधारण परिस्थितीत संताजीसारख्या पराक्रमी पुरुषास आपल्या अंगीचे गुण दाखविण्यास मोठी संधी प्राप्त झाली होती. राष्ट्र संकटात असता प्रतिकूल परिस्थितीतही जो पुरुषार्थ दाखवितो व आपल्या कर्तृत्वाने राष्ट्रास तारून नेतो त्याचेच नाव अल्पावधीत सर्वतोमुखी होते.

---

२. चिटणीसकृत राजाराम महाराजांचे चरित्र, पृ. २ - ३

## बादशाही छावणीचे कळस कापले!

रायगडाहून राजाराम महाराज प्रथम प्रतापगडास आले. ते राजधानीबाहेर पडल्याची बातमी मोगलांना समजताच त्यांनी तिकडे धाव घेऊन प्रतापगडास वेढा दिला. तेव्हा तेथेही फार काल न थांबता राजाराम महाराज वासोटा - सातारा - परळी असे मुक्काम करीत पन्हाळ्यास आले - (ऑगस्ट १६८९). राजाराम महाराज ज्या गडावर जात तिकडे मोगली फौजा त्यांना पकडण्यासाठी धावत. आता त्यांनी पन्हाळ्यासही वेढा दिला. स्वराज्यातील इतर गडांनाही वेढे पडले होते. त्यांपैकी अनेक मोगलांच्या ताब्यात गेले होते. काही अद्यापही मोगलांशी झगडत होते. किल्लेदार व ठाणेदार यांनी घाबरून न जाता मोगलांशी दोन हात करावेत, म्हणून राजाराम महाराज त्यांचे नीतिधैर्य वाढवीत होते; पण मोगली आक्रमणाची लाटच एवढी जबरदस्त होती की, मराठ्यांचे हे सर्व प्रयत्न निष्फळ होत होते. अशा वेळी रणांगणावरील आपल्या भीम पराक्रमाने संताजी व धनाजी यांनी सामान्य मराठ्यांचे नीतिधैर्य उंचविण्याचा महान प्रयत्न केला.

संभाजी महाराजांची हत्या केल्यापासून औरंगजेब बादशहा भीमा नदीकाठी कोरेगाव (तुळापूर) येथे छावणी करून होता[३] आणि तेथून तो महाराष्ट्रातील गडकोट घेण्यासाठी मोहिमा पाठवित होता. या बादशहाच्या छावणीवरच हल्ला चढवावा आणि मोगली आक्रमणाचे केंद्रस्थानच धास्तावून टाकावे, अशी अचाट कल्पना संताजी आणि धनाजी यांना सुचली. त्याप्रमाणे त्यांनी आपल्या फौजा गोळा केल्या व ते शंभू महादेवाच्या डोंगराकडे आले. तेथे ठरले की, बादशाही छावणीवर संताजीने हल्ला करावा व त्याचवेळी फलटण-बारामती भागात असणाऱ्या रणमस्तखान व शहाबुद्दीनखान या खानांचा समाचार धनाजीने घ्यावा. धनाजीने संताजीच्या मदतीस विठोजी चव्हाण हा दुसरा

३. फारसी कागदपत्रांत हा मुक्काम कोरेगाव येथे होता, असे दिलेले आहे, तर मराठी कागदपत्रांत तुळापूर असे दिलेले आहे. वस्तुतः बादशहाची छावणी तुळापूर ते वढू कोरेगावपर्यंतच्या टापूत पसरलेली होती.

शूर सेनानी व दोन हजार स्वार दिले. याशिवाय संताजीचे बहिर्जी व मालोजी हे दोन बंधू सोबत होते. बखरकार मल्हार रामराव याने या प्रसंगाचे फार बहारदार वर्णन केले आहे. ते मुळातूनच वाचण्यासारखे आहे -

"त्या समयी जाधवराव यास संताजी घोरपडे बोलिले की 'पादशहा याची फौज एक-दोन मुक्कामांवर आली आहे. फलटणचे आश्रयास आपण (धनाजीने) लढाई द्यावी. पाठीवर डोंगर असावा. माझ्याबरोबर दोन हजार स्वार सडे एकांडे निवडक द्यावे. शिवाय माझे पथकानिशी तुळापूरचे मुक्कामी जाऊन बरायखुद (स्वतः) पादशाहा याजवर मी छापा घालतो. (आम्ही) मराठे आहोत असे खाशास (औरंगजेबास) कळवून येतो.' याप्रकारे बोलिले असता जाधवराव 'फार चांगले! शाबास!' असे बोलून घोरपडे यांचे खास पथकाशिवाय दोन हजार निवडक एकांडे व विठोजी चव्हाण असे बरोबर दिले."

"तितक्यांनिशी संताजी घोरपडे निघोन डोंगराच्या आश्रयाने जेजुरीस येऊन श्रीचे दर्शन करून दिव्या घाटाखाली जाऊन झाडीत मुक्काम केला. तेथून मध्यरात्रीचे अमलात तुळापूरचे मुक्कामी जावयास मार्गाने जाताना ऐलीकडे तीन कोशावर छबिन्याचे (रात्र पहाऱ्याचे) स्वारांची गाठ पडली. त्यास (संताजीने) सांगितले की, 'पादशहाचे लष्करातील हिंदू सरकार शिर्के व मोहिते वगैरे आहेत त्याजकडील आम्ही छबिन्यास गेलो होतो. मुबादल्यास (बदलीस) आले म्हणून लष्करास माघारे जोतो.' अशी पक्की खूण सांगितल्यावरून त्यांणीही मार्ग दिला."

"यांणी (मराठ्यांनी) लष्करात शिरून छापा घातला. त्या काळी (पादशहाची) लाखो फौज असता दोन-तीन हजार स्वारानिशी छापा घालून बहुत तसनस (हानी) करून पादशाहाचे डेऱ्याचे तनावे तिघे बंधु घोरपडे व चव्हाण यांणी तोडून डेऱ्याचे सोन्याचे कळस दोन्ही घेतले. याजकडीलही (मराठ्यांचे) स्वार थोडे-बहुत पडले. पादशहाचे फौजेचा दुभाग करून गटानिशी निघून सिंहगडचे झाडीत आले. सिंहगडावर

प्रतापराव गुजर याचा लेक सिदोजी गुजर किल्लेदार होते. त्यास वर्तमान कळलियानंतर खाली येऊन यांसि भेटले. यांची बरदास्त केली. जखमी होते ते त्यांच्या स्वाधीन केले. ते किल्ल्यावर नेहले."[४]

सिंहगडाच्या पायथ्याखालील झाडीत दोन दिवस मुक्काम करून आणि आपल्या लष्करास विश्रांती देऊन संताजी रायगडाचे संधान राखून त्या रोखाने घाट उतरला आणि त्याने गडास वेढा देऊन बसलेल्या जुल्फिकारखानाच्या लष्करावर अचानक हल्ला चढविला. लढाई तेज झाली. मोगलांची मोठी हानी करून व त्यांचे पाच हत्ती पकडून संताजी आपल्या लष्करासह त्वरेने माघारी फिरला. मराठ्यांचे आराध्य दैवत छत्रपती शिवाजी महाराज यांच्या नावाचा जयजयकार करीत मराठ्यांनी हे छापे घातले! या दोन्ही छाप्यांत मिळालेले सोनाचे कळस व पाच हत्ती या लुटीसह संताजी आपल्या सोबत्यांनिशी राजाराम महाराजांसमोर मुजरा करून उभा राहिला - (सप्टेंबर १६८९).

मल्हार रामराव म्हणतो, "जुल्फकार यांचे फौजेवर छापा घालून त्याची तसनस करून त्यातील पाच हत्ती घेऊन पारघाट चढून वाई-सातारेवरून पन्हाळेस येऊन (संताजीने) महाराजांचे दर्शन घेऊन पादशहाचे डेऱ्याचे कळस आणलेले पुढे ठेविले. पाच हत्ती पुढे केले. त्या समयी महाराजांची मर्जी बहूत खूश होऊन वस्त्रे, भूषणे देऊन तिघे (घोरपडे) बंधू व चव्हाण यास किताबती दिल्या. प्रथम लढाई शिवाजी महाराजांचे नावावर केली, यश आले आणि पादशहाचे डेऱ्याचे कळस हस्तगत झाले, पाच हत्ती मिळाले, हा संतोष मानून संताजी घोरपडे यास ममलकतमदार (राज्याचा आधार) ही किताबत व दुसरे बंधू बहिरजी घोरपडे यास हिंदूराव म्हणून व तिसरे बंधू मालोजी घोरपडे यास अमीरूलउमराव व विठोजी चव्हाण यास हिंमतबहादर अशा किताबती दिल्या."[५]

राजाराम महाराजांनी वस्त्रे, आभूषणे व सन्माननीय पदव्या

४. चिटणीसकृत राजाराम महाराजांचे चरित्र, पृ. ६ - ८
५. कित्ता, पृ. ८

देऊन संताजीस व त्यांच्या सहकाऱ्यांना नावाजले. संभाजी महाराजांच्या हत्येनंतर निर्माण झालेल्या अंधाऱ्या काळरात्री एखादी विद्युल्लता चमकावी त्याप्रमाणे संताजीचा हा पराक्रम सर्व महाराष्ट्रात चमकला. छत्रपतींच्या दरबारात असणारा ज्येष्ठ मुत्सद्दी रामचंद्रपंत यानेही हा अद्‌भुत पराक्रम पाहून उद्‌गार काढले, "पादशाहाचे डेऱ्याचे कळसच आणून जुल्फकारखान याचे पाच हत्ती आणिले. त्यापेक्षा यांची (संताजीची) मर्दुमी कोठवर वर्णावी?"

## बिदनूरच्या राणीचे रक्षण

संताजी-धनाजी या मराठा सेनानींनी केलेले पराक्रम कितीही अद्‌भुत वाटले, तरी अशा एखाद्या दुसऱ्या विजयाने मोगली फौजा परतवून लावणे अशक्य होते. आदिलशाही व कुतुबशाही गिळंकृत केलेला मोगल शत्रू आता मराठशाही नेस्तनाबूद करण्यास सरसावला होता. त्याच्या आक्रमक पवित्र्यापुढे स्वराज्यातील ठाणेदार व किल्लेदार एकामागून एक याप्रमाणे शरण जात होते. अशा आणीबाणीच्या प्रसंगी कर्नाटकात जाऊन जिंजी येथे राजधानी स्थापण्याचा व तेथून शत्रूशी संघर्ष चालू ठेवण्याचा राजाराम महाराजांनी निर्णय घेतला. या निर्णयामुळे त्यांना पकडण्यासाठी बादशाही फौजांची धाव जिंजीकडे पडणार होती व त्यामुळे महाराष्ट्रावरील शत्रूचा दबाव आपोआपच कमी होणार होता. शिवाय मोगल-मराठा संघर्ष हा महाराष्ट्रापुरताच मर्यादित न राहता मुंबईपासून मद्रासपर्यंतच्या विस्तीर्ण भूप्रदेशावर तो खेळला जाणार होता. युद्धशास्त्रीयदृष्ट्या राजाराम महाराजांचा हा निर्णय अचूक व उचित होता. या निर्णयानुसार त्यांनी आपल्या प्रमुख सल्लागारानिशी जिंजीकडे जाण्यासाठी पन्हाळा सोडला - (२६ सप्टें., १६८९). मोगली फौजांनी गडास वेढा दिला असताही त्यांना सहजी चकवून ते बाहेर पडले. प्रयाणापूर्वी त्यांनी महाराष्ट्रातील स्वराज्याचा कारभार रामचंद्रपंतांकडे सोपविला होता आणि त्यांच्या हाताखाली शंकराजी नारायण, संताजी व धनाजी यांना मदतीसाठी नियुक्त केले होते.[६]

---

६. राजारामचरितम्, सर्ग चौथा, श्लोक ११-१२

जिंजीच्या प्रवासात राजाराम महाराजांबरोबर प्रल्हाद निराजी, मानाजी मोरे, निळो मोरेश्वर, खंडो बल्लाळ, बाजी कदम, कृष्णाजी अनंत इत्यादी मोजकी मंडळी होती. हा प्रवास खडतर व धोक्याचा होता. मार्गातील मोगली ठाणी व लष्करे चुकवीत, नाना प्रकारची वेषांतरे करीत राजाराम महाराज आपल्या सोबत्यांनिशी तुंगभद्रेच्या अलीकडील बिदनूरच्या राणीच्या राज्यात पोहोचले. बिदनूरची राणी चन्नमा ही हिंदू धर्माची मोठी अभिमानी होती. छत्रपती शिवाजी महाराजांनी हिंदू धर्माच्या रक्षणाचे दक्षिणेत केलेले कार्य तिला माहीत होते. अशा शिवाजीराजाचा पुत्र दैवयोगामुळे आपल्या राज्यातून प्रवास करीत असल्याचे तिला समजल्यावरून तिने राजाराम महाराजांचे मोठ्या प्रेमाने स्वागत केले व त्यांस आपल्या राज्यातून प्रवास करीत असता पूर्ण संरक्षण दिले. असे करीत असता आपण औरंगजेब बादशहाचा क्रोध ओढवून घेऊ याची तिला कल्पना असावी. तरीही तिने हे धाडस केले.

राजाराम जिंजीकडे निसटत असता त्यास बिदनूरच्या राणीने आश्रय दिला, ही बातमी बादशहास न समजता राहिली नाही. हिंदुस्थानच्या सम्राटाच्या शत्रूस मदत करणाऱ्या या राणीस शिक्षा करण्यासाठी त्याने जाननिसारखान, मतलबखान व सर्जाखान या तीन शूर सरदारांना त्यांच्या हाताखाली फौज देऊन कर्नाटकात पाठविले; पण ही बातमी संताजीस समजता तो या खानांच्या मागावर निघाला व ते बिदनूरच्या राणीच्या राज्यात जाण्यापूर्वीच त्यांच्यावर त्याने विद्युतप्रहाराप्रमाणे हल्ला चढविला व त्यांच्या फौजांची धूळधाण केली - (ऑक्टो. - नोव्हें. १६८९). मोगल इतिहासकार साकी मुस्तैदखान संताजीच्या या मोहिमेचा वृत्तांत सांगतो :

"बिदनूरच्या राणीने राजारामाला लपवून ठेविले आणि नंतर त्याला सुरक्षितपणे जाऊ दिले असले पाहिजे, असा संशय सर्वत्र पसरला. प्रथम बातमी आली की, राजारामाला पकडण्यात आले आहे. त्याला आणण्यासाठी बादशहाने हमीदुद्दीनखान याची नेमणूक केली; पण नंतर बातमी आली की, राजाराम पळून गेला असून, त्याची माणसे कैद झाली आहेत."

"बिदनूरच्या अस्वलीवर (राणीवर) चालून जाण्याची जाननिसारखान यास आज्ञा करण्यात आली. बिदनूरचे राज्य उद्ध्वस्त करण्यासाठी भली मोठी फौज घेऊन जाननिसारखान रवाना झाला. याच सुमारास सैतान संताजीने जाननिसारखान, मतलबखान, सर्जाखान यांच्याबरोबर युद्धे करून त्यांच्यावर जय मिळविले. राणीवरची मोगलांची मोहीम अयशस्वी झाली. तिच्याकडून दंड म्हणून थोडीशी रक्कम घेऊन ते प्रकरण मिटविण्यात आले. संताजीच्या नशिबात अद्याप काही दिवस राहण्याचे होते. म्हणून तो मोगलांच्या तावडीतून वाचला."[७]

अशा प्रकारे संताजी राणीच्या रक्षणासाठी थांबून गेल्यामुळेच तिचे राज्य वाचले आणि बादशहाने तिचा नाश करण्यासाठी पाठविलेल्या तिन्ही सरदारांना अपयश पदरी घेऊन परतावे लागले.

इकडे कर्नाटकात मार्गातील अनेक संकटांना तोंड देत राजाराम महाराज प्रथम वेल्लोरास व नंतर जिंजीस पोहोचले - (नोव्हें. १६८९). राजाराम महाराजांचे मेहुणे हरजीराजे महाडिक हे कर्नाटकातील मराठी प्रदेशावर प्रमुख कारभारी होते. त्यांचा नुकताच मृत्यू घडून आला होता. तेव्हा आपल्या विधवा बहिणीकडून महाराजांनी जिंजीमधील कारभाराची सूत्रे हाती घेतली. लवकरच तेथे त्यांनी मराठ्यांची कर्नाटकातील नवी राजधानी निर्माण केली. कर वसूल करणे, नव्या अधिकाऱ्यांच्या नेमणुका करणे, ठाणी व किल्ले यांचा बंदोबस्त राखणे, नवे लष्कर उभारणे, मोगलांशी लढण्यासाठी कर्नाटकातील हिंदू नायकांचे सहकार्य मिळविणे यासारखी कार्ये आता जिंजीमध्ये सुरू झाली.

## संभाजी राजांना पकडणाऱ्या शेख निजामास शिक्षा

राजाराम महाराज जिंजीच्या प्रवासात असतानाच इकडे महाराष्ट्रात रामचंद्रपंत, शंकराजी नारायण, संताजी व धनाजी ही चार नेते मंडळी मोगलांनी काबीज केलेला मुलूख सोडविण्याचा जिद्दीने

---

७. मराठे व औरंगजेब (मासिरे आलमगिरी), पृ. ४४ - ४५

प्रयत्न करीत होती. या सुमारास खुद्द रामचंद्रपंताने लष्करी मोहीम काढून पन्हाळगडापासून सातारगडापर्यंतचा मुलूख ठाणे व किल्ले यासह जिंकून घेतल्याचे केशव पंडित हा राजाराम महाराजांच्याबरोबर जिंजीच्या प्रवासात असणारा कवी आपल्या "राजारामचरितम्" या संस्कृत काव्यग्रंथात सांगतो. याच वेळी रामचंद्रपंताने संताजी घोरपडे यास कोल्हापूरच्या परिसरात ठाण मांडून बसलेल्या शेख निजामाला शिक्षा करण्यासाठी पाठविल्याचे केशव पंडित म्हणतो :

*"निजामविजयार्थं यान् संत घोरफडादिनकान्।*
*प्रथमं प्राहिणोत्तैर्हि निजामः परिलुंठितः ॥ ३० ॥*
*गजाश्वादि धनं तस्य बह्वानीतं तदारणात्।*
*भूधरोपत्यकायां तु जीवमात्रावशेषितः ॥ ३१ ॥*
*गतश्रीः शस्त्रभिन्नांगः करवीरं ययौ खलः।*
*तत्तो घोरफडाद्यास्ते समीयुः सचिवांतिकम् ॥ ३२ ॥*

(निजामाला जिंकण्यासाठी पाठविलेल्या संताजी घोरपड्यांदिकांनी प्रथम निजामाचा पराभव करून नंतर त्याचे हत्ती, घोडे व पुष्कळ द्रव्य हरण केले. तेव्हा सर्व ऐश्वर्याचा नाश झाला आहे व सर्वांगावर शस्त्राच्या जखमा झाल्या आहेत, असा तो खल (निजाम) कसाबसा जीव वाचवून पर्वताच्या पायथ्याशी वसलेल्या करवीरास गेला.)[८]

संताजी घोरपड्याच्या या विजयासंबंधी फारसी ग्रंथातही उल्लेख सापडतो. औरंगजेबाचा आणखी एक चरित्रकार ईश्वरदास नागर आपल्या "फुतुहाते आलमगिरी" या ग्रंथात म्हणतो -"मराठे कोल्हापूर भागात पसरले. खानजमान फत्तेहजंगखान (शेख निजाम) हा त्यांच्यावर चालून गेला. कोल्हापुराजवळ मराठ्यांचे व मोगलांचे तुंबळ युद्ध झाले. एक प्रहर आणि चार घटिकांपर्यंत हे युद्ध चालले होते. मराठ्यांचे सुमारे सातशे सैनिक ठार झाले. मोगलांचे चारशे सैनिक

८. राजारामचरितम् : सर्ग दुसरा, श्लोक ३० - ३२

मृत्युमुखी पडले. मराठ्यांचे सैन्य अधिक होते आणि ते ठाण मांडून लढत होते. या युद्धात खान जमान व त्याचा मुलगा खाने आलम यांना तलवारीच्या आणि भाल्याच्या जबर जखमा झाल्या."

"पण पुढे टिकाव न धरून मराठे निघून गेले. बादशहाला युद्धाची हकिकत कळल्यानंतर त्याने महंमद तकीखान याजबरोबर दोन हजार सैन्य देऊन खान जमान याच्या मदतीस पाठविले. खान जमान यास खिलतीची वस्त्रे आणि तलवारही बक्षीस म्हणून देण्यात आली. याशिवाय खान जमान आणि त्याचा मुलगा यांच्या जखमा बऱ्या करण्यासाठी बादशहाने सेब्यास्टियन नावाचा फिरंगी डॉक्टर यास त्याच्याकडे पाठविले."[९]

संभाजी महाराजांना कैद करणारा शेख निजाम तो हाच होय. त्याच्यावर स्वारी काढून संताजीने त्यास जबर जखमी केले. त्याच्या सुदैवाने तो वाचला. कोल्हापूरच्या परिसरात ही लढाई मोठी तेज झालेली दिसते - (ऑक्टो., नोव्हें. १६८९). संताजीप्रमाणे खुद्द शेख निजामानेही या लढाईत चांगला पराक्रम केलेला आहे. खुद्द बादशहाने त्याच्या जखमांवर इलाज करण्यासाठी आपल्या छावणीतून एक फिरंगी डॉक्टर त्याच्याकडे पाठविला. यावरून बादशहाच्या कानावरही या शेख निजामाचा पराक्रम व स्वामिनिष्ठा गेली असणार हे उघड आहे.

## राजधानी रायगडाचा पाडाव

सर्व महाराष्ट्रभर मोगली फौजा धुमाकूळ घालीत असता आणि त्यांना आवर घालून परतविण्याचे कार्य रामचंद्रपंतादी नेतेमंडळी अविरतपणे करीत असता राजधानी रायगडाभोवतीचा वेढा मात्र दिवसेंदिवस अधिक बळकट होत चालला होता. या मंडळींना गडाचा वेढा उठवून जुल्फिकारखानास पिटाळून लावणे शक्य झाले नाही. मोगलांची दक्षिणेत सर्वत्र चलती असल्याने त्यांच्या विजयी फौजांच्यासमोर स्वराज्यातील किल्लेदार व ठाणेदार तग धरू शकत नव्हते. वतनदार मंडळी आपली वतने नव्या राजवटीत चालू राहावीत

९. मोगल - मराठा संघर्ष (फुतूहाते आलमगिरी), पृ. ३५

म्हणून भराभर बादशाही अंमलदारांना भेटत होती. काही बडे वतनदार खुद्द बादशहाकडून सनदापत्रे मिळविण्याच्या उद्योगात गर्क होते. अशा परिस्थितीत रायगडावरील येसूबाई, शाहूराजे, इत्यादींची अवस्था बिकट बनू लागली. एवढ्यात महाराष्ट्रात बातमी पसरली की, राजाराम महाराज कर्नाटकात जात असता तुंगभद्रेच्या तीरावर मोगल सैन्याशी झालेल्या चकमकीत पकडले गेले आणि त्यांना बादशाही छावणीत आणण्यासाठी हमीदुद्दीनखान या सरदारास बादशहाने रवानाही केले आहे. असे वाटते की, या भयंकर बातमीने रायगडावरील मंडळींचे नीतिधैर्य खचले असावे आणि म्हणून रायगड शत्रूच्या ताब्यात देण्याचा विचार त्यांच्या मनात आला असावा. गड जेरदस्त होऊन शत्रूच्या ताब्यात गेल्यास आपल्यास अब्रूने वागविले जाणार नाही, उलट आपणहून गडासह शत्रूच्या ताब्यात गेल्यास निदान प्रतिष्ठेने तरी वागविले जाईल, अशी खात्री वाटल्यावरूनच येसूबाईंनी जुल्फिकारखानाशी वाटाघाटी सुरू केल्या. राजकुटुंबास प्रतिष्ठेने वागविले जाईल, असे पवित्र वचन घेऊनच येसूबाई व शाहूराजे हे आपल्या रायगडावरील सहकाऱ्यांनिशी मोगलांच्या स्वाधीन झाले - (३ नोव्हें., १६८९).

संभाजी महाराजांच्या कैदेपासून सुरू झालेल्या संकटाच्या मालिकेचा शेवट रायगडाच्या पाडावाने व राणी येसूबाई - शाहूराजे यांच्या कैदेने झाला. मराठ्यांचा एक राजा पकडला जाऊन त्यास हालहाल करून मारले गेले; त्याच्यानंतरचा दुसरा नवा राजा कर्नाटकात जिंजी किल्ल्याच्या आश्रयास गेला; मराठ्यांची राणी, राजपुत्र व राजधानी शत्रूच्या ताब्यात गेली; स्वराज्यातील इतर किल्ले व ठाणी मोगली फौजांसमोर पत्त्याचे बंगले कोसळावेत तशी कोसळली! अवघ्या ८/१० महिन्यांत छत्रपती शिवाजी महाराजांनी मोठ्या शर्थीने व पराक्रमाने निर्माण केलेले स्वराज्य जवळजवळ नष्ट झाले ! कालपर्यंत दक्षिणेत जोमाने उभी असणारी व मोगली सत्तेस आव्हान देणारी ही मराठ्यांची सत्ता जमीनदोस्त झाली ! मोगलांना वाटले की, आता मराठ्यांची सत्ता संपली, नष्ट झाली. आता दक्षिणेची मोहीमही संपली व

त्यातील जीवघेण्या यातनाही संपल्या. खुद्द औरंगजेब बादशहालाही तसे वाटले. त्याने दिल्लीतील आपले प्रासाद आपल्या स्वागतासाठी सज्ज करण्याचे हुकूम उत्तरेत पाठविले; पण त्याचे दुर्दैव हे की, तो आपले दिल्लीतील वैभवशाही प्रासाद कधीच आता पाहू शकणार नव्हता. दिल्लीला परतून आपल्या वैभवशाली दरबारात मयूरासनावर बसून अखिल हिंदुस्थानावर आपली सत्ता चालविण्याचे त्याचे स्वप्न हे शेवटपर्यंत स्वप्नच राहिले. कारण महाराष्ट्राच्या भूमीवरून मराठ्यांचे हिंदवी स्वराज्य अदृश्य झाल्यासारखे वाटत असले, तरी मराठी माणसांच्या हृदयपटलांवरून ते नाहीसे झालेले नव्हते!

***



## ५.

# सर्जाखान, लुत्फुल्लाखान, जाननिसारखान यांच्यावरील संताजीचे विजय

स. १६८९ हे साल मराठ्यांच्या इतिहासातील एक काळेकुट्ट पान होते. पुढच्या शतकात स. १७६१ साली पानिपतावरती मराठ्यांवर जी आपत्ती कोसळली त्याहून अधिक स. १६८९ च्या आपत्तीचे स्वरूप भयाण होते. कारण पानिपताच्या आपत्तीने मराठी सत्तेच्या वृक्षाच्या फांद्या छाटल्या गेल्या! पण इथे स. १६८९ साली औरंगजेब बादशहाने मराठी सत्तेच्या मुळावरच घाव घातले होते. फांद्या तुटल्या तर त्या पुन्हा फुटू शकतात; पण वृक्ष मुळासह उपटला गेला, तर त्याचे अस्तित्वच नष्ट होते.

पण सुदैवाने, मराठी सत्तेच्या मुळावर एकामागून एक असे घाव बसत असतानाही त्यास दाद न देता मूळ तगून राहिले, एवढेच नव्हे तर हे जिव्हारी बसणारे घाव पचवून अल्पावधीत मराठी सत्ता पुन्हा जोमाने फोफावू लागली. इतकी की, या सत्तेची मुळे आसपासच्या गुजराथ, माळवा, गोवळकोंडा, कर्नाटक इत्यादी मोगली मुलुखांत घुसून त्यांनी बादशाही सत्तेस खिळखिळी करण्यास प्रारंभ केला. मराठ्यांच्या या थोर कार्याचे श्रेय छत्रपती राजाराम महाराज व त्यांच्या नेतृत्वाखाली मराठी सत्तेचे संरक्षण करणाऱ्या रामचंद्रपंत अमात्य, शंकराजी पंडित सचिव, प्रल्हाद निराजी प्रतिनिधी, खंडो बल्लाळ, संताजी घोरपडे सेनापती, धनाजी जाधव, परशुराम त्र्यंबक, मानाजी मोरे, हंबीरराव मोहिते सरलष्कर, बहिर्जी घोरपडे, विठोजी चव्हाण, नेमाजी शिंदे, कृष्णा सावंत या पराक्रमी पुरुषांना दिले पाहिजे.

विशेष आश्चर्य वाटण्यासारखी बाब म्हणजे संभाजी महाराजांच्या हत्येच्या धक्क्यातून मराठे अपेक्षेपेक्षा फार लवकर सावरले. संभाजीहत्येनंतरच्या पुढच्याच साली म्हणजे एप्रिल-मे १६९० च्या सुमारास मराठ्यांनी एकामागून एक असे मोठमोठे पराक्रम करून मोगली शत्रूच्या ताब्यात गेलेले किल्ले व ठाणी परत जिंकून घेण्याचा सपाटा

लावला. एवढेच नव्हे तर भल्याभल्या नामांकित मोगल सेनानींना गनिमी काव्याच्या पेचात पकडून त्यांच्याकडून लाखो रुपयांच्या खंडण्या वसूल करण्यास सुरुवात केली. थोडक्यात, संभाजी महाराजांच्या हत्येने व रायगडाच्या पाडावाने मराठी सत्ता नष्ट झाली, असा जो समज मोगली लष्कराने, विशेषतः बादशहाने करून घेतला होता तो फोल ठरला. बादशहाला पहिला धक्का मराठ्यांचा सेनानी संताजी घोरपडे याने दिला.

मराठ्यांच्या ऐन पडत्या काळात त्यांची बाजू सावरून धरून खुद्द दिल्लीपतीवरच बाजू उलटविण्याचे संताजीचे कार्य म्हणजे मराठ्यांच्या इतिहासातील एक अविस्मरणीय प्रकरण आहे.

### सर्जाखानावर प्रचंड विजय : खान कैद

सह्याद्रीच्या पूर्व भागात शेवटच्या फाट्यावर वसलेला साताऱ्याचा किल्ला हा देश व कोकण यांच्या सीमेवरील महत्त्वाचा दुवा समजला जात असे. सिंहगड-राजगडापासून ते पन्हाळा-विशाळगडापर्यंत पसरलेल्या मराठी राज्याच्या मध्यभागी उभ्या असलेल्या या किल्ल्यास जिंकून घेण्यास बादशहाने सर्जाखान उर्फ रुस्तुमखान या नामांकित सरदारास मोठ्या फौजेनिशी पाठविले होते. सर्जाखान हा पूर्वी आदिलशाही दरबारातील मोठा पराक्रमी सेनानी होता. आदिलशाही वाचविण्याचा त्याने मोठा जिद्दीचा प्रयत्न केला होता आणि शेवटी आदिलशाहीचा अस्त झाल्यावर त्याने मोगल बादशाहीची सेवाचाकरी स्वीकारली होती.

असा हा सर्जाखान सातारा किल्ला घेण्याच्या इराद्याने स. १६९० च्या सुरुवातीस त्यास वेढा देऊन बसला होता. त्यावर स्वारी काढून त्यास शास्त करण्याची मोहीम रामचंद्रपंत, शंकराजी नारायण, संताजी व धनाजी या चौघांनी आखली व त्याप्रमाणे त्यांनी आपल्या फौजा साताऱ्याच्या प्रदेशात आणल्या. लवकरच सर्जाखानाशी मराठ्यांनी गनिमीकाव्याची लढाई दिली. या प्रसंगी मराठी फौजेचे नेतृत्व संताजीने केले. सोबत धनाजी जाधव, हंबीरराव मोहिते सरलष्कर, पारखे इत्यादी

मराठा सरदारही होते. लढाई ऐन रंगात आली असता हत्तीवर बसलेल्या सर्जाखानाच्या अंगावरील कपड्यांनी अचानक पेट घेतला आणि जखमी अवस्थेत तो मराठ्यांच्या हाती सापडला. त्याचा पुत्र गालिबखान हाही रणमैदानात पडला. हजारो मोगल सैनिक ठार झाले. खुद्द खान आपल्या बायकामुलांसह कैद झाला. त्या सर्वांना मराठ्यांनी कैद करून साताऱ्याच्या किल्ल्यावर नेऊन ठेवले - (सु. २०/२५ एप्रिल, १६९०).

संताजी घोरपड्याने कमविलेल्या या महान विजयाचा साद्यंत वृत्तांत मोगल इतिहासकार ईश्वरदास नागर याने आपल्या 'फुतूहाते आलमगिरी' या ग्रंथात दिला आहे. ईश्वरदास नागर लिहितो -"या सुमारास मोगल सरदार रुस्तुमखान विजापुरी (सर्जाखान) हा साताऱ्याजवळ येऊन पोहोचला. साताऱ्याचा किल्ला जिंकून घ्यावा, असा त्याने बेत केला. ही बातमी मराठे सरदार संताजी घोरपडे, जाधव, पारखे इत्यादींना समजली. ते प्रचंड सैन्यासहित रुस्तुमखानावर चालून आले. रुस्तुमखानाने आपला मुलगा गालिबखान याजबरोबर पाच हजार सैन्य आणि पाच हत्ती देऊन त्याला आपल्या सैन्याच्या आघाडीवर ठेवले. अजून युद्धाला तोंड लागले नव्हते तोच मराठ्यांच्या बर्कंदाजांनी (बंदुकी चालविणारे पायदळ) मोगल फौजेवर बंदुकींचा मारा केला."

"मोगल सैन्याच्या आघाडीला हत्ती उभे करण्यात आले होते. बंदुकींच्या गोळ्यांचा त्यांच्यावर वर्षाव होऊ लागताच ते मागे फिरून आपल्याच सैन्यात पळू लागले. मोगलांचे काही सैनिक मराठ्यांच्या बंदुकींच्या माऱ्याने जखमी झाले होते. मागे पळत सुटलेल्या आपल्याच हत्तीच्या पायाखाली कित्येक मोगल सैनिक चिरडले गेले. हे पाहून रुस्तुमखान आपल्या सैनिकांसह पुढे धावला. इतक्यात मराठ्यांच्या सैन्यातील गजदळाने मोगल सैन्यावर चाल केली. याचा परिणाम असा झाला की, मोगल स्वारांचे घोडे घाबरून उधळले. मोगल स्वारांनी त्यांना आवरून मराठ्यांशी लढावे, असा प्रयत्न केला; पण काही केल्या घोडे मैदानात टिकेनात. असे असले तरी रुस्तुमखान हा आपल्याबरोबर राहिलेल्या सैनिकांना घेऊन शत्रूशी शौर्याने लढत राहिला. त्याच्या

हल्ल्यापुढे मराठ्यांची आघाडीवर असलेली पथके मागे हटली. तोपर्यंत रुस्तुमखानाचे पांगलेले सैन्य पुन्हा एकत्र आले. मोगलांनी आता मराठ्यांच्या मुख्य सैन्यावर हल्ला केला. या सैन्यात संताजी घोरपडे व पारखे हे होते. मोगलांच्या हल्ल्याने मराठ्यांचे सैन्य पळू लागले. मोगलांनी त्यांचा पाठलाग करून अनेकांना ठार मारले."

"या सुमारास मराठ्यांच्या दुसऱ्या तुकडीने मोगलांवर हल्ला केला. या हल्ल्यामुळे काही मोगल सैनिक जखमी झाले. मराठ्यांनी मोगलांचे झेंडे हस्तगत केले. त्यामुळे चिडून रुस्तुमखानाने आपला हत्ती मराठ्यांवर घातला. याच सुमारास मराठ्यांच्या गोळीबारामुळे रुस्तुमखानाच्या अंगावरील कपड्यांनी पेट घेतला. मराठ्यांचे कर्नाटकी बर्कंदाज सैन्याच्या आघाडीला होते, ते मोगलांच्या पिछाडीवर तुटून पडले आणि त्यांनी मोगलांची छावणी लुटण्यास सुरुवात केली. यामुळे मोगलांचा धीर सुटून ते पळू लागले. रुस्तुमखानाला बाणाच्या आणि बंदुकीच्या गोळ्यांच्या जखमा लागून तो बेशुद्धावस्थेत आपल्या हत्तीवरून खाली जमिनीवर पडला. मराठा सरदार मानाजी मोरे याने रुस्तुमखानाला पकडून मराठा फौजेत नेले. रुस्तुमखानाचा मुलगा गालिबखान याने आपल्या सैन्यासहित मराठ्यांवर हल्ला केला. या युद्धात बाणांच्या व भाल्यांच्या जखमा लागून गालिबखानही मैदानात पडला. त्यावेळी मोगल सैन्यातील दीड हजार माणसे ठार झाली. मराठ्यांचीपण अनेक माणसे ठार आणि जखमी झाली."

"हे होत असता हंबीरराव हा पाच हजार स्वार आणि पायदळ घेऊन साताराच्या किल्ल्यातून बाहेर पडला. त्याने मोगलांच्या फौजेवर हल्ला केला. रुस्तुमखानाच्या बायका आणि कुटुंबातील इतर स्त्रियांनी हे संकट पाहून खंजीर हातात घेऊन आत्महत्या करण्याचा बेत केला; पण हंबीररावाने ओरडून सांगितले की, रुस्तुमखान जिवंत आहे. मी तुमच्यावर हल्ला करीत नाही. तुम्ही आत्महत्येचा विचार करू नका. हे बोलणे चालू असता मराठ्यांची एक तुकडी रुस्तुमखानाच्या छावणीत घुसली. त्यांनी रुस्तुमखानाची आई, बायको व मुलगी यांना पकडून

सातारच्या किल्ल्यावर नेले."[१]

मराठ्यांच्या या छाप्यातून रुस्तुमखानाच्या दोन बायका व दोन मुले आपण खानसाहेबांच्या दासदासी आहोत, असा बहाणा करून निसटली. फकिराचा वेष परिधान करून ही मंडळी रात्रंदिवस रानावनातून प्रवास करून कशीबशी बादशाही मुलखात पोहोचली. बादशहास त्यांची बातमी कळताच त्याने आपला हुजऱ्या मीर हसन यास पालखी व घोडे बरोबर देऊन त्यांना छावणीत आणण्याची व्यवस्था केली आणि रुस्तुमखानाकडे निरोप पाठविला की, तुझी सुटका करण्यासाठी बादशाही फौजा तैनात करण्यात येत आहेत; पण एवढ्यात रुस्तुमखानाचाच छावणीत बादशहाकडे निरोप आला की, "आपण मराठ्यांना एक लाख होन देण्याचे कबूल केले आहे. याशिवाय माझी आई आणि मोठा मुलगा यांना मराठ्यांपाशी ओलीस ठेवले आहे. या अटीवर माझी सुटका झाली असून, मी सध्या सांगोल्यास आलो आहे. छावणीत येण्याची परवानगी असावी." पण बादशहाने त्यास भेट नाकारली आणि तुम्ही आहात तेथेच राहा, अशी आज्ञा केली. सातारचा किल्ला जिंकून घेण्याच्या कामी आता बादशहाने गाजिउद्दीनखान बहादूर व दिलेरखान या दोन सरदारांची नेमणूक केली.[२]

सर्जाखानावरील हल्ल्याचे संपूर्ण नियोजन व आखणी संताजीने केलेली दिसते. आपल्या सैन्याची अनेक तुकड्यांत विभागणी करून शत्रूला आपल्या लष्करीबलाची काही कल्पना येऊ द्यायची नाही; एका तुकडीने घाबरून गेल्याचे दाखवून पळ काढायचा व शत्रूस बेसावध करून दुसऱ्या तुकडीने अचानक हल्ला करायचा; शत्रू कैचीत सापडला, की सर्व बाजूंनी पुढे सरसावायचे, हे संताजीचे गनिमी तंत्र या ठिकाणी स्पष्ट दिसते. शत्रूचा पराभव दृष्टिक्षेपात येताच साताऱ्याच्या किल्ल्यातून हंबीरराव मोहिते पाच हजार सैन्यासह बाहेर पडून शत्रूचा पुरता मोड करतो, ही बाब या ठिकाणी विशेष लक्षात घेण्यासारखी आहे.

१. मोगल - मराठा संघर्ष (फुतूहाते आलमगिरी); पृ. ४१-४२. हा हंबीरराव मोहिते सरलष्कर होय. सरसेनापती हंबीरराव मोहिते नव्हे.

२. कित्ता; पृ. ४२-४३

हंबीररावाचे सातारच्या किल्ल्यातून बाहेर पडून मोगलांवर हल्ला करणे, हे शत्रूस अचानक वाटले तरी संताजीच्या गनिमी पद्धतीमधील तो योजनेचा शेवटचा भाग होता.

सुप्रसिद्ध जेधे शकावलीत सर्जाखानाच्या पाडावाविषयी महत्त्वाची नोंद आहे. साताऱ्यास वेढा घालून सर्जाखानावर रामचंद्रपंत, शंकराजी नारायण, संताजी व धनाजी या चौघांनी मोहीम काढली आणि खानाचा पराभव करून त्यास कैद केले. मोगलांची चार हजार घोडी व आठ हत्ती पाडाव करून खानाकडून एक लाख रुपये दंड घेऊन त्यास सोडून दिल्याचे ही शकावली सांगते.[३]

साताऱ्याच्या परिसरात सर्जाखानावर हा मोठा विजय मिळविल्यावर वर उल्लेखलेल्या चार मराठी नेत्यांच्या आधिपत्या-खालच्या फौजा वाईवर घसरल्या. वाईचा कोट घेऊन तेथील मोगल ठाणेदार खिदमतखान यास त्यांनी कैद केले. लवकरच प्रतापगडावर हल्ला करून मराठ्यांनी तोही काबीज केला. यानंतर अल्पावकाशात मराठ्यांनी विजयामागून विजय प्राप्त केले. रोहिडा, राजगड, तोरणा इत्यादी लष्करीदृष्ट्या महत्त्वाचे किल्ले त्यांनी जिंकून घेतले आणि त्यांच्या परिसरातील सह्याद्रीचा पर्वतमय प्रदेश त्यांनी पुन्हा आपल्या ताब्यात आणला. असे दिसते की, मे १६९० पर्यंत पन्हाळ्यापासून राजगडापर्यंत स्वराज्याचा कणा मानला गेलेला सह्य पर्वताचा प्रदेश

---

३. शिवचरित्र प्रदीप : जेधे शकावली, पृ. ३६
जेधे शकावली सर्जाखानाच्या पाडावाची तारीख वैशाख वद्य द्वादशी शके १६१२ म्हणजे २५ मे, १६९० अशी देते. तथापि ही तारीख चुकीची आहे, हे अन्य कागदपत्रांवरून स्पष्ट होते. सर्जाखानाच्या पाडावानंतर वाई-प्रतापगड हे किल्ले घेतल्याचे जेधे शकावली सांगते; पण ६ मे, १६९० रोजी रामचंद्रपंताने मुठे खोऱ्याच्या मारणे देशमुखांना लिहिलेल्या पत्रात आपण नुकतेच वाई-प्रतापगड किल्ले घेतल्याचे म्हटले आहे- (शिवचरित्र साहित्य, खंड ६, पृ. ७७). याचा अर्थ सर्जाखानास यापूर्वी, म्हणजे ६ मे, १६९० पूर्वी, कैद केले असणार हे उघड आहे. साधारणपणे एप्रिल १६९० च्या २०/२५ तारखेच्या दरम्यान ही घटना घडून आली असावी? जेधे शकावलीमधील सर्जाखानाच्या पाडावाची तारीख कशी चुकली आहे, या विषयीचा एक शोधनिबंध प्रस्तुत लेखकाने ऑगस्ट, १९६९ च्या 'नवभारत'च्या अंकात प्रसिद्ध केलेला आहे.

मराठ्यांनी पुन्हा आपल्या आधिपत्याखाली आणला आणि हे आधिपत्य पुढे कमी-जास्त फरकाने त्यांनी स्वातंत्र्ययुद्धाच्या कालखंडात कायमपणे टिकवले.

## खटाव परिसरातील गनिमी लढाया

मराठ्यांच्या या विजयामुळे त्यांचा दरारा फेर प्रस्थापित होऊ लागला. साताऱ्याच्या पूर्वेस दहा-बारा मैलांवर असणाऱ्या खटाव परिसरातील वर्धनगड किल्ल्याच्या पायथ्याशी मराठ्यांची एक फौज छावणी करून होती. मराठ्यांच्या विजयापाठीमागून विजयांच्या वार्तामुळे खटाव परिसरातील मोगल ठाणेदारांना मराठ्यांची इतकी धास्ती वाटू लागली की, वर्धनगडच्या पायथ्याशी असलेल्या या फौजेच्या निव्वळ अस्तित्वाने त्यांनी आपापली ठाणी टाकून पळ काढला. त्यात प्रामुख्याने खटावचा ठाणेदार सिद्दी हिलालखान हा होता.

सिद्दी हिलालखान आपले ठाणे टाकून पळून गेल्याचे समजताच मराठ्यांनी पुढे होऊन ते ठाणे काबीज केले आणि ते पूर्णपणे लुटून घेतले. ठाण्याची तटबंदीही त्यांनी पाडून टाकली. तेवढ्यात त्यांना बातमी लागली की, मोगल सरदार मरहमतखान खटावसाठी कुमक घेऊन औंधपर्यंत आला आहे. तेव्हा मराठ्यांनी त्याची वाट न पाहता त्याचा समाचार घेण्यासाठी खटावहून कूच केले; पण मोकळ्या मैदानात मराठ्यांशी सामना देण्याचे टाळून खान दुसऱ्याच मार्गाने खटावकडे आला आणि ठाण्याची डागडुजी करून बंदोबस्ताने राहू लागला. तेव्हा मराठे पुन्हा खटावकडे आले व त्यांनी ठाण्यास वेढा दिला. सतत १२ दिवस मराठे खटावबाहेर ठाण मांडून होते. ठाण्याबाहेर पडून त्यांना हुसकावून लावण्याचे धाडस खानास होत नव्हते. नंतर मराठे वेढा उठवून दुसरीकडे निघून गेले.

खटाव परिसरात मराठी फौजांचा जोर होता आणि मोगलांची प्रतिष्ठा संपली होती. म्हणूनही प्रतिष्ठा पुन्हा मिळविण्यासाठी व मराठ्यांना धडा शिकविण्यासाठी बादशहाने रणमस्तखान ह्या आपला नामांकित सरदार खटावकडे पाठविला. रणमस्तखान खटावात

आल्यावर त्याने त्या ठाण्याच्या ठाणेदारीसाठी योग्य व लायक व्यक्तीचा शोध घ्यावयास सुरुवात केली; पण मराठी फौजांची धास्ती इतकी मोठी होती की, खटावची ठाणेदारी स्वीकारण्यास कोणी पुढे आला नाही. ठाण्याची मजबुती करीत खान तेथे १२ दिवस राहिला आणि लवकरच बादशाही हुकूमाप्रमाणे तो मसूरकडे रवाना झाला. खान मसूरकडे निघून जाताच मराठे वर्धनगडावरून खाली उतरले आणि त्यांनी खटावच्या परिसरात जाळपोळ आणि लुटालूट करावयास सुरुवात केली. असे सुमारे २० दिवस चालले होते. परिणामी खटावचा परिसर पूर्णपणे ओसाड व निर्मनुष्य बनला. अशा परिस्थितीत खटावचा ठाणेदार म्हणून बादशहाने मामूरखान यास आपणाकडून पाठविले. मामूरखानाने खटावास येऊन ठाण्याची तटबंदी दुरुस्त केली व मोठ्या बंदोबस्ताने तो राहू लागला.[४]

पण एकट्या मामूरखानाच्या हातून खटाव परिसरातील मराठ्यांची आक्रमणे थोपविण्याचे काम होणार नव्हते. म्हणून दरम्यानच्या कालात बादशहाने लुत्फुल्लाखान या पराक्रमी सरदारास खटावकडे रवाना केले होते; पण खान आपल्या सैन्यासह खटावच्या प्रदेशाकडे येत असता मार्गातच म्हसवडच्या डोंगराळ भागात त्यास संताजी, धनाजी व सटवाजी डफळे यांच्या नेतृत्वाखालील फौजेने गाठले. ही फौज म्हसवड जवळच्या शंभू महादेवाच्या डोंगरात लपून बसली होती. खान जवळ येताच त्याच्यावर तिने हल्ला केला. दिवसभर मराठे मोगलांवर हल्ले चढवीत होते. शेवटी सायंकाळी ते निघून गेले. खुद्द खानानेच या लढाईचा वृत्तांत बादशहास पत्र लिहून कळविला आहे. त्यात खान म्हणतो -

"संता आणि धना (संताजी व धनाजी) हे आपल्या काफर सैन्यासहित म्हसवड भागात पसरले असून, त्वरेने त्यांचा मोड करावा, अशा अर्थाचे आपले आज्ञापत्र मिळाले. मी ताबडतोब त्या कामगिरीवर रवाना झालो. मी कसबे पिलीव येथे मुक्काम केला. दुसऱ्या दिवशी मी

४. भा. इ. सं. मंडळ, त्रैमासिक, वर्ष, ८, अंक३, पृ. १५६

तेथून रवाना झालो. वाटेत डोंगरांतून व दऱ्यांतून शत्रूचे सैनिक पसरले होते. शत्रूपाशी आठ हजार स्वार व अगणित पायदळ असे सैन्य होते. त्या सैन्याने चाल करून आमच्या सैन्याला चौहूकडून कोंडले. मी आपली सैन्य रचना केली. आमच्या सैन्याबरोबर असलेली सगळी सामग्री मी सैन्याच्या मध्यभागी ठेवली. आमचे सैन्य शत्रूशी लढण्यास सज्ज झाले. युद्धाला सुरुवात झाली. युद्ध निकराला येऊ लागले. काफर डफळे याजपाशी दोन हजारांपेक्षा अधिक कर्नाटकी बंदुकची होते. बंदुका आणि बाण यांच्या वर्षावामुळे प्रलयकाळाचा भास झाला. शत्रूचे सैन्य आमच्या सैन्याच्या ज्या बाजूवर चाल करून येई तिकडे आमचे सैनिक निकराने प्रतिकार करून त्याला मागे हटवीत. अशा रीतीने ही लढाई संध्याकाळपर्यंत चालली होती. शेवटी संताजी आणि धनाजी हे पाच हजार निवडक स्वारानिशी आमच्या सैन्यावर चालून आले; पण आमच्या सैन्याने त्यांची तमा बाळगली नाही. आमचे सैन्य ठाण मांडून उभे राहिले. शेवटी शत्रूपैकी अनेक माणसे मृत अथवा जखमी झाली आणि त्यांच्या सैन्याचा पराजय झाला. आमचा मोठाच विजय झाला. या युद्धात शत्रूपैकी जवळजवळ एक हजार माणसे ठार झाली. अनेक माणसे जखमी झाली. आमचे जवळजवळ दोनशे सैनिक ठार झाले. जखमी सैनिकांची संख्या तीनशेच्या वर असावी" - (जून १६९०)[५]

या लढाईसंबंधी मराठ्यांच्या बाजूने काहीही कागदपत्रे उपलब्ध नाहीत. लुत्फुल्लाखान जे सांगतो त्यावरच भिस्त ठेवली पाहिजे. तथापि आपल्या कामगिरीविषयी खान फुशारकीने लिहीत आहे, हे उघड आहे. तसेच लढाईत मराठ्यांची एक हजारावर माणसे ठार होतात आणि मोगलांची मात्र दोनशेच माणसे कामास येतात, हे खानाचे म्हणणे खुद्द बादशहास तरी पटत होते की नाही, याविषयी शंका येते. अशीच गोष्ट यानंतरच्या खटाव परिसरातील दुसऱ्या लढाईसंबंधीची आहे.

मराठ्यांच्या हल्ल्यांना तोंड देत देत लुत्फुल्लाखान खटावच्या परिसरात पोहोचला. खटावच्या बाहेर छावणी देऊन त्याने खटावची

---

५. मोगल - मराठा संघर्ष (लुत्फुल्लाची पत्रे), पृ. ११३

ठाणेदारी मोगली लष्करातील नारो राघो या शूर मराठ्यास सांगितली. तसेच खानाने परिसरातील लोकांना बोलावून त्यांना मोगलांकडून संरक्षणाची हमी दिली. लोकांनी परागंदा न होता आपापल्या ठिकाणी वसती करून राहावे, असे त्याने सांगितले; पण याचा फारसा परिणाम झाला नाही. मोगली अमलाखाली संरक्षणाची हमी देणारा खान स्वतःच मराठ्यांच्या कचाट्यात सापडला आणि आपले व आपल्या लष्कराचेच संरक्षण करता करता त्याची त्रेधा उडाली. ते दिवस पावसाळ्याचे होते. पाऊस असा पडत होता की, मोगली छावणीभोवती तटबंदी उभारण्यास अगर खंदक खणण्यासही संधी नव्हती. शत्रूच्या म्हणजे संताजी-धनाजीच्या फौजा आसपासच वावरत होत्या. सातार्‍याच्या पायथ्याशी संताजी छावणी करून होता. त्याने खानाच्या छावणीवर तो आलेल्या रात्रीच छापा टाकण्याची योजना आखली होती. त्याप्रमाणे तो आपल्या सैन्यासह खानाच्या छावणीवर चालून आला. रात्रीचा तिसरा प्रहर असल्याने सर्व मोगल सैनिक झोपेत गर्क होते. छाप्याच्या आरडाओरड्याने ते अचानक जागे होऊन कसेबसे लढण्यास तयार झाले. एक प्रहर मराठ्यांनी मोगली छावणीत धुमाकूळ घातला आणि अनेकांना ठार केले. शेवटी माघार घेऊन ते वर्धनगडच्या आश्रयास निघून गेले. या लढाईचे हुबेहूब वर्णन स्वतः लुत्फुल्लाखानाने बादशहास लिहिलेल्या पत्रात केले आहे, ते मुळातून वाचण्यासारखे आहे :

"शत्रूचा मोड करून ठाणी कायम करण्याची आपण आज्ञा केली होती. आपला निरोप घेऊन मी निघालो. पंधरा मजला प्रवास करून शव्वाल महिन्याच्या नऊ तारखेस (६ जुलै, १६९०) मी खटाव गावात मुक्काम केला. आमच्या जासुदांनी बातमी आणली की, संताजी हा दहा-बारा हजार स्वार आणि अगणित पायदळ अशा सैन्यासहित सातार्‍याच्या पायथ्याशी आहे. पाऊस सारखा पडत होता. आमच्या फौजेला तळ देऊन मोर्चे कायम करण्यास वेळ मिळाला नाही. संताजीने ही संधी साधली. रात्रीच्या शेवट प्रहरी आमचे सैन्य गाफील असताना त्याने आमच्यावर हल्ला केला. शत्रुसैन्याच्या आरडाओरड्यामुळे आमचे सैन्य खडबडून जागे झाले; पण जागे होऊन तयार होण्यास नाहीतरी वेळ

लागणारच. अशाही परिस्थितीत आमचे सैनिक घाबरले नाहीत. त्यांनी घोड्यांवर खोगिरी चढविल्या आणि शस्त्रे धारण करून ते तयार झाले."

"माझा मुलगा महंमद खलील हा मराठ्यांच्या या धाडसी आक्रमणामुळे मुळीच डगमगला नाही. त्याने आपल्या चौकीचे बंदुकची आणि शागीर्दपेशा यांना गोळा केले आणि तो मराठ्यांच्या समोर गेला. त्यावेळी पाऊस पडत होता. ऐन पावसात महंमद खलील याने शत्रूवर बाणांचा व गोळ्यांचा वर्षाव करून, मराठे छावणीच्या बाजारात आणि बोळात घुसले होते त्यांना हाकलून लावले. तोपर्यंत आमचे सरदार मामूरखान व खुदावंदखान आणि इतर हे तयार होऊन धावले. ते घोड्यावर स्वार होऊन आणि शस्त्रास्त्रांनी सुसज्ज होऊन मैदानात ठाण मांडून राहिले. उभय सैन्यातील लढाई निकराला येऊ लागली."

"याच सुमारास मी आपल्या पथकासहित माझ्या सैन्यास जाऊन मिळालो. माझा मुलगा खलील, मामूरखान आणि इतर सरदार यांना मी पुढे चालून जाण्याची आज्ञा केली. तो गर्विष्ठ संताजी आपल्या सैन्यासहित आमच्या सैन्यावर घसरला. त्यावेळी हाणामारी आणि वीरांच्या आरोळ्या यांमुळे कल्पांताचा भास झाला. आमचे वीर शौर्याने लढत होते. त्यांनी शत्रुसैनिकांपैकी अनेकांचा संहार केला; पण त्याची तमा न बाळगता मराठे पुन्हा पुन्हा चालून येत."

"हे युद्ध एक प्रहरापर्यंत निकराने चालले होते. त्यानंतर मराठे मागे हटले. माझा मुलगा महंमद खलील आणि इतर सरदार यांनी वर्धनगडच्या (खटावच्या वायव्येस ८ मैल) पायथ्यापर्यंत मराठ्यांचा पाठलाग केला. संताजीने वर्धनगडचा आश्रय घेतला. त्याचे अनेक सैनिक डोंगरदऱ्यांतून पांगले. आमचे सैनिकही छावणीला परत आले. आमचा फारच मोठा विजय झाला."

"या लढाईत जवळजवळ पाचशे मराठे मारले गेले. कित्येक जखमी झाले. शंभर माणसे पाडाव होऊन आमच्या हाती सापडली. तीनशे घोडी, नगारे व ध्वज, चारशे भाले आणि बंदुका इतकी सामग्री आम्हाला हस्तगत झाली. आमच्या सैन्यातील सदुसष्ट माणसे ठार झाली

आणि शंभर माणसे जखमी झाली. आमच्या सर्वच सैनिकांनी मोठे शौर्य गाजविले. ते सर्व जण आपल्या कृपेची अपेक्षा करून आहेत."[६]

म्हसवड व खटाव यांच्या परिसरातील उपरिनिर्दिष्ट दोन्ही लढाया म्हणजे गनिमी युद्धाचाच प्रकार होता. शत्रू बेसावध असता त्यास अचानक गाठून हल्ला करणे व त्याचे शक्य तितके नुकसान करून पुन्हा लगेच माघार घेऊन निसटणे ही गनिमी युद्धाची नीती येथे स्पष्ट पाहावयास मिळते. मराठ्यांच्या या डावपेचात्मक माघारीस मोगल अनेक वेळा त्यांचा पराजय आणि आपला विजय समजत असत.

लुत्फुल्लाखानाने बादशहास लिहिलेली ही पत्रे वाचताना मनात साहजिकच असा एक प्रश्न उभा राहतो की, अशा प्रकारची पत्रे आमच्या संताजी-धनाजींनी छत्रपती राजाराम महाराज किंवा रामचंद्रपंत अमात्य यांना लिहिली असतील काय? बहुधा ती त्यांनी लिहिली नसावीत. कारण अशा प्रकारे पत्रलेखन अथवा इतिहास-लेखन करण्याची परंपरा मोगलांच्या बाजूकडे निश्चितच होती; पण मराठ्यांकडे ती फारच अपवादात्मक आढळते.

## जाननिसारखान व तहव्वूरखान यांच्यावर विजय

महाराष्ट्रात सह्याद्रीच्या आश्रयाने मराठी सेनानी मोगली फौजांशी अशा रीतीने लढत होते. प्रसंगी सह्याद्रीचा परिसर सोडून ते महाराष्ट्राच्या अंतर्गत भागातही धुमाकूळ घालीत; कर्नाटक सरहद्दीवरही मोहिमा काढून शत्रू सैन्याचा समाचार घेत. अशाच एका कर्नाटक सीमेवरील प्रदेशात संताजीने काढलेल्या मोहिमेची माहिती खाफीखान आपल्या ग्रंथात देतो. संताजी, धनाजी, मानाजी मोरे आणि हंबीरराव मोहिते सरलष्कर यांच्या फौजा उत्तर कर्नाटकात धुमाकूळ घालीत असता संताजींचा बादशाही फौजांशी जो सामना घडून आला त्याचा सुरेख वृत्तांत खाफीखान देतो.

मराठ्यांचा मोड करण्यासाठी बादशहाने जाननिसारखान व तहव्वूरखान या सरदारांना फौजेसह धाडले असता संताजीने त्यांच्यावर

---

६. मोगल - मराठा संघर्ष (लुत्फुल्लाची पत्रे), पृ. ११४ - ११५

हल्ला करून त्यांचा दणदणीत पराभव केला आणि त्यांचे सर्वस्व लुटून घेऊन त्यांना फजित केले. उभय खान जखमी होऊन संताजीच्या हातून कसेबसे जिवानिशी निसटले. खाफीखान म्हणतो - "या सुमारास सलाबतखानाची मुले जाननिसारखान आणि तहव्वूरखान यांची नावे गाजत होती. त्यांनी युद्धात उत्कृष्ट कामगिरी केली होती... कर्नाटकाच्या सरहद्दीवर शत्रूचा पाडाव करण्यासाठी म्हणून जाननिसारखान व तहव्वूरखान यांना तैनात करण्यात आले होते. त्यांचा आणि संताजीचा युद्धप्रसंग घडला. निकराची मारामारी झाली. उभय पक्षांचे अनेक लोक जखमी अगर ठार झाले. बादशाही फौजेचा दणदणीत पराजय झाला. सगळी फौज, सामग्री आणि तोफखानाही गारद झाला. जाननिसारखान जखमी झाला. मोठ्या जीवानिशी निसटला. तहव्वूरखान हासुद्धा जखमी झाला. मैदानावर अनेक लोक जखमी अगर ठार होऊन मातीत बरबटून पडले होते. तहव्वूरखानाने त्यांच्यातच स्वतःला नेऊन घातले. पुनर्जन्म झाला, हीच खैर झाली असे त्याला वाटले."

"त्या फौजेत अनेक नामांकित सरदार होते. त्यांचीही भयंकर फजिती झाली. त्यांची अब्रू व मालमत्ता नाहीशी होऊन त्यांचा कमालीचा दुर्लौकिक झाला. अनेकजण कैद झाले व काही फक्त जीव घेऊन निसटले"[७] - (जून, १६९१).

## राज्याचा मामला थाटत चालला

जिंजीच्या प्रवासात राजाराम महाराज मोगलांकडून पकडले गेल्याची वार्ता महाराष्ट्रात पसरल्याने रायगडावरील येसूबाई आदी मंडळींनी आपली प्रतिष्ठा वाचविण्यासाठी वाटाघाटी करून रायगड जुल्फिकारखानाच्या ताब्यात दिल्याचे सांगून झालेच आहे. रायगड येसूबाई, शाहूराजे यांसह ३ नोव्हेंबर, १६८९ रोजी मोगलांच्या हाती आला आणि बरोबर याच सुमारास तिकडे कर्नाटकात राजाराम महाराज आपल्या सोबत्यांसह जिंजीत पोहोचले. आपली बहीण आणि हरजीराजे

७. मराठ्यांचे स्वातंत्र्ययुद्ध (तारीखे खाफीखान), पृ. २७

महाडिक याची बायको अंबिकाबाई हिच्या हातून महाराजांनी जिंजीचा, पर्यायाने कर्नाटकातील मराठी मुलखाचा कारभार आपल्या हातात घेतला. आपल्याबरोबर आलेल्या प्रल्हाद निराजी यास त्यांनी कारभारप्रमुख म्हणून तर केसो त्रिमल यास जिंजीचा सुभेदार म्हणून नेमले. आर्थिक अडचणींवर मात करून कर्नाटकातील कारभाराची घडी बसविण्याचे काम जोमाने सुरू झाले. आपणाला पकडण्यासाठी बादशहा जिंजीकडे फौजा पाठविणार, हे राजाराम महाराज समजून होते. या धोक्यास तोंड देण्याचीही तयारी त्यांनी चालविली होती. लवकरच त्यांनी कर्नाटकातील हिंदू नायकांची एक संयुक्त आघाडी तयार करून मराठे व नायक यांची मिळून एक संयुक्त फौजही उभारली.

यावेळी राजाराम महाराजांनी जिंजीमधील आपले स्थान किती बळकट केले होते, हे एका मराठी पत्रावरून दिसून येते. हे पत्र अस्सल असून, त्यात नमूद केले आहे की, छत्रपतींनी कर्नाटकात चाळीस हजार घोडदळ आणि एक लक्ष पंचवीस हजार पायदळ उभारले असून, केसो त्रिमलबरोबर पंधरा हजार घोडदळ व पंचवीस हजार पायदळ आणि एक लाख होनाचा खजिना देऊन त्यास महाराष्ट्रात पाठविले आहे - (२२ मार्च, १६९०).[८] असे दिसते की, ही फौज आल्यानंतर महाराष्ट्रातील रामचंद्रपंत, शंकराजी नारायण, संताजी, धनाजी आदी नेत्यांना मोठी उमेद पैदा होऊन त्यांनी मोगली फौजांवर दमदार हल्ले चढविले आणि सर्जाखानाच्या पाडावासारखे नेत्रदीपक विजय प्राप्त केले.

दरम्यान जिंजी जिंकून राजाराम महाराजांना पकडून आणण्यासाठी बादशहाने रायगडविजेत्या जुल्फिकारखानास फौजेसह कर्नाटकात रवाना केले होते. खान जिंजीकडे येत असता त्याला अडविण्यासाठी राजाराम महाराजांनी पाठविलेली मराठे - नायकांची संयुक्त फौज पराभूत होऊन माघारी आली होती आणि खान विजयी घोडदौड करीत जिंजीच्या समोर तो किल्ला घेण्यासाठी उभा ठाकला होता - (२७ ऑगस्ट, १६९०). लवकरच उभयपक्षी लढाई सुरू झाली होती.

---

८. मराठ्यांच्या इतिहासाची साधने, खं. १५, पृ. ३७६ - ३७७

एवढ्यात राजाराम महाराजांनी आपल्या मुत्सद्देगिरीने खानाच्या छावणीतच भेद निर्माण करून मोगलांचा आवेश खच्ची करून टाकला. मराठी राज्यावर पारखे होऊन मोगलांना मिळालेल्या व आता खानाच्या छावणीत असलेल्या नेमाजी शिंदे, माणकोजी पांढरे व नागोजी माने या बड्या मराठा सरदारांच्या मनात स्वराज्य व महाराष्ट्रधर्म यांची ईर्षा निर्माण करण्यात ते यशस्वी झाले. परिणामी हे मराठा सरदार मोगली छावणी सोडून आपल्या लष्करासह जिंजीत राजाराम महाराजांकडे आले - (२३ नोव्हें., १६९०). मोगलांच्या बाजूने त्यांच्या कर्नाटकातील जिंजी घेण्याच्या मोहिमेस बसलेला हा जबर धक्का होता; परंतु या धक्क्याने डगमगून न जाता जुल्फिकारखानाने जिंजीचा वेढा चालूच ठेवला. लहानसहान लढाया व मोहिमा तो करीतच राहिला - (स. १६९०-९१); पण जिंजीसारख्या पाच किल्ल्यांचा मिळून बनलेल्या प्रचंड किल्ल्यास परिणामकारक वेढा घालून शत्रूस जेरीस आणणे ही सोपी बाब नाही, हे खानाच्या लक्षात येऊन चुकले होते. ही वस्तुस्थिती त्याने बादशहाच्याही कानावर घातली होती. बादशहालाही ही वस्तुस्थिती पटून त्याने आपला वजीर असदखान व पुत्र शहजादा कामबक्ष यांना त्यांच्या फौजेसह जुल्फिकारखानाच्या मदतीसाठी जिंजीकडे जाण्याची आज्ञा केली होती. त्याप्रमाणे ते दोघेजण आपल्या फौजेसह स. १६९१ च्या अखेरीस जिंजीपुढील मोगली छावणीत दाखल झाले - (१६ डिसें., १६९१).

संभाजी महाराजांच्या हत्येपासून आतापर्यंत म्हणजे स. १६९१ पर्यंत जो मोगल-मराठा संघर्ष चालू होता त्यापासून सामान्य मराठ्यासही एक गोष्ट मनोमन उमजली होती की, मराठी राज्य आता बुडत नाही, औरंगजेब बादशहाला ते सहजासहजी नष्ट करता येत नाही. कदाचित ही गोष्ट ध्यानात आल्यानंतरच मोगलांना जाऊन मिळालेले नेमाजी शिंदे, माणकोजी पांढरे, नागोजी माने यासारखे मराठे सरदार पुन्हा स्वराज्यात आले होते. अखिल मराठी जनतेत आता एक प्रकारचा आत्मविश्वास निर्माण झाला होता. या सुमारास महाराष्ट्रात एक प्रकारे

नवचैतन्याचे वारे कसे वाहत होते, याचे दिग्दर्शन करणारे एक महत्त्वाचे पत्र उपलब्ध आहे. हे पत्र मावळ प्रांताचा सुभेदार महादजी शामराज या मराठा अधिकाऱ्याने तर्फ मुठे खोऱ्याच्या हवालदारास लिहिले आहे - (२४ सप्टेंबर, १६९०). त्यात महादजी म्हणतो, "मोगलाची धामधूम आपल्या राज्यात आजी तीस वर्षे होत आहे. यामुळे मुलूख वैराण जाला. मुलखात मोगलाईचा अंमल चालिला. **हली श्रीकृपेने आपल्या राज्याचा मामला थाटत चालला आहे.**"[९]

रायगड नोव्हेंबर १६८९ मध्ये मोगलांच्या हाती पडला तेव्हा आकाश कोसळल्यासारखी मराठ्यांची स्थिती झाली होती आणि अवघ्या वर्षभराने म्हणजे सप्टेंबर १६९० मध्ये मराठे मोठ्या आत्मविश्वासाने म्हणत होते की, श्रीकृपेने राज्याचा मामला थाटत चालला आहे!

## संताजीस सेनापतिपदाची प्राप्ती

छत्रपती शिवाजी महाराजांनी आपल्या प्रशासनाचा पाया म्हणून अष्टप्रधान मंडळाची निर्मिती केली होती. राज्याभिषेक प्रसंगी या प्रधान मंडळास पूर्णत्व प्राप्त झाले होते. पुढे संभाजी महाराजांच्या कारकिर्दीत प्रधान मंडळाचे महत्त्व कमी झाले. यास प्रामुख्याने मोरोपंत पिंगळे व अण्णाजी दत्तो या प्रधानांचेच राजद्रोही वर्तन कारणीभूत ठरले. संभाजी महाराजांचा आपल्या प्रधानांवरील विश्वासच नष्ट होऊन ते परप्रांतीय कवि कलश याजवर अधिकाधिक विसंबून राहू लागले. त्यांच्या कारकिर्दीत प्रधानमंडळातील फक्त एकाच प्रधानास महत्त्व होते आणि तो प्रधान म्हणजे सेनापती हंबीरराव मोहिते; पण तोही स. १६८७ मध्ये वाईच्या लढाईत मारला गेल्यावर सेनापतिपदाचेही महत्त्व मागे पडले. एवढेच नव्हे तर मोकळ्या पडलेल्या या पदावर त्यांनी कोणाची नेमणूकही केल्याचे दिसत नाही.

हंबीररावाच्या मृत्यूनंतर संभाजी महाराजांनी त्याच्या जागी म्हाळोजी घोरपडे यांस नेमले होते व ते स. १६८९ साली संभाजी

---

९. शिवचरित्र साहित्य, खंड ५, पृ. ७७-७८

महाराजांच्या कैदेच्या प्रसंगी रणांगणी ठार झाल्यावर पुढे राजाराम महाराजांनी आपल्या कारकिर्दीच्या प्रारंभीच्या कालात रामचंद्रपंतांच्या सांगण्यावरून ते संताजीस बहाल केल्याचे प्रसिद्ध इतिहासकार वा.सी. बेंद्रे हे आपल्या संभाजीचरित्रात म्हणतात.[१०] बेंद्रे यांचे हे विधान घोरपडे घराण्याच्या कैफियती, यादी वगैरे उत्तरकालीन कागदपत्रांवर व चिटणीस बखरीतील मजकुरावर आधारित आहे. घोरपडे घराण्याची कागदपत्रे म्हणतात, संभाजीकाळात म्हाळोजी घोरपडे हे पन्हाळ्याचे सरनौबत होते व त्यांच्या हाताखाली ५०० घोडदळ होते;[११] पण सरनौबत म्हणजे सेनापती असाच केवळ अर्थ घेतल्याने बेंद्रे यांनी म्हाळोजीनंतर सेनापतिपद संताजीस मिळाले, असे म्हटले आहे. याविषयीची चर्चा दुसऱ्या प्रकरणात केलेली आहेच.

मल्हार रामराव चिटणीस आपल्या बखरीत संताजीच्या सेनापतिपदाच्या प्राप्तीची सविस्तर कथा सांगतो. तो म्हणतो की, बादशहाच्या डेऱ्याचे कळस आणण्याचा महान पराक्रम गाजविल्यानंतर रामचंद्रपंत अमात्यांच्या सांगण्यावरून राजाराम महाराजांनी संताजीस सेनापतिपद बहाल केले. वास्तविक ते धनाजीस द्यावे, असे त्यांना वाटत होते; पण त्यांनी पंतांच्या शब्दाला मान दिला. पुढे पन्हाळ्यास मोगलांनी वेढा दिला - (स. १६९०). तेव्हा किल्लेदार घाटगे याच्या साहाय्यास संताजी गेला नाही, याचा ठपका ठेवून राजाराम महाराजांनी त्यास सेनापतिपदावरून दूर करून त्याच्या जागी महादजी पानसंबळ यास नेमले.[१२]

पण चिटणीस सांगतो त्याप्रमाणे स. १६८९ सालीच राजाराम महाराजांनी संताजीस सेनापतिपदावर नेमले होते, असे दिसत नाही. तत्कालीन कागदपत्रे त्यास दुजोरा देत नाहीत. स. १६८९-९० च्या कोणत्याही मराठी कागदपत्रांत संताजीचा अथवा महादजी पानसंबळचा

१०. छत्रपती संभाजी महाराज, पृ. ११९, १३२, ६२३
११. काव्येतिहाससंग्रह : ऐतिहासिक पत्रे, यादी वगैरे, पृ. ३८४ - ३८५
१२. चिटणीसकृत राजाराम महाराजांचे चरित्र, पृ. ८-९, १५, १७

उल्लेख सेनापती म्हणून येत नाही. या कालातील अस्सल कागदपत्रांत संताजीचा उल्लेख 'सेनापंचसहस्त्री' असा येतो. १३ एप्रिल, १६९० रोजी राजाराम महाराजांनी जिंजीहून मराठा सरदार चांदजीराव पाटणकर यास पाठविलेले एक पत्र या प्रश्नावर प्रकाश टाकते. त्या पत्रातील या संदर्भातील महत्त्वाचा भाग असा :

"स्वतिश्री राज्याभिषेक शके १६ प्रमोदनाम संवत्सरे अधिक वैशाख सुध पूर्णिमा रविवासर क्षेत्रिय कुलावतंस श्री राजाराम छत्रपती याणी राजेश्री चांदजी पाटणकर सेना पंचसहस्त्री यासी आज्ञा केली यैसीजे - स्वामी कर्नाटक प्रांते आलीया उपरी मागे तुम्ही त्या प्रांते राहोन **रा। संताजी घोरपडे व रा। धनाजी जाधव उभयता पंचसहस्त्री** या समागमे स्वारी सिकारी करून स्वामी कार्ये केले. हे वर्तमान स्वामीस श्रुत जाले. त्या वरून तुमचा बहुतच मजुरा जाहला...."[१३]

या पत्रावरून स्पष्ट होते की, स. १६८९-९० च्या कालखंडात संताजी अद्यापही सेना-पंचसहस्त्री म्हणूनच वावरत होता आणि मराठी फौजेत संताजीबरोबर धनाजी जाधव, चांदजीराव पाटणकर इत्यादी अनेक सेना-पंचसहस्त्री होते. अद्यापही या सेना-पंचसहस्त्रीपैकी कोणी एकजण राजाराम महाराजांनी सेनापतिपदावर नियुक्त केलेला नव्हता; पण मराठी राज्याच्या जीवन-मरणाच्या संघर्षात हे महत्त्वाचे पद फार काळ रिकामे ठेवणे योग्य नव्हते. अखेर या पदावर संताजीचीच नेमणूक राजाराम महाराजांनी केली. या नेमणुकीची निश्चित तारीख आज आपणास माहीत नाही; पण संताजीचा "सेनापती" म्हणून आज उपलब्ध असलेला सर्वांत पहिला उल्लेख १२ मे, १६९१ च्या एका पत्रात मिळतो. हे पत्र म्हणजे राजाराम महाराजांनी संताजी घोरपड्यास मसूरच्या देशमुखीविषयी पाठविलेले आज्ञापत्र आहे. या पत्रात राजाराम महाराजांनी संताजीस "**समस्तसेनाधुरंधर राजमान्य राजश्री संताजी घोरपडे सेनापती**" असे संबोधिले आहे. यावरून स. १६९१च्या सुरुवातीस केव्हातरी संताजीस सेनापतिपदाची प्राप्ती झाली असावी,

१३. शिवकालीन कागदपत्रे, पृ. १७९

असा तर्क करावा लागतो.[१४]

राजाराम महाराजांना संताजीस स. १६८९-९० या कालखंडातही सेनापतिपद देता आले असते. मग या कामी त्यांनी विलंब का केला असावा, याविषयी काही तर्क बांधता येतो. राजाराम महाराजांसमोर या पदासाठी लायक व्यक्ती म्हणून संताजी आणि धनाजी असे दोन समान पराक्रमाचे सेनानी होते. दोघेही या पदासाठी इच्छुक होते. दोघेही मराठी फौजेत सेना-पंचसहस्त्री या हुद्यावर होते. मोगलांविरुद्धच्या अनेक मोहिमा दोघे संयुक्तरीत्या काढीत होते. सारखेच पराक्रमी असले, तरी संताजी हा तापट स्वभावाचा व करड्या शिस्तीचा होता आणि धनाजी हा मनमिळाऊ स्वभावाचा व हाताखालच्या लोकांना प्रेमाने सांभाळून घेणारा होता. 'नाकापेक्षा मोती जड' या न्यायाने डोईजड झाला, तर तो संताजी होणार होता, धनाजी नव्हे. राजाराम महाराजांनी याविषयी काही अंदाज केला असावा, काही अडाखे बसविले असावेत. म्हणूनच दोघांपैकी कोणाची नियुक्त करावी, याबद्दलचा त्यांचा निर्णय होत नसावा; पण शेवटी त्यांनी संताजीचीच निवड सेनापती म्हणून केली. याला दोन कारणे घडली असावीत. पहिले असे की, या काळात संताजीने मोगली फौजांवर एकामागून एक असे नेत्रदीपक विजय

१४. मराठ्यांच्या इतिहासाची साधने, खं. १५, पृ. ५५-५६
सदर आज्ञापत्र महादजी जगदाळ्याच्या मसूरच्या देशमुखीविषयी आहे. राजाराम महाराजांनी अशाच प्रकारचे एक आज्ञापत्र महाराष्ट्रातील प्रसिद्ध सरदार नागोजीराव व चांदजीराव या पाटणकर बंधूंना पाठविलेले उपलब्ध आहे. इतिहासाचार्य राजवाड्यांनी ही दोन्ही पत्रे एकत्रच छापलेली आहेत. संताजीस पाठविलेले आज्ञापत्र ठिकठिकाणी फाटलेले असल्याने त्यातील तारखेचा थोडा मजकूर नष्ट झालेला आहे. "राज्याभिषेक शक १७ प्रजापतिनाम संवत्सरे दशमी भौमवासरे" असा अपूर्ण मजकूर आहे; पण पाटणकर बंधूंना पाठविलेल्या आज्ञापत्रातील तारखेचा मजकूर शाबूत आहे. "राज्याभिषेक शक १७ प्रजापतिनाम संवत्सरे वैशाख बहुल दसमी भौमवासरे" (१२ मे, १६९१) असा तो आहे. दोन्ही पत्रांतील विषय व मजकूर जवळजवळ सारखाच असल्याने ही दोन्ही पत्रे एकाच दिवशी तयार झाली असावीत, असा तर्क केल्यास चुकीचा होणार नाही. संताजीस पाठविलेल्या आज्ञापत्राची तारीख राजवाड्यांनी अंदाजाने "१६१३ चैत्रशुद्ध १०" (२९ मार्च, १६९१) अशी दिलेली आहे. अर्थातच ती चुकीची ठरते.

कमवून आपला व मराठी फौजेचा सर्वत्र नावलौकिक केला आणि शत्रूस दहशत बसविली आणि दुसरे असे की, अशा पराक्रमी सेनानीसच सेनापती करणे उचित आहे, असा सल्ला रामचंद्रपंतांनी राजाराम महाराजांना देऊन संताजीचे पारडे जड केले असावे. रामचंद्रपंतांवर महाराजांचा इतका विश्वास होता की, याकाळात महाराष्ट्रातील राज्याचा सर्व कारभार त्यांनी पंतांच्या हाती सोपविला होता. अशा परिस्थितीत पंतांसारख्या जाणकार मुत्सद्याने संताजीबद्दल दाखविलेली अनुकूलता त्याची त्या पदावर नियुक्ती करण्यास थोडी कारणीभूत झाली असावी, असे वाटते.

***



# ६.
# अलिमर्दानखान कैद, जिंजीपुढे मोगलांची दाणादाण

महाराष्ट्रात व कर्नाटकात मराठ्यांचे लष्करी बळ हळूहळू वाढत होते. मराठे कमजोर होऊन आपणास शरण येतील, ही बादशहा औरंगजेबाची अपेक्षा फोल ठरली होती. कर्नाटकात जिंजी किल्ल्यास मोगलांनी वेढा दिला होता खरा; पण तो किल्ला सहजासहजी जिंकून घेण्याच्या आशा दुरावल्या होत्या. राजाराम महाराज आपल्या सहकाऱ्यांनिशी किल्ला लढविण्याची पराकाष्ठा करीत होते. महाराष्ट्रात रामचंद्रपंतांच्या नेतृत्वाखाली मराठ्यांनी मोगलांविरुद्ध जोरदार आघाडी उघडली होती. मोगलांनी जिंकून घेतलेले किल्ले व ठाणी पुन्हा काबीज करण्याचे शिकस्तीचे प्रयत्न चालू होते. खुद्द राजधानी रायगडावर हल्ला करून ती काबीज करण्याचा एक धाडसी प्रयत्न शिवाजी महाराजांच्या तालमीत तयार झालेल्या आबाजी सोनदेव या मराठा सेनानीने केल्याचे कागदपत्रांत नमूद आहे;[१] पण या प्रयत्नात त्यांना यश आले नाही.

तथापि या अपयशाने मराठे खचून गेले नाहीत. त्यांनी रायगडाइतकाच महत्त्वाचा महाराष्ट्रातील दुसरा किल्ला पन्हाळगड काबीज करण्याचा मनसुबा रचला. मराठी राज्याच्या राजकारणात नुकत्याच उदयास आलेल्या परशुराम त्र्यंबक या मराठा सेनानीने अचानक हल्ला करून हा किल्ला मोगलांच्या ताब्यातून जिंकून घेतला-(ऑगस्ट, १६९२)[२]. मराठ्यांच्या बाजूवर हा मोठा विजय मानला गेला. पन्हाळा ताब्यात असणे म्हणजे दक्षिण महाराष्ट्र ताब्यात असणे, असे त्या वेळचे राजकीय व लष्करी गणित होते. पन्हाळा म्हणजे दक्षिण स्वराज्याची गुरुकिल्लीच होती. स्वाभाविक तो मराठ्यांच्या हाती जाणे

---

१. बावडा दफ्तर, खंड १, पृ. ४१-४२

२. शिवचरित्र प्रदीप, पृ. ३६

म्हणजे बादशाही प्रतिष्ठेला मोठा धोका होता. तो पुन्हा जिंकून घेण्यासाठी बादशाही फौजेस आज्ञा झाली; पण तो जिंकून घेणे पुढे कित्येक वर्षे बादशहास शक्य झाले नाही.

## संताजी-धनाजीचा बेळगाव-धारवाड प्रदेशात धुमाकूळ

या सुमारास मराठ्यांचे सेनानी संताजी आणि धनाजी बेळगाव-धारवाड या कर्नाटक प्रदेशाच्या सीमेवर धुमाकूळ घालीत होते- (सप्टें.- ऑक्टो., १६९२). प्रथम त्यांनी बेळगावच्या परिसरातील किल्ले व ठाणी जिंकून घेतली. उभ्या पिकांत लष्कराची घोडी घालून त्यांची नासधूस केली. एवढेच नव्हे तर खुद्द बेळगावच्या किल्ल्यासही त्यांनी वेढा दिला. लवकरच हा वेढा उठवून संताजी जिंजीच्या दिशेने गेला; पण लगेच विचार बदलून तो पुन्हा बेळगावकडे आला. तिथे काही दिवस संचार करून तो व धनाजी धारवाडकडे गेले आणि धारवाडच्या किल्ल्यास त्यांनी वेढा दिला.[३]

संताजी आणि धनाजी यांच्या या कर्नाटक प्रदेशातील हालचालींची माहिती आपणास केवळ औरंगजेबाच्या दरबारातील अखबारांतून मिळते. हे अखबार म्हणजे दरबारातून नियमितपणे प्रसिद्ध होणारी बातमीपत्रेच होती. मराठ्यांच्या इतिहासाच्या अभ्यासास ही बातमीपत्रे बहुमोल मदत करतात. त्यांच्या साहाय्यानेच मराठ्यांच्या स्वातंत्र्ययुद्धातील त्यांच्या शेकडो लढाया व हालचाली यांच्याविषयी महत्त्वाची माहिती मिळते. २७ ऑक्टो., १६९२ चे बातमीपत्र म्हणते - "हरकाऱ्यांच्या तोंडून बातमी आली की: धनाजी जाधव व संताजी हे आजमनगर बेळगाव भागातून बाहेर पडले ते धारवाडला पोहोचले असून, त्यांनी धारवाडच्या किल्ल्याला वेढा दिला आहे."[४] पण लवकरच धारवाडचाही वेढा उठवून मराठे नरगुंदकडे निघून गेले. नोव्हेंबरच्या मध्यावर ते कर्नाटकातील गोविंदगडाजवळ होते आणि त्यांच्या मागावर विजापुरी कर्नाटकाचा मोगल फौजदार कासिमखान हा होता.

---

३. History of Aurangzib, Vol. V, p. 33

४. मोगल दरबारची बातमीपत्रे, पृ. ८-९ जवळ आहेत.

२१ नोव्हें., १६९२ चे बातमीपत्र म्हणते- "बादशहांनी सियादत खानास म्हटले, 'मीर हुसामुद्दीन गुर्जबर्दार (दंडधारी) याला कासिमखानाकडे पाठविले होते तो परत आला आहे. त्याला विचारा की, गनिमांच्या काय हालचाली आहेत? त्यांचा पाठलाग करीत कासिमखान कुठे पोहोचला आहे?' सियादतखानने चौकशी करून कळविले, 'कासिमखान हा मराठ्यांचा पाठलाग करीत मौजे सिल्ही येथे पोहोचला आहे. संताजी व धनाजी जाधव वगैरे गोविंदगड किल्ल्याच्या कासिमखान व मराठे यांच्यात दहा कोसांचे अंतर आहे. गदग प्रांतातील जमीनदार कासिमखानास भेटले आहेत."[५]

## संताजीचा अलिमर्दानखानावर विजय : खान कैद

बेळगाव-धारवाडच्या प्रदेशात धुमाकूळ माजवून संताजी आणि धनाजी कर्नाटकात जिंजीकडे रवाना झाले. वास्तविक जिंजीकडे जाऊन तेथील मोगलांचा वेढा उठविणे हेच त्यांचे उद्दिष्ट होते. मार्गात त्यांनी बेळगाव-धारवाडच्या प्रदेशाचा समाचार घेतला होता; पण तेथे फार काळ न थांबता शत्रुप्रदेशाची नासाडी करीत ते जिंजीच्या आसमंतात दाखल झाले.

वजीर असदखान (जुल्फिकारखानाचा पिता) व शहाजादा कामबक्ष हे दोघे जिंजीपुढील मोगली फौजेत येऊन दाखल झाल्यापासून मोगलांमध्ये हुरूप पैदा झाला होता. स. १६९२ च्या सुरुवातीपासून जिंजीचा वेढा पुन्हा एकदा जारीने सुरू झाला होता. उभयपक्षी तोफांची गोळाबारी आणि लहानसहान चकमकी नित्यनेमाने होत होत्या. राजाराम महाराज मोठ्या शर्थीने किल्ला लढवीत होते. मोगली लष्कराचे सामर्थ्य वाढले होते. अशा परिस्थितीत असदखान व जुल्फिकारखान यांनी जिंजी किल्ल्यावर जोरदार हल्ले चढविले असते, तर तो जिंकून घेणे त्यांना अशक्य नव्हते; पण राजाराम महाराजांनी उभय खान मजकुरांशी अंतःस्थ सूत जमविले होते. त्यामुळे किल्ला जिंकण्याच्या प्रयत्नात खानांचा प्रामाणिकपणा अथवा नेट राहिलेला नव्हता.

५. मोगल दरबारची बातमीपत्रे, पृ. १०

संताजी आणि धनाजी यांच्या फौजा एखाद्या झंझावाताप्रमाणे जिंजीच्या आसमंतात आल्या. संताजीजवळ १५ हजार घोडदळ, तर धनाजीजवळ ७ हजार घोडदळ होते. प्रथम धनाजी जिंजीसमोर आला. त्याने किल्ल्यास वेढा घालून बसलेल्या मोगली लष्करावर केलेल्या अचानक हल्ल्यामुळे मोगलांची दाणादाण उडाली. वेढा उठवून सर्व मोगल लष्कर घाईघाईने मुख्य तळावर जमा झाले; पण त्या घाईत इस्माईलखान मखा हा मोगलांचा नामांकित सेनानी धनाजीच्या तावडीत सापडला. धनाजीने त्यास पकडून कैद केले आणि मोठ्या विजयोत्सवाने त्यास जिंजी किल्ल्यात नेले - (१३ डिसेंबर, १६९२).[६] या घटनेच्या दुसऱ्या दिवशीच मराठ्यांनी आणखी एक मोठा विजय संपादन केला. धनाजीच्या पाठोपाठ येणाऱ्या संताजीने अलिमर्दानखान या आणखी एका नामांकित मोगल सेनानीचा पराभव करून त्यास कैद केले.

अलिमर्दानखान हा कर्नाटकातील कांचीपूरमचा (वांदिवॉश-पासून उत्तरेस २५ मैल) मोगल फौजदार होता. त्याच्या जवळ हजार-दीड हजार फौज होती. जिंजी पुढील मोगली छावणीकडे जाणाऱ्या रसदेच्या मार्गाचे रक्षण करण्याची आणि प्रसंगी रसद पोहोचविण्याची त्याची जबाबदारी होती. संताजी जिंजीच्या रोखाने येत असता त्यास अलिमर्दानखान भली मोठी रसद घेऊन जिंजीच्या पायथ्याकडे निघाल्याची वार्ता समजली. लगेच संताजीने खानास जाळ्यात पकडण्याचा चक्रव्यूह रचला. गनिमी काव्याने खानास चकवून खास त्यासच कैद करण्याची योजना त्याने आखली. आपले मुख्य सैन्य आडवळणी बिकट अशा प्रदेशात ठेवून संताजी निवडक २/३ हजार सैन्यानिशी खानासमोर आला. मराठ्यांचा हा नामांकित सेनानी एवढ्या छोट्या सैन्यानिशी समोर आल्याचे पाहून खानास चेव चढला आणि त्याने मोठ्या त्वेषाने संताजीवर हल्ला चढविला. थोडीफार लढाई होताच संताजीचे सैन्य पराभूत झाल्याचे भासवून पळू लागले. आता खानाने संताजीचा पाठलाग सुरू केला. मोगलांना पाठीवर घेऊन संताजीने दौड

६. शिवचरित्र प्रदीप, पृ. ३६

करीत त्यांना आपल्या मुख्य सैन्याच्या कचाट्यात आणून सोडले. मोगल सैन्य तेथे येताच मराठ्यांनी त्यास सर्व बाजूंनी अचानकपणे घेरले. धुमश्चक्रीची लढाई झाली. शेवटी खान आपल्या सहकाऱ्यांसह पराभूत होऊन संताजीच्या हाती सापडला. सोबत ५ हत्ती, ३०० उमदे घोडे, वाहतुकीची जनावरे व प्रचंड रसद मराठ्यांना प्राप्त झाली"[७] - (१४ डिसेंबर, १६९२).

मराठी कागदपत्रांत फक्त जेधे शकावलीच संताजीच्या या महान पराक्रमाची नोंद घेते. -"संताजी घोरपडा पंधरा हजार स्वारानिसी राजश्री रामचंद्रपंती रवाना केले. ते चंदीस (जिंजीस) आले. येते वेलेस कचीजवळ (कांचीपुरम) अलीमर्दानखान दस्त केले. पंधरासे घोडे, हत्ती ६ पाडाव केले."[८]

फारसी साधनांमध्ये फक्त भीमसेन सक्सेना या लढाईची थोडी अधिक माहिती देतो- "बातमी आली की, धनाजी पाठोपाठ संताजीपण आला. मराठ्यांचा तळ कांचीपासून दहा कोसांवर कावेरीपाक किल्ल्यानजिक पोहोचला. कांचीचा फौजदार अलिमर्दाखान हा आपल्याबरोबर असलेली फौज घेऊन मराठ्यांशी लढण्यास आला. आपल्या विरुद्ध संताजी असून त्याच्याबरोबर मोठी फौज आहे हे अलिमर्दानखानला समजले नाही."

"मोगल व मराठे यांचे युद्ध झाले. अलिमर्दानखानाच्या सैन्यात बहेलिया नावाच्या पायदळ शिपायांचा भरणा होता. थोडा वेळ युद्ध चालले. इतक्यात बहेलियाचे पायदळ संताजीला जाऊन मिळाले. अलिमर्दानखान हा घाबरून गेला व पळाला. त्याने कांचीची वाट धरली. मोगल सैन्याचा मोड झाला. आपल्या अनेक सरदारांसहित अलिमर्दानखान हा मराठ्यांच्या हाती सापडला. त्याच्याबरोबर असलेले हत्ती, घोडे, उंट आणि इतर सर्व सरंजाम मराठ्यांच्या हाती पडला."[९]

संताजीची ही लढाई कावेरीपाक किल्ल्याच्या आसमंतात

---

७. Martin's Memoires, pp. 245-246

८. शिवचरित्र प्रदीप, पृ. ३६

९. मोगल आणि मराठे (तारिखे दिल्कुशा), पृ. ११५

झाल्याचे भीमसेनाच्या वृत्तांतातून स्पष्ट होते; पण भीमसेनला संताजीची गनिमी काव्याची लढाई समजू शकलेली नाही. अलिमर्दानखानाच्या फौजेतील बहेलिया पायदळ संताजीस मिळाल्याने खानाचा पराभव झाल्याचे तो लिहितो. बहेलिया पायदळ संताजीस मिळाले असेलही; पण ते लढाईच्या शेवटी. खानाचा पराभव निश्चित होताच या भाडोत्री सैनिकांनी त्याची बाजू सोडली असेल असे वाटते.

संताजीने ही लढाई गनिमी काव्याने खेळून ती कशी जिंकली, हे समजून घेण्यासाठी गव्हर्नर मार्टिनच्या डायरीतील नोंद काळजीपूर्वक अभ्यासली पाहिजे. संताजीच्या विजयाचे साग्र वर्णन पांदेचरीचा फ्रेंच गव्हर्नर मार्टिन याने आपल्या डायरीत केलेले आहे. मार्टिनसारख्या परकीयाने दक्षिण हिंदुस्थानातील या महत्त्वाच्या लढाईचे वर्णन इतके सुंदर केलेले आहे की, ते वाचून मार्टिनच्या चौकस बुद्धीचे कौतुक वाटल्याशिवाय राहत नाही. संताजीच्या गनिमी काव्याच्या अभ्यासाच्या दृष्टीने मार्टिनच्या डायरीतील उतारा अत्यंत महत्त्वाचा आहे. मार्टिन लिहितो - "Ali Mardan Khan ordinarily held the plain with 1200 to 1500 horse for the security of the convoys. This month he was escorting a very large convoy to the camp. Santaji Ghorpare, a famous Maratha was coming from the other coast with 10 to 12 thousand horsemen to reinforce Jinji and received intelligence of the Mughal convoy being escorted by Ali Mardan. This General, clever and expert in the art of war, posted himself on the route by which the Moors (Mughals) had to pass. He chose the terrain for his premediated design and when it appeared that the enemy was near, he caused one part of his cavalry to fall back and himself appeared before the enemy with only 2 or 3 thousand horse. The Muslim cavalry, which didnot reck a corps of the Marathas twice as numerous as themselves, gave chase to Santaji. His retreat was well-planned; it appeared that Santaji was only trying to get time; but when the enemy came near the

place where the remainder of the Maratha cavalry was posted, the Moors (the Mughals) were enveloped and after a fight of many hours, although their strength was very unequal, the escort was totally defeated. The Marathas seized and took into Jinji without any opposition, Ali Mardan Khan, many of his officers, many merchants who have believed the opportunity safe for going to that side, five elephants, 300 good horses, the baggage, and generally all the convoy and transport animals."[10]

*(या प्रदेशातील मोगल रसदींचे संरक्षण करण्याची जबाबदारी अलिमर्दानखान हा आपल्या १२००/१५०० घोडदळानिशी सांभाळत असे. या महिन्यात जिंजीच्या पायथ्याशी असलेल्या मोगली सैन्यासाठी जाणाऱ्या रसदेचे संरक्षण करण्याचे काम तो करत होता. मराठ्यांचा नामांकित सरदार संताजी घोरपडे हा महाराष्ट्रातून जिंजीच्या मदतीला आपल्या १०-१२ हजार घोडदळासह निघाला होता. त्याला ही मोगली रसदेची बातमी समजली, तेव्हा युद्धकलेत अत्यंत हुशार व निष्णात असणाऱ्या या मराठा सेनानीने आपले लष्कर मोगल रसदेच्या मार्गावरच उभे केले. त्याने निवडलेली जागा त्याच्या लष्करी डावपेचाला अनुकूल अशी होती. शत्रू जवळ आल्याचे समजताच त्याने आपले बहुसंख्य घोडदळ मागे ठेवून तो स्वतः २-३ हजार घोडदळासह शत्रूस सामोरे गेला. मराठ्यांचे घोडदळ मोगलांच्या घोडदळाहून दुप्पट होते. पण त्याची पर्वा न करता मोगलांनी मराठ्यांचा पाठलाग सुरू केला. संताजीची ही माघार पूर्वनियोजित होती. त्याला विजयासाठी काही अवधी हवा होता. आपल्या पाठीवर शत्रू घेत त्याने त्यास अशा जागी आणले की, जिथे मराठ्यांचे मुख्य घोडदळ तयारीत होते. शत्रू टप्प्यात येताच मराठ्यांनी त्यांस सर्व बाजूंनी घेरले. मोठी धुमश्चक्री उडाली. मराठ्यांनी अलिमर्दानखानासह कित्येक मोगल अधिकारी व व्यापारी*

१०. Martin's Memoires, pp. 245-246

*यांना कैद केले. शिवाय ५ हत्ती, ३०० उमदे घोडे, वाहतुकीची जनावरे आणि सर्व सामानसुमान त्यांच्या हाती पडले. त्या सर्वांना घेऊन मराठे जिंजी किल्ल्यात निघून गेले.)*

## जिंजी पुढील मोगली लष्कराची दाणादाण

कर्नाटकात संताजी आणि धनाजी यांनी प्राप्त केलेल्या विजयामुळे शत्रूच्या उरात धडकी भरली होती. सर्वत्र एवढी घबराट पसरली होती की, जिंजीपुढील मोगली फौज आणि बादशहाची छावणी या दरम्यान असणारे दळणवळणच बंद पडले होते. बादशाही छावणीतून काही बातमीपत्रच न आल्याने जिंजीपुढील मोगली लष्करात अफवांचे पीकच उठले होते. खुद्द औरंगजेब बादशहा परलोकवासी झाल्याची अफवा सर्वत्र पसरली होती. या अफवेने सर्वांत अधिक अस्वस्थ झाला होता तो शहाजादा कामबक्ष. बादशहाच्या मृत्यूनंतर सिंहासनासाठी होणाऱ्या झगड्यात मराठ्यांचे साहाय्य मिळावे, असा त्याचा प्रयत्न चालू होता. असदखान व जुल्फिकारखान यांच्याप्रमाणे त्यानेही राजाराम महाराजांशी गुप्त संधान बांधले होते.

दरम्यान जिंजीपुढील मोर्चे टाकून मोगल सैनिक मुख्य तळाकडे निघून येऊ लागले होते. सर्वत्र मराठ्यांविषयी मोठी धास्ती उत्पन्न झाली होती. अशा संधीचा फायदा घेऊन मराठ्यांनी किल्ल्याबाहेर पडून मोगलांचे मोर्चे उद्ध्वस्त करून टाकले. या प्रसंगी मोगलांची मराठ्यांशी मोठी लढाई घडून आली. खुद्द जुल्फिकारखानास हाती शस्त्र धरावे लागले. मराठ्यांच्या प्रखर हल्ल्यातून खानाने आपले लष्कर कसेबसे मुख्य तळावर आणले. उभय खानांची अवस्था मोठी बिकट झाली होती. शहाजादा कामबक्ष रात्री गुप्तपणे किल्ल्यात राजाराम महाराजांकडे पळून जाण्याची शक्यता असल्याची बातमी त्यांना लागली होती. अशा गोंधळलेल्या अवस्थेतच खानांनी शहाजाद्याच्या तळावर छापा टाकून त्यास कैद केले - (१६ डिसें., १६९२). या घटनेमुळे मोगल सैनिकांचे उरलेसुरले नीतिधैर्यही नष्ट झाले. मराठ्यांचे प्रत्यही वाढते हल्ले, अन्नधान्याची व गवतचाऱ्याची तीव्र टंचाई आणि मोगली छावणीतील

कटकारस्थाने यांमुळे संपूर्ण मोगली लष्कर एका मोठ्या संकटात सापडले. या संकटातून मोगली लष्करास सुखरूपपणे बाहेर काढण्याची कुवत फक्त जुल्फिकारखानापाशी होती. त्याने तळाबाहेर पडून रसद आणण्याचा दोनवेळा प्रयत्न केला; पण दोन्ही वेळा मराठ्यांच्या हल्ल्यापुढे माघार घेऊन त्यास परतावे लागले. आता त्याच्या तळाभोवती मराठ्यांचा वेढा पडल्यासारखी परिस्थिती निर्माण झाली होती[११] - (डिसेंबर, १६९२).

जिंजीपासून वांदिवॉश हे ठिकाण सुमारे २५ मैल दूर आहे. तेथे मोगलांची अन्नधान्य सामग्री होती. ती आणण्याचा जुल्फिकारखानाचा प्रयत्न चालू होता. दोन प्रयत्न अयशस्वी झाल्यावर त्याने वांदिवॉशला जाण्याचा तिसरा प्रयत्न केला आणि त्यात तो यशस्वी झाला. वांदिवॉशला वंजाऱ्यांचे तांडे अन्नधान्य घेऊन थांबले होते. मोगली लष्करात एवढी बेशिस्त माजली होती की, उपाशी सैनिकांनी रात्री त्या तांड्यांवर हल्ला करून ते लुटले. दुसरे दिवशी या हल्ल्यातून वाचलेले अन्नधान्य गोळा करून खान वांदिवॉशहून आपल्या तळाकडे निघाला. मार्गात देसूर[१२] या ठिकाणी संताजीने आपल्या २० हजार सैन्यानिशी खानावर हल्ला चढविला- (५ जाने. १६९३). मोठी तेज लढाई घडून आली.[१३] भीमसेन सक्सेना हा मोगल इतिहासकार या लढाईच्या प्रसंगात हजर होता. त्याने ही लढाई प्रत्यक्ष पाहिली असल्याने त्याच्या वर्णनास महत्त्व प्राप्त झाले आहे. भीमसेन लिहितो :

" ...जुल्फिकारखान परत येण्यास निघाला. मराठ्यांनी चोहीकडून हल्ले करण्यास सुरुवात केली. मराठे देसूर मुक्कामी गोळा झाले होते. त्यांनी मोगलांची वाट अडविली. मोगलांपाशी बाराशेपेक्षा

११. मोगल आणि मराठे (तारिखे दिल्कुशा), पृ. ११३-११६, Maasiri Alamgiri, p. 216; Muntakhabul Lubab Muhammadshahi, p. 349; Martin's Memoires pp. 245-247

१२. जिंजीपासून ईशान्येस १३ मैलांवर

१३. मोगल आणि मराठे (तारिखे दिल्कुशा), पृ. 116-117, A History of Gingee, p. 307, Diary and Consultation Book, 1693, p. 23

जास्त फौज नव्हती. राव दल्पतने सैन्याची उजवी बाजू सांभाळली आणि त्याने शत्रूंना हटविले. इतक्यात रात्र झाली. मोगल सैन्य किल्ल्याच्या पायथ्याशी तळ देऊन राहिले. दुसऱ्या दिवशी सकाळी मराठ्यांनी बरेच सैन्य आणले. त्यांनी निकराचे हल्ले चढविले. त्यांनी इतक्या गोळ्या झाडल्या की, मोगल सैनिक आणि सैन्याबरोबर असलेले वंजारी हवालदिल झाले. मराठ्यांचे बंदुकची मोगल सरदारांच्या हत्तींवर नेम धरून गोळ्या झाडू लागले. जुल्फिकारखान व राव दल्पत यांच्या हत्तींना अनेक गोळ्या लागल्या. राव दल्पतने स्वतः गोळ्या झाडून आणखी काही मराठा सरदारांना ठार मारले. मराठ्यांकडून गोळ्यांचा वर्षाव चालूच होता. मी राव दल्पतच्या मागे बसलो होतो. राव दल्पतचे रक्षण व्हावे म्हणून राव दल्पतच्या समोर ढाल धरली. खराखुरा वाचविणारा भगवान आहे! लागोपाठ दोन गोळ्या माझ्या खांद्याच्या दिशेने आल्या. त्या ढालीला लागल्या. आम्ही कूच करीत असता वाटेत भातशेते लागली. आमच्या सैन्यातील किती तरी बैल आणि उंट चिखलात अडकले. घोडे मोठ्या मुश्किलीने पार झाले. आमच्यापाशी दारूगोळ्याचा तुटवडा पडला. बरकंदाजांपैकी कोणापाशीही दारूगोळा राहिला नाही. एकीकडे राव दल्पत आणि त्याचे पथक, मध्ये चिखल आणि पलीकडे उजव्या बाजूस बरकंदाज स्वार अशी स्थिती झाली. राव दल्पतच्या हत्तीपाशी ऐंशीपेक्षा अधिक स्वार शिपाई नव्हते. मराठ्यांनी तेथून जवळ असलेल्या टेकडीवर आपले पायदळ पाठविले. तेथून मराठ्यांनी राव दल्पतच्या तुकडीवर गोळ्या झाडण्यास सुरुवात केली. त्यामुळे अतिशय कठीण परिस्थिती झाली. चिखलातून अडकलेले बैल व उंट यांना काढण्यासाठी म्हणून राव दल्पत तेथे थांबला होता. बरीचशी मोगल फौज पुढे गेली होती. राव दल्पतने प्राणपणाचा निर्धार करून मराठ्यांच्या दिशेने चाल केली. इतक्यात जुल्फिकारखानाचा आघाडीचा सरदार सर्फराजखान हा पाच-सहा हजार सैन्य घेऊन राव दल्पतला येऊन मिळाला. दोघांनी एक होऊन मराठ्यांवर चाल केली. युद्धाला तोंड लागले तसे सर्फराजखान हा आपल्या सैन्यात दाखल होण्यासाठी तिकडे वळला. मराठ्यांची मुख्य तुकडी बारा हजारांची होती. राव दल्पत

या तुकडीवर चालून गेला आणि मर्दुमकीने लढू लागला. युद्धाचा एकंदरीत रंग पाहून मराठे एका बाजूस झाले. राव दल्पतने पाव कोसापर्यंत मराठ्यांना मागे हटवले. त्याच्या ऐंशी स्वारांवर मराठ्यांनी हात टाकला नाही. राव दल्पत त्या ठिकाणी घटकाभर थांबला. त्याने सामानसुमान चिखलातून बाहेर काढविले. मराठे लांब आपल्या जाग्यावर थांबले होते. यानंतर राव दल्पत हळूहळू आपल्या बुणग्यांच्या पाठोपाठ रवाना झाला. गोळ्यांचा मारा व चकमकी कमी झाल्या. राव दल्पत नदीच्या काठावर पोहोचला. काही तोफा चिखलात फसल्या होत्या. राव दल्पतने हत्तींच्या कमरेला जाड दोर बांधून त्यांच्या साहाय्याने तोफा बाहेर काढल्या. मराठे आश्चर्यचकित झाले. त्यांनी जिंजीची वाट धरली."[१४]

राव दल्पत हा उत्तर हिंदुस्थानातील दतिया संस्थानचा बुंदेला राजा आणि मोगल लष्करातील एक उमराव होता. औरंगजेबाच्या दक्षिणेच्या मोहिमेत त्याने अनेक पराक्रम केले. विशेषतः जुल्फिकारखानाच्या मोहिमांत तो खानाबरोबर अनेक वेळा राहिला होता. भीमसेन सक्सेना हा राव दल्पतचा चिटणीस होता. तोही राव दल्पतबरोबर मराठ्यांविरुद्धच्या अनेक मोहिमांत, विशेषतः जिंजीच्या वेढ्याच्या प्रसंगी हजर होता. तेव्हा त्याच्या ग्रंथातील अनेक लढायांची वर्णने त्याने स्वतः पाहून लिहिली आहेत. या दृष्टीने त्याच्या वृत्तांतास इतिहासाच्या दृष्टीने अत्यंत महत्त्व आहे. त्याच्या उपरिनिर्दिष्ट लढाईच्या वर्णनातून मराठे मोगलांबरोबर कशा लांडगेतोड पद्धतीची लढाई करीत असत, याची थोडी कल्पना येते.

## मोगली लष्कराची माघार : संताजीचा रुसवा

मोठ्या शिकस्तीने वांदिवॉशहून आणलेली अन्नधान्याची सामग्री लगेच संपून गेली. मोगल सैनिक व जनावरे उपासमारीने मरू लागली. मोगली लष्कराची मोठी दयनीय अवस्था झाली. मद्रासकर इंग्रज वखारवाले आपल्या डायरीत नमूद करतात : "Zulphkar Cawn and

१४. मोगल आणि मराठे (तारिखे दिल्कुशा), पृ. ११६-११७

Assid Cawn.... are reduc'd into such streights by the Morattos, that unless a speedy supply of men and provisions arrive, they will be forc'd to quitt the seige of Chingee and withdraw their forces out of these parts, which yet is doubtfull whether they can escape the Morattos, who are grown too strong of late by a recuit of numbers... it will be difficult for them (Mughals) to escape..."[15]

*(जुल्फिकारखान व असदखान यांच्यावर मराठ्यांनी अशी आपत्ती आणली आहे की, त्यांना अन्नधान्याची व सैन्याची कुमक तातडीने मिळाली नाही, तर त्यांना जिंजीचा वेढा उठवावा लागेल आणि या भागातून आपले सैन्य काढून घ्यावे लागेल. तथापि आता त्यांना तसे करणेही शक्य होईल की नाही, याबद्दल शंका वाटते. कारण मराठ्यांच्या सैन्यात नव्याने सैन्यभरती झाल्याने त्यांची लष्करी ताकद इतकी वाढली आहे की, मोगली सैन्य मराठ्यांच्या तडाख्यातून सुटेल असे वाटत नाही.)*

मद्रासकर इंग्रज म्हणतात त्याप्रमाणे खरोखरच जिंजीपुढील मोगली लष्कराची आता धडगत नव्हती. मोगली लष्कर अशा संकटात सापडले होते की, जुल्फिकारखानास राजाराम महाराजांकडे तहाची याचना करण्याशिवाय काही गत्यंतरच उरले नव्हते. शेवटी आपणास आपल्या लष्करासह वांदिवॉशला सुखरूप माघार घेऊ द्यावी, अशी विनंती त्याने जिंजीमधील राजाराम महाराजांकडे धाडली. संताजी जिंजीत नव्हता, तो आल्यावर खानाच्या विनंतीचा विचार करावा, असे राजाराम महाराजांनी ठरविले; पण लवकरच त्यांनी तो विचार बदलला आणि खानाच्या विनंतीचा स्वीकार करून त्यास वांदिवॉशपर्यंत माघार घेण्याची त्यांनी परवानगी दिली. खानाने राजाराम महाराजांना नजराणा म्हणून एक लाख रुपयांचे सोने नाणे आणि साठ हजार पागोड्यांचे[१६] जडजवाहिर पाठविले. परत भेट म्हणून महाराजांनीही १५ हजार

१५. Diary & Consultation Book, 1693, p. 24

१६. पागोडा : मद्रास कर्नाटकात प्रचलित असलेले एक प्रकारचे सोन्याचे नाणे

पागोड्यांचे जडजवाहिर, एक हत्ती, दोन घोडे, वाहतुकीसाठी उंट व बैल पाठविले.[१७]

दरम्यान संताजी आपल्या फौजेसह जिंजीत येऊन पोहोचला. संताजी हाडाचा शिपाईगडी होता. मोगली लष्कर असे विकलांग झाले असता त्यास जबरदस्त तडाखा देऊन ते नष्ट करण्याचा अथवा लष्कराच्या सुरक्षित माघारीच्या मोबदल्यात शहाजादा कामबक्षास ओलीस ठेवून घेण्याचा सल्ला त्याने राजाराम महाराजांना दिला; पण महाराजांनी संताजीच्या सल्ल्याचा स्वीकार न करता खानाशी नुकताच केलेला मैत्रीचा करार पाळण्याचे ठरविले. परिणामी संताजीस वाटले की, राजाने आपला सल्ला मानला नाही. संताजीस असेही वाटले असावे की, मोगलांना सपाटून मार देऊन त्यांना दाती तृण धरावयास आम्ही लावले, तेव्हा मोगलाशी करार करताना आमच्या सल्ल्याचा मान राखला गेला पाहिजे. आणखी एक महत्त्वाची गोष्ट लक्षात घेतली पाहिजे, ती म्हणजे धनाजी जाधव यावेळी जिंजीमध्ये होता तेव्हा राजाने धनाजीच्या सल्ल्याने खानाशी करार केला असावा व आपणास मात्र डावलले, असेही संताजीस वाटले असावे. परिणामी हा आपला अपमान आहे, असे समजून संताजी जिंजीच्या दरबारातून रुसून बाहेर पडला आणि जिंजीच्याच आसमंतात छावणी करून राहिला[१८] - (जाने., १६९३).

लष्करीदृष्ट्या विचार करता संताजीचा पहिला सल्ला योग्य होता. मोगल साम्राज्याचा वजीर असदखान, सेनापती जुल्फिकारखान आणि खुद्द शहाजादा कामबक्ष असे तीन नामांकित उमराव त्यांच्या फौजेसह मराठ्यांनी कर्नाटकात बुडविले असते, तर तो मराठ्यांचा फार मोठा लष्करी विजय मानला गेला असता. एवढेच नव्हे तर या विजयाने मोगलांच्या दक्षिणेतील प्रतिष्ठेला जबरदस्त धक्का बसला असता. संताजीचा दुसरा सल्लाही राजनैतिक डावपेचाचा आणि म्हणून अत्यंत मोलाचा होता.

---

१७. Martin's Memoires, pp. 247-248

१८. कित्ता, पृ. २४८; मोगल आणि मराठे (तारिखे दिल्कुशा), पृ. ११८

पण हे दोन्हीही सल्ले राजाराम महाराजांनी स्वीकारले नाहीत. याचे महत्त्वाचे कारण म्हणजे राजाराम महाराज आणि जुल्फिकारखान या दोघांचे अंतःस्थ राजकारण यापूर्वीच शिजले होते. एकाच्या बिकट अवस्थेचा दुसऱ्याने फायदा न घेता वेढ्याचे नाटक चालू ठेवायचे, हे ते राजकारण होते. या राजकारणामुळेच जेव्हा राजाराम महाराजांची जिंजीमध्ये बिकट अवस्था निर्माण झाली होती, तेव्हा जिंजीवर हल्ला करण्यात जुल्फिकारखानाने अंगचोरपणा केला होता. डिसें. १६९१ मध्ये म्हणजे अदल्याच वर्षी खानास असदखान व कामबक्ष ससैन्य येऊन मिळाले तेव्हा जिंजीपुढील मोगली लष्कराची ताकद एवढी वाढली होती की, खानाने मनात आणले असते, तर त्याने जोरदार हल्ला करून जिंजी सहजासहजी काबीज केली असती; पण त्याने तसे केले नाही. खानाच्या या उपकाराची परतफेड राजाराम महाराजांनी त्यास वांदिवॉशपर्यंत सुखरूप परत जाऊ देण्यात केली.

आणखी असे की, जिंजीपुढील मोगली लष्कर संताजीच्या सल्ल्याप्रमाणे पूर्ण गारद केले असते, तर मोगलांशी चालू असलेला मराठ्यांचा लष्करी संघर्ष पूर्ण संपणार होता, असे नाही. कारण जिंजी जिंकून घेण्यासाठी तेवढीच मोठी फौज आणखी एखाद्या नामांकित सेनानीच्या आधिपत्याखाली बादशहाने कर्नाटकात पाठविली असती आणि या नव्या सेनानीशी राजाराम महाराजांचे राजकारण जमलेच असते असे नाही. पुढे जिंजीचा वेढा ट्रॉयच्या वेढ्याप्रमाणे कित्येक वर्षे चालला. कधी मोगलांचे तर कधी मराठ्यांचे पारडे जड होत गेले; पण राजाराम महाराजांच्या या राजनीतीमुळे मराठ्यांचा कार्यनाश झाला नाही. शेवटी स. १६९७ साली जिंजी आता कोणत्याही परिस्थितीत घेतली पाहिजे, अशी निकड जेव्हा खानास लागली तेव्हाही त्याने जिंजी घेण्यापूर्वी राजाराम महाराज व त्यांचा काबिला यांना सुखरूप निघून जाण्याची संधी दिली, ही गोष्ट या ठिकाणी लक्षात घेतली पाहिजे.

आता संताजीच्या शहाजादा कामबक्षास ओलीस ठेवण्याच्या सल्ल्याचा विचार करू. वास्तविक मराठे जर शहाजादा कामबक्षास

ओलीस ठेवून घेण्यात यशस्वी झाले असते, तर तो त्यांचा फार मोठा राजनैतिक विजय ठरला असता; पण हाही सल्ला राजाराम महाराजांनी स्वीकारला नाही. याचे कारण शहाजाद्यास ओलीस ठेवणे ही वरवर दिसते एवढी सोपी गोष्ट नव्हती. असदखान व जुल्फिकारखान हे दोघेही या गोष्टीस तयार झाले नसते. केवळ आपल्या सुरक्षिततेसाठी शहाजाद्यास ओलीस ठेवण्याचे धाडस उभय खान करणे शक्य नव्हते. त्यांनी जर तसे केले असते, तर त्यांची पदेच नव्हे, तर प्राणही बादशहाने हिरावून घेतले असते. तेव्हा हा सल्ला दिसायला फार मोलाचा वाटला, तरी त्याप्रमाणे प्रत्यक्ष घडणे अवघड होते. विशेषतः खानाशी राजाराम महाराजांचा जो गुप्त करार झाला होता त्या पार्श्वभूमीवर खानास अडचणीत आणणारे कोणतेही कृत्य राजाराम महाराजांकडून घडणे शक्य नव्हते.

यासंदर्भात पुढे घडून आलेली एक घटना अभ्यास करण्यासारखी आहे. सन १६९७ साली जेव्हा काहीही करून जिंजी हस्तगत करावयास हवी अशी परिस्थिती निर्माण झाली, तेव्हा खानाने राजाराम महाराजांकडे तसा निरोप पाठविला; पण किल्ला सोडून महाराष्ट्रात निघून जाण्यासाठी महाराजांना तयारीसाठी काही अवधी हवा होता. असा अवधी मिळावा म्हणून महाराजांनी आपला प्राणप्रिय पुत्र राजा कर्ण यास मराठा मुत्सद्यांबरोबर खानाच्या छावणीत वाटाघाटीसाठी पाठविले. या वाटाघाटी अयशस्वी झाल्या. राजा कर्ण सुखरूपपणे जिंजीत परत आला- (ऑक्टो. १६९७). वास्तविक यावेळी खानाने राजा कर्णास कैद करून ओलीस ठेवले असते, तर बादशहाने त्यास दोष न देता उलट त्याचा गौरवच केला असता; पण त्याने तसे केले नाही. कारण त्यास पूर्वीच्या राजकारणाचे संदर्भ होते, हे उघड होते.

तेव्हा संताजीचा सल्ला लष्करीदृष्ट्या योग्य असला, तरी राजकीय व राजनैतिकदृष्ट्या तो व्यवहार्य नव्हता. राज्यकर्त्यास प्राप्त परिस्थितीचा केवळ लष्करीदृष्ट्या विचार करून भागत नाही, तर त्या परिस्थितीच्या अन्य बाजूही विचारात घ्यावा लागतात. राजाराम

महाराजांनी नेमके हेच केले. असा निर्णय घेण्याचा छत्रपतींस पूर्ण अधिकार आहे, हे संताजी विसरला. रणांगणावरील विजयाने सेनापतीच्या पदास आणि शब्दास अधिक महत्त्व प्राप्त होते हे खरे; पण त्याचा असा अर्थ नव्हे की, त्याचा प्रत्येक सल्ला राजाने मानला पाहिजे. संताजी हा पराक्रमी होता हे जसे खरे, तसे तो छत्रपतींचा सेवकही होता, हे तितकेच खरे होते. संताजी नेमके हेच विसरला; हे केवळ त्याचेच नव्हे तर मराठी राज्याचे दुर्दैव होते.

२२ जानेवारी, १६९३ रोजी हुकमाची वाट न पाहता जिंजीपुढील मोगली लष्करातील तोफखान्याच्या सैनिकांनी प्रथम तळ सोडला. त्यानंतर मात्र तळावरील सर्व लष्कर वांदिवॉशची वाट चालू लागले. पोटात अन्न नाही, सामानसुमानासाठी जनावरे नाहीत आणि मराठ्यांच्या हल्ल्यांची सतत भीती अशा अवस्थेत मोगल लष्कर कसेबसे वांदिवॉशला जाऊन पोहोचले. मागे तळावर बरीच साधनसामग्री मोगलांना सोडून यावी लागली. मराठ्यांनी ती लुटून नेली.[१९]

## संताजीचा कासिमखानवर विजय

जिंजीपुढे मोगली लष्कराची दाणादाण उडाल्याची बातमी बादशाही छावणीत जाऊन पोहोचलीच होती, तेव्हा आपल्या या लष्करास वाचविण्यासाठी मुबलक साधनसामग्री देऊन बादशहाने आपल्या कासिमखान नावाच्या नामांकित सरदारास जिंजीकडे धाडले होते. अलिमर्दानखान हा मराठ्यांचा कैदी झाला होता. त्याच्या जागी आता कासिमखानची नेमणूक बादशहाने केली होती. खान साधनसामग्री घेऊन जिंजीकडे येत असल्याची वार्ता संताजीस न समजता राहिली नाही. अलिमर्दानखानाप्रमाणे या कासिमखानासही धडा शिकविण्याचे त्याने ठरविले.

कांचीपूरमपासून पूर्वेस २० मैलांवर असणाऱ्या कावेरीपाक या ठिकाणी कासिमखानावर संताजीने अचानक हल्ला चढविला. अल्पावकाशात खानाच्या फौजेचा धुव्वा उडाला. रणमैदानातून पलायन

---

१९. मोगल आणि मराठे (तारिखे दिल्कुशा), पृ. ११९

करून खानाने आपला जीव व थोडीबहुत साधनसामग्री वाचविली आणि आपल्या सहकाऱ्यांनिशी कांचीपूरम गाठले. तेथे त्याने काही देवळांचा आश्रय घेतला. दरम्यान जुल्फिकारखान आपल्या फौजेसह तिथे येऊन पोहोचला. कासिमखानावरील संताजीच्या संभाव्य हल्ल्याची त्यास पूर्वकल्पना असावी. संताजी कासिमखानावर हल्ला करून त्यास पेचात आणणार हा अंदाज अनुभवी व चाणाक्ष जुल्फिकारखानाने केला असावा. म्हणूनच तो कासिमखानाच्या मदतीस ऐनवेळी जाऊन पोहोचला. भीमसेन सक्सेना लिहितो, "कासिमखान कावेरी पाकला पोहोचताच संताजी हा त्याच्यावर तुटून पडला. कांचीच्या जवळ युद्ध झाले. कासिमखानावर मोठा बिकट प्रसंग ओढवला. कासिमखानाने कांचीच्या देवळात आश्रय घेतला म्हणून बरे झाले, नाही तर तो कैद झाल्याशिवाय राहिला नसता. जुल्फिकारखानाने शहाजादा कामबक्ष यास वांदिवॉशच्या किल्ल्यात सुरक्षित ठेवले. नंतर तो कासिमखानाच्या मदतीस पोहोचला आणि त्याने बंजाऱ्यांना रसदीबरोबर सुरक्षितपणे वांदिवॉशला आणले"[२०] - (७ फेब्रु., १६९३).

संताजी छत्रपतींवर रुसला असला, तरी तो या काळात स्वस्थ बसलेला नव्हता. शत्रूशी त्याचा संघर्ष चालूच होता. संताजी रुसव्यात असल्याने कासिमखानावर चालून जाण्याचा हुकूम राजाराम महाराजांनी त्याच्याकडे धाडला नसणार हे उघड आहे. अशा वेळी संताजीने आपणहून कासिमखानावर चालून जाऊन त्यास पराभूत केले व रणांगणावरून पळवून लावले.

संताजीच्या व्यक्तिमत्त्वाचा हा एक विशेष फार महत्त्वाचा मानला पाहिजे.

***

---

२०. मोगल आणि मराठे (तारिखे दिल्कुशा), पृ. ११९-१२०



# ७.
# संताजीच्या गनिमी काव्याच्या लढाया आणि मराठ्यांचे यादवी राजकारण

## मराठे यशाच्या शिखरावर

सन १६९२ च्या अखेरीस जिंजीसमोरच्या मोगली लष्करावर संताजी व धनाजी यांनी मोठमोठे विजय प्राप्त केल्यामुळे कर्नाटकातील मराठ्यांचे नीतिधैर्य खूप उंचावले होते, तर तेवढ्याच प्रमाणात ते मोगलांचे खच्ची झाले होते. मोगली लष्कराच्या दयनीय अवस्थेत जुल्फिकारखान व कामबक्ष या बड्यांच्या हेव्यादाव्याने भरच पडली होती. असदखान व जुल्फिकारखान या पितापुत्रांनी कामबक्षास कैद केल्याने मोगली लष्करातील गोंधळाचा कहर झाला होता; पण या सर्व अडचणींवर जुल्फिकारखानाने मात केली. जिंजीच्या किल्ल्यात असणाऱ्या मराठ्यांच्या राजाबरोबर करार करून खानाने मोगली लष्कराची जिंजीपुढून कशीबशी सुटका करून घेतली आणि वांदिवॉशपर्यंत सुखरूप माघार घेण्यात तो यशस्वी झाला.

मराठे यावेळी यशाच्या शिखरावर होते. राजाराम महाराजांनी जिंजीहून जाहीरनामाच काढला होता की, गोवळकोंडा, कर्नाटक (मद्रास-कर्नाटक) त्यांचा झाला असून, केशव रामण्णा हा मराठ्यांतर्फे त्यावर सुभेदार म्हणून नियुक्त केला आहे. तसेच या सुभेदारास गोवळकोंडा-कर्नाटकातील सर्व प्रदेश ताब्यात घेण्याचा आदेश देण्यात आला आहे.[१]

## राजाराम महाराज व संताजी त्रिचनापल्ली मोहिमेवर

जिंजीच्या वेढ्यात राजाराम महाराजांना तंजावरचे राजे व्यंकोजीपुत्र शहाजी महाराज यांचे मोठे साहाय्य होत होते. कठीण प्रसंगी शहाजी महाराजांनी जिंजीकडे द्रव्य आणि लष्कर यांची मदत पाठविली

---

१. Diary & Consultation Book, 1693, pp. 22-23

होती, ही गोष्ट मोगलांच्या नजरेतून सुटली नव्हती. मोगलांचे असे शत्रुत्व स्वीकारूनही शहाजी महाराजांनी आपल्या राजबंधुप्रत असणारे कर्तव्य पार पाडले होते. त्यांचे उतराई होण्यासाठी राजाराम महाराजांनी त्रिचनापल्लीची मोहीम हाती घेतली.

त्रिचनापल्लीचा नायक हा शहाजी महाराजांचा शत्रू होता. जिंजीच्या वेढ्यात मोगलांना त्याने मदतही केली होती. आता जिंजीपुढे मोगली लष्कराचा जबर पराभव झाल्याने कर्नाटकातील परिस्थिती बदलली होती. अशा परिस्थितीत त्रिचनापल्लीच्या नायकास धडा शिकविण्याचे राजाराम महाराजांनी ठरविले आणि त्याप्रमाणे आपला सेनापती संताजी घोरपडे याची मोहीम त्यांनी नायकावर पाठविली. संताजीने कूच करून त्रिचनापल्लीस वेढा दिला- (मार्च १६९३). हा वेढा चालू असतानाच राजाराम महाराज जिंजीतून बाहेर पडून संताजीस येऊन मिळाले. मराठ्यांच्या लष्करी सामर्थ्यासमोर नायक फार काळ तग धरू शकला नाही. त्याने शरणागतीची बोलणी लावली आणि त्याप्रमाणे २३ एप्रिल, १६९३ रोजी मराठ्यांचा नायकाशी तह झाला.[२]

त्रिचनापल्लीहून पूर्वेस अवघ्या ३२ मैलांवर तंजावर आहे. तंजावरच्या या शत्रूचे मर्दन करून राजाराम महाराज आपल्या बंधूच्या भेटीस तंजावर नगरीस गेले. संताजी बहुधा जिंजीकडे परतला असावा.

दरम्यान मराठ्यांच्या गोटात एक दुर्दैवी घटना घडून आली. मराठ्यांचा पराक्रमी सेनानी आणि संताजीचा बंधू बहिर्जी उर्फ हिंदुराव घोरपडे याने राजाराम महाराजांविरुद्ध बंडखोरी केली.

## बहिर्जी घोरपड्याची बंडखोरी

जिंजीपुढील मोगली लष्करावर मराठ्यांनी मिळविलेल्या प्रचंड विजयामुळे कर्नाटकात मराठ्यांची राजकीय व लष्करी प्रतिष्ठा शिगेला पोहोचली असतानाच मराठा दरबारात कलीचा संसार व्हावा, हे मोठे दुर्दैव होते. राजाराम महाराज संताजीसह त्रिचनापल्लीच्या मोहिमेवर असताना मागे बहिर्जी घोरपडे व याचप्पा नाईक या दोघांनी राजाराम

---

२. शिवचरित्र प्रदीप, पृ. ३६-३७

महाराजांविरुद्ध बंडखोरी केली. स. १६९० साली मोगली फौजा कर्नाटकातील प्रदेशांचा कब्जा घेण्यासाठी जेव्हा पुढे सरसावल्या होत्या, तेव्हा हा नायक हिंदू धर्माच्या संरक्षणाच्या नावाखाली मराठ्यांनी उभारलेल्या आघाडीस येऊन मिळाला होता. तेव्हापासून तो मराठ्यांच्या बाजूनेच कर्नाटकात मोगलांशी लढत होता. आता तो बहिर्जीस सामील झाला होता.

बहिर्जी आणि याचप्पा यांच्या बंडखोरीची माहिती आपणांस जेधे शकावलीतून मिळते. जेधे शकावली म्हणते, "फालगुण मासी (मार्च १६९३) बहिरजी घोरपडा व याचप्पा नायेक राजारामावरी यागी होऊन गेले. ते याचप्पा नायेक सातगड घेतले. आणी तेथेच राहिले."[३]

बहिर्जी व याचप्पा नाईक यांनी राजाराम महाराजांविरुद्ध बंडखोरी का केली, याविषयी काहीही माहिती मिळत नाही. विशेष म्हणजे संताजी हा या बंडखोरीत सामील झालेला नाही. त्याच्या अनुपस्थितीत ही बंडखोरी झालेली आहे.

## संताजी सेनापतिपदावरून दूर

नुकतेच संताजीच्या रुसव्याचे प्रकरण घडून आले होते हे आपण पाहिले. खुद्द राजाराम महाराजांनी भेट घेऊन त्याची समजूत घातली होती. कोणत्या परिस्थितीत कोणत्या उद्देशांनी आपण जुल्फिकारखानाशी करार करून त्यास सुरक्षित माघार घेऊ दिली, याची जाणीवही महाराजांनी त्यास करून दिली होती. आपणास महाराजांचे म्हणणे सर्व पटले असे संताजीने वरवर दाखविले असले, तरी तो पूर्ण समाधानी नव्हता. नाराज असावा असे दिसते. कारण त्रिचनापल्लीच्या मोहिमेवरून परतताच त्याच्या मनात पुन्हा चलबिचल सुरू झाली.

तंजावर भेटीनंतर राजाराम महाराज जिंजीत परतल्यानंतर त्यांच्याशी संताजीचा बहिर्जीच्या बंडखोरीबद्दल वादही झाला असणे शक्य आहे. आपणास पुढे जे दिसते ते असे की, संताजीही राजाराम महाराजांना सोडून जिंजीबाहेर पडला आणि त्याने सरळ महाराष्ट्राचा

३. शिवचरित्र प्रदीप, पृ. ३६

रस्ता धरला (मे १६९३). जेधे शकावली सांगते, "वैशाख मासी संताजी घोरपडे राजारामसीहि बिघाड करून देशास गेले. त्यावरी धनाजीस नामजाद केले."[४]

राजाराम महाराजांनी तत्काळ संताजीस सेनापतिपदावरून दूर करून त्या जागी धनाजी जाधवास नेमले. तत्कालीन साधनांमधून आपणास फक्त घटनांचा सांगाडा हाती येतो. या घटना का व कशा घडल्या याविषयी तर्कबुद्धी शिवाय दुसरा आधार नाही. असे वाटते की, संताजी, बहिर्जी, याचप्पा नाईक या राजाराम महाराजांच्या दरबारातील सेनानींना सतत वाटत असले पाहिजे की, आपला पराक्रम धनाजी जाधवाहून मोठा असूनही दरबारात धनाजीच्या शब्दास जी किंमत आहे ती आपल्या शब्दास नाही. दुसऱ्या शब्दांत राजाराम महाराज धनाजीचे पक्षपाती आहेत; परिणामी याची परिणती संताजीच्या रुसव्यात अथवा बहिर्जीच्या बंडाव्यात झालेली दिसते.

पण या ठिकाणी एक महत्त्वाची गोष्ट लक्षात घेतली पाहिजे, ती म्हणजे राजाराम महाराजांशी बखेडा करून जिंजीबाहेर पडल्यावर संताजी हा आपल्या बंडखोर बंधूस न मिळता तडक महाराष्ट्रात आलेला आहे. मागे कर्नाटकात बहिर्जी व त्याचा सहकारी याचप्पा हे ससैन्य जिंजीच्या परिसरात वावरत राहिले. राजाराम महाराजांनी लवकरच या बंडखोरांचे पारिपत्य करण्यासाठी एक मोहीम काढली. खुद्द महाराजांनी या बंडखोरांशी वेलोर जवळ लढाई दिली. जेधे शकावली सांगते- "जेष्ट मासी (मे-जून.,१६९३) याचप नायक, बहिरजी वेळुरा जवल होते, तेथे राजारामे जाऊन त्यासी झगडा केला."[५] या लढाईचा निकाल काय लागला हे जेधे शकावली सांगत नाही. बहुधा बहिर्जी व याचप्पा यांचा पराभव झालेला असावा.

लवकरच याचप्पाने बहिर्जीची संगत सोडून दिली व तो जुल्फिकारखानास जाऊन मिळाला. मोगलांकडून त्यास सहा हजाराची

४. कित्ता, पृ. ३७
५. शिवचरित्र प्रदीप, पृ. ३७

मनसब व तीन लाख होनांची जहागीर मिळाली.[६] पुढे बहिर्जीसही छत्रपतींविरुद्ध केलेल्या बंडखोरीचा पश्चात्ताप झालेला दिसतो. कारण फेब्रु. - मार्च, १६९४ मध्ये, म्हणजे ६/७ महिन्यांनी खुद्द राजाराम महाराजांनी बहिर्जीचे समाधान करून त्यास हुजूर आणिले आणि मोगलांनी तंजावरवर स्वारी केली होती म्हणून त्यास सैन्य देऊन तंजावरच्या मदतीस पाठविले, अशी माहिती जेधे शकावली देते[७] - (मार्च.,१६९४).

## संताजी महाराष्ट्रात

राजाराम महाराजांनी संताजीस सेनापतिपदावरून दूर केले असले, तरी त्याच्याजवळ मोठी फौज होती. ११ जुलै, १६९३ रोजी कारवारकर इंग्रज आपल्या पत्रात नोंद करतात, "We heard it for certain Santagee Ghorpure passed the Ghauts with 20,000 horse."[८] वीस हजार घोडदळानिशी संताजी घोरपडे म्हणजे दक्षिणेतील मोगल-मराठा संघर्षातील मोठे शक्तिस्थान होते. अशा फौजेनिशी संताजी जिथे जाईल तिथे मराठ्यांचा अंमल प्रस्थापित होणार होता. सन १६९३ च्या दसऱ्याच्या सुमारास संताजी साताऱ्याच्या प्रदेशात होता.

संभाजी महाराजांच्या हत्येनंतर निर्माण झालेल्या असाधारण परिस्थितीत हणमंतराव निंबाळकर व बहिर्जी पांढरे हे मराठे सरदार मोगलांना मिळाले होते. आता ते पुन्हा स्वराज्यात येऊन मोगलांशी लढत होते. मोगल सरदार हिंमतखान हा हणमंतरावाच्या पाठलागावर होता; पण मार्गातच त्यास संताजी हा भोपाळगडच्या परिसरात[९] असल्याची बातमी लागली. तेव्हा हणमंतरावाचा पाठलाग अर्ध्यावरच सोडून खान भोपाळगडाकडे निघाला; पण खान भोपाळगडास पोहोचण्यापूर्वी दुसरा

६. शिवचरित्र प्रदीप, पृ. ३७, इतिहास आणि संस्कृती, अंक ४३, पृ. ६८, A History of Gingee, p. 315

७. शिवचरित्र प्रदीप, पृ. ३७

८. श्री राजाराम महाराज, पृ. १३९

९. भोपाळगड - साताऱ्याच्या आग्नेयेस ७५ मैलांवर

मोगल सरदार नजिबखान बहादूर याच्याशी संताजीची लढाई घडून आली.[१०]

## संताजी-हिंमतखानच्या पाठशिवणीच्या लढाया

या लढाईनंतर बहुधा नजिबखान निघून गेला असावा; पण तोपर्यंत हिंमतखान तिथे येऊन पोहोचला. संताजीस ही बातमी समजल्यावर तो हिंमतखानावर घसरला. माणगाव या गावाजवळ त्याने खानाच्या सैन्यास सर्व बाजूंनी घेरले. खान मोठ्या अडचणीत सापडला; पण त्याच्या सुदैवाने याच वेळी हमीदुद्दीनखान व ख्वाजाखान हे दोन मोगल सरदार त्याच्या मदतीस धावले. मोगली लष्कराची संख्या जास्त झाल्याचे पाहताच संताजीने आपली योजना बदलली आणि लढाई सोडून देऊन पळ काढावयास सुरुवात केली. तेव्हा तिन्ही खान संताजीचा पाठलाग करू लागले. विक्रमहळ्ळी या ठिकाणी उभयपक्षी लढाई घडून आली. १९ नोव्हें., १६९३ चे मोगल दरबारचे बातमीपत्र म्हणते- "हिंमतखान बहादूर, हमीदुद्दीनखान व ख्वाजाखान यांच्याकडून पुढीलप्रमाणे (बादशहासमोर) अर्ज आला - विक्रमहल्लीजवळ संताजीबरोबर युद्ध झाले. गोकुळ, अंजना वगैरे बेरड आणि संताजीबरोबरची तीनशे माणसे ठार झाली. तीनशे घोडी, निशाण, नगारे आमच्या हाती आले. आमची अनेक माणसे ठार किंवा जखमी झाली. मराठ्यांचा आम्ही पाठलाग केला. अर्ज वाचून बादशहा म्हणाले, 'मीठ खाल्ल्याचे सार्थक झाले. शाबास."[११]

मोगलांच्या दुर्दैवाने आता या तिन्ही खानांत भांडण सुरू झाले. परिणामी संताजीचा पाठलाग करण्याऐवजी हमीदुद्दीनखान व ख्वाजाखान गुलबर्ग्याकडे गेले. हिंमतखानाने मात्र संताजीचा पाठलाग चालूच ठेवला. यावेळी संताजीच्या फौजेत अमृतराव निंबाळकर हा मराठा सरदार होता. २१ नोव्हेंबर, १६९३ चे मोगल दरबारचे बातमीपत्र म्हणते की, संताजीने अमृतरावकडे चार हजार स्वार देऊन वऱ्हाडकडे पाठविले आणि तो स्वतः सहा हजार स्वार घेऊन मालखेडला पोहोचला.

१०. इतिहास आणि संस्कृती, अंक ४३, पृ. ६७-६८
११. मोगल दरबारची बातमीपत्रे, पृ. २९

मालखेड हे ठिकाण उत्तर कर्नाटकातील असून, सागरपासून ईशान्येस ४५ मैलांवर आहे. त्यावेळी या ठिकाणास मोठे महत्त्व होते. ते गोवळकोंडा प्रदेशाचे प्रवेशद्वारच समजले जाई. बादशहास जेव्हा ही बातमी समजली तेव्हा त्याने हमीदुद्दीनखान व ख्वाजाखान यांना वऱ्हाडात जाऊन अमृतरावाचा पाठलाग करावा, असा हुकूम केला आणि संताजीच्या पारिपत्यासाठी त्याने लष्करखान या सरदारास आपल्या बाजूने पाठविले. हिंमतखान हा संताजीच्या पाठलागावर होताच. त्यास मिळून साहाय्य करण्याचा हुकूम नांदेडचा सुभेदार अब्दुल्लाखान याजकडे धाडण्यात आला. संताजीविरुद्ध दाखविलेल्या हिंमतखानाच्या मर्दुमकीचे कौतुक म्हणून त्यास बादशहाने खिलतीची वस्त्रे आणि फर्मान पाठविले.[१२]

संताजी उत्तर कर्नाटकातील प्रदेशातून ठिकठिकाणी चौथाई वसूल करीत होता. मालखेडला पोहोचल्यावर त्याने तेथील देशमुख - देशपांड्यांकडून सात हजार होन चौथाईची मागणी केली; पण ही चौथाई वसूल होण्यापूर्वीच हिंमतखान पाठलाग करीत तिथे पोहोचला. तेव्हा संताजीने आपल्या फौजेसह प्रथम बेरडांच्या मुलखात व नंतर तिथून हैदराबादच्या दिशेने कूच केले. खान त्याच्या पाठलागावर असणारच. तेव्हा संताजीने त्यास हुलकावणी देऊन तो पुन्हा मालखेडच्या परिसरात आला. मालखेडजवळच्या अलूरच्या गढीत (मालखेडच्या नैऋत्येस १४ मैल) त्याने मुक्काम केला असता हिंमतखानाने त्यास गाठले आणि गढीस वेढा दिला. ३० नोव्हें., १६९३ चे बातमीपत्र म्हणते, "हिंमतखान बहादूर याजकडून पुढील बातमी कळाली की, हिंमतखान व सय्यद अब्दुल्लाखान यांनी संताजीला चित्तापूरजवळ अलूरच्या गढीत कोंडले असून किल्ल्याला वेढा घातला आहे. संताजीला आम्ही बाहेर पडू देणार नाही, अशा अर्थाचे मुचलके तिकडील जमीनदारांकडून घेण्यात आले आहेत."[१३] मोगल सेनानींकडून वेढला जाऊन सहजासहजी सापडणाऱ्या सेनानींपैकी संताजी नव्हता. वेढा घालून बसलेल्या

१२. मोगल दरबारची बातमीपत्रे, पृ. ३०

१३. कित्ता पृ. ३१-३२

मोगलांच्या हातावर तुरी देऊन संताजी गढीतून सहजी निसटून गेला.

संताजीच्या वरील सर्व धावपळीच्या लढायांचा वृत्तांत मोगल दरबारच्या बातमीपत्रांवरच आधारित आहे. ही बातमीपत्रे एकांगी असण्याचीही शक्यता आहे. अनेक प्रसंगी संताजीच्या गनिमी युद्धाच्या पद्धतीमधील माघार हा त्याचा पराभव म्हणूनच मोगल बातमीदार नोंदवताना दिसतो. दुसरे असे की, संताजीजवळ यावेळी २०-२५ हजारांची फौज असावी; पण ती अनेक तुकड्यांत विभागली गेली असावी. म्हणूनच मोगलांच्या बातमीपत्रांत तो ५-६ हजार फौजेनिशी वावरताना दिसतो. एकाचवेळी २०-२५ हजार फौज रणांगणावर आणून शत्रूशी सरळ सामना करण्याची संताजीची रणनीती नव्हती. मोगली बातमीपत्रांतून आणखी एक महत्त्वाची गोष्ट दिसून येते, ती म्हणजे शत्रूच्या प्रदेशात चौथाई वसूल करून आपल्या फौजेचा खर्च वरच्यावर काढण्याच्या पद्धतीचा अवलंब आता सरसहा केला जात होता. संताजी, धनाजी अथवा अमृतराव यांच्या वऱ्हाड, गोवळकोंडा इत्यादी दूरच्या प्रदेशांतील मोहिमांना जिंजीतून राजाराम महाराजांनी अथवा पन्हाळ्याहून रामचंद्रपंताने पैसा पुरविणे ही गोष्ट अशक्य होती. अशा परिस्थितीत चौथाईची पद्धती म्हणजे मराठे लष्करास वरदान ठरल्यास नवल नव्हते.

## जिंजीच्या अर्ध्या वाटेवरून परत

हिंमतखानाशी पाठीशी घेऊन संताजी धावपळीच्या लढाया करीत असता नोव्हें. -डिसेंबर १६९३ च्या सुमारास तो तसाच दक्षिणेत गेल्याचा एक पुरावा हाती येतो. १७ एप्रिल, १६९४ रोजी राजाराम महाराजांनी महाराष्ट्रातील चांदजीराव पाटणकर या मराठा सरदारास लिहिलेल्या एका पत्रात "यैशास राजश्री संताजी घोरपडे सेनापती पहिले पाल्यापावेता (पालमनेर? कोलारच्या पूर्वेस) इकडे यावयास आले होते ते माघारे गेले" असा एक उल्लेख आहे.[१४] संताजी जिंजीकडे जात असता अर्ध्या वाटेवरून का परत आला हे समजत नाही. कदाचित अद्यापि

१४. Records of Shivaji Period, p. 191

त्याचा रुसवा गेला नसावा. पुढे हा रुसवा काढून त्याची धनाजीशी दिलजमाई करण्यासाठी राजाराम महाराजांनी आपला खास दूत महाराष्ट्रात पाठविला, त्याचा वृत्तांत पुढे येईलच.

## जिंजीच्या वेढ्याचे जुल्फिकारखानाचे नाटक

संताजी असा मोगलांशी धामधुमीच्या लढाया करीत असता तिकडे जिंजीच्या परिसरात कशा घटना घडत होत्या, हे पाहणे प्रस्तुत होईल. जिंजीच्या वेढ्यात जुल्फिकारखानास साहाय्य होईल म्हणून बादशहाने वजीर असदखान व शहाजादा कामबक्ष यांना पाठविले होते; पण या बड्या मंडळींच्या अंतःस्थ कलहामुळे मोगली लष्कराचा जिंजीपुढे कार्यनाश घडून येऊन नामुष्की मात्र पदरात पडली. अशा परिस्थितीत बादशहाने असदखान व कामबक्ष या दोघांनाही जिंजीपुढून निघून येण्याचा हुकूम केला. त्याप्रमाणे ते दोघेही निघाले. बादशाही हुकूमाप्रमाणे असदखान उत्तर कर्नाटकातील सागर या ठिकाणी थांबला, तर कामबक्ष दरबारात येऊन बादशहास भेटला. असदखानासंबंधी बऱ्याच तक्रारी कामबक्षाने बादशहास सांगितल्या; पण बादशहाने त्या फारशा मनावर घेतल्या नाहीत. असदखानावर पूर्वीप्रमाणेच बादशाही कृपा राहिली.

दरम्यान जिंजीस पुन्हा वेढा घालावा व हल्ला करून ती काबीज करावी म्हणून बादशहाने जुल्फिकारखानास हुकूम केला. ऑक्टो. १६९३ मध्ये खानाने वांदिवॉशचा तळ सोडला व तो वेढा घालण्याच्या इराद्याने जिंजीपुढे येऊन दाखल झाला. २४ ऑक्टो. १६९३ रोजी मद्रासकर इंग्रज लिहितात की, जुल्फिकारखान जिंजीपुढे आला असून, बहिर्जी व याचप्पा नाईक यांच्या सोडून जाण्यामुळे राजारामाची अवस्था नाजूक बनली आहे. तसेच खानाने जर किल्ला घेण्याचे मनापासून प्रयत्न केले, तर तो किल्ला अल्पावकाशात तो घेऊ शकेल;[१५] पण असे दिसते की, हल्ला करून किल्ला जिंकण्याचे खानाने मनावर घेतले नव्हते. म्हणूनच फेब्रु. १६९४ पर्यंत तो जिंजीपुढे वेढ्याचे नाटक करीत राहिला आणि मग

---

१५. Letters From Fort St. George, 1693 - 94, Vol. V, p. 38

तंजावरच्या शहाजी महाराजांना शिक्षा करण्याच्या इराद्याने मोहिमेवर निघाला. जिंजीला तंजावरकडून जी मदत मिळत होती, ती बंद पाडल्याशिवाय जिंजीमधील शिबंदी जेर येणार नाही, असा त्याने पुकारा केला असावा. खानाच्या लष्करात यावेळी याचप्पा नाईक व त्रिचनापल्लीचा नायक हे येऊन मिळाले होते.

मद्रास किनारपट्टीवर अनेक ठाणी व किल्ले जिंकून घेऊन जुल्फिकारखानाने मार्च १६९४ मध्ये खुद्द तंजावरवर हल्ला चढविला. यावेळी जिंजीमधील राजाराम महाराजांनी बहिर्जी घोरपड्यास तंजावरच्या मदतीसाठी ससैन्य पाठविल्याचे आपण पाहिले आहे. पुढे मोगली लष्करापुढे निरुपाय होऊन तंजावर शरण गेले. काही किल्ले व लष्करी चाकरीची अट स्वीकारून शहाजी महाराजांनी वेळ निभावून नेली- (मे १६९४).[१६]

तंजावरची मोहीम आटोपल्यावर आता जुल्फिकारखान जिंजीस पुनरपि वेढा देणार हे निश्चित होते. तसा वेढा दिल्याशिवाय त्यास काही गत्यंतरही नव्हते. त्याप्रमाणे खान आपल्या लष्करासह प्रथम जिंजीच्या दक्षिणेस असणाऱ्या वेटावलमच्या जंगली प्रदेशात आला. या प्रदेशातूनच बाहेरची रसद किल्ल्यात पोहोचविली जात होती. आता खानाने स्थानिक पाळेगारांच्या मदतीने जंगलातील मार्गावर मोगली ठाणी स्थापन केली. मराठ्यांनी यापूर्वीच आपली ठाणी टाकून किल्ल्याचा आश्रय घेतला होता. आता खानाने पुढे सरकून किल्ल्यास वेढा देण्याचे कार्य सुरू केले- (१५ सप्टेंबर, १६९४).[१७]

## जिंजीत राजाराम महाराजांची बिकट अवस्था

यावेळी जिंजीत राजाराम महाराजांजवळ एकच पराक्रमी सेनानी होता. तो म्हणजे बहिर्जी घोरपडे. त्याच्या मर्दुमकीबद्दल महाराजांना मोठा विश्वास होता; पण जिंजीच्या आसमंतातील सर्व ठाणी मोगलांनी जिंकून घेऊन किल्ल्याची पूर्ण नाकेबंदी केली असता आपण

---

१६. History of Aurangzib, Vol. V, p. 81

१७. शिवचरित्र साहित्य, खं. ४, पृ. ८१-८२; शिवचरित्र प्रदीप, पृ. ३७

बहिर्जीच्या साहाय्याने किती काळ किल्ला लढवू शकू याबद्दल त्यांचे मन साशंक होते. अशा परिस्थितीत जिंजीचा वेढा उठवून लावण्यासाठी महाराष्ट्रातून संताजी-धनाजीच्या फौजा येणे आवश्यक होते. संताजी तर अजूनही रुसव्यातच होता; पण त्याने व धनाजीने तातडीने आपल्या फौजेसह कर्नाटकात यावे, म्हणून राजाराम महाराजांनी तातडीने आज्ञापत्रे पाठविली. इतर सरदारांनाही अशीच पत्रे गेली. अशा पत्रांपैकी मुधोजी नाईक निंबाळकराला आलेले एक पत्र उपलब्ध आहे, त्यावरून राजाराम महाराजांची जिंजीमध्ये परिस्थिती किती बिकट झाली होती, याची कल्पना येते. महाराज लिहितात :

"कर्नाटक प्रांते गनिमाने सख्ती बहुत धरून भोवताली स्थले घेतली. सांप्रत वेटवालही पालेगराच्या भेदे कडून गनिमाने हस्तगत केले. स्वामीचे लोक झाडीत होते ते गनीम येकायेकी पैसला देखोन निघोन आले. याउपरी आजी आगर उदिया इतकियात चंदीचे (जिंजीच्या) तटाजवली येऊनु कोटास बिलगोन येलगारच (हल्ला) करणार. अैशास येथे राजश्री हिंदुराऊ घोरपडे ममलकतमदार समशेर बहादूर हे आदी करून स्वामिसनिध आहेती. हे गनिमासन तिजा पावावयाचा तैसा पावितील गुमान धरीत नाही; परंतु गनिमास मारून चालवावे, फौज बुडवावी या गोष्टी सदेशीची (महाराष्ट्रातून) फौज आली पाहिजे. त्यास फौज घेऊनु येणे म्हणून राजश्री संताजी घोरपडे, सेनापती राजश्री धनाजी जाधवराऊ सरलष्कर यांस व तुम्हास पत्रे उदंड पाठविली; परंतु अद्याप फौज घेऊनु येता (असे) दिसेनासे जाले आहे. येथे तो निदान प्रसंग प्राप्त आहे. जरी एका महिनियात फौजे नसी येता तरी राज्य राहते. स्वामी समाधान पावताती तुम्हा लोकांस येश येते. तरी फौजेस यावया विलंब लागतो तरी महिनियाउपरी उबार नाही. राज्य बुडते. मग तुम्ही स्वामीचे सेवक आसोनु कोणा प्रयोजनाचे? स्वामी आपले राज्यसंरक्षण करायचे तैसे करितील; परंतु तुम्हा लोकांचे बरे होणार नाही."[१८]

१८. शिवचरित्र साहित्य, खं.४, पृ. ८१-८२

महाराष्ट्रातून संताजी-धनाजीच्या फौजा महिन्याभरात जिंजीकडे जाऊ शकल्या नाहीत. तसेच राजाराम महाराजांनी भीती व्यक्त केल्याप्रमाणे जिंजी किल्लाही मोगलांच्या ताब्यात गेला नाही. त्याचे कारण महाराज आणि जुल्फिकारखान यांच्यामध्ये ठरलेले गुप्त राजकारण हेच होते; पण या राजकारणाची शंभर टक्के खात्री महाराजांना वाटत नसावी. म्हणून प्रसंगी लष्करी तयारी असावी, यासाठी त्यांनी महाराष्ट्रातून तातडीने फौजा बोलाविल्या असाव्यात.

जिंजी घेण्याची सर्व प्रकारची तयारी झाली असताही जुल्फिकारखान हल्ला करीत नाही, हे पाहून याचप्पा नायकाने खानाच्या गुप्त राजकारणाची कल्पना देणारे एक पत्र खुद्द बादशहाकडे धाडले! त्यात याचप्पाने म्हटले होते की, आपण फक्त आपल्या सैन्यानिशी जिंजी आठ दिवसांत घेऊन दाखवू. दुर्दैवाने हे पत्र खानाच्या हाती पडले आणि याचप्पावर डाव उलटला. याचप्पाने राजाराम महाराजांशी संगनमत केल्याचा पुकारा करून खानाने त्याची त्याच्या बायका मुलांसह जिंजीच्या पायथ्याशी कत्तल केली. कर्नाटकातील पराक्रमी हिंदू सरदाराचा अशा दिशाहीन कार्यामुळे नाश झाला- (सप्टें. १६९४). यानंतर खानाने खरोखरच एक हल्ला चढविला. आपण किल्ला घेण्याचा प्रामाणिक प्रयत्न करीत आहोत, अशी हवा त्यास निर्माण करायची होती; पण हा हल्ला सुद्धा एक नाटकच होते. लवकरच त्याने वेढा उठवून वांदिवॉशकडे माघार घेतली.[१९]

## संताजीची महाराष्ट्रात धामधूम

कर्नाटकातून महाराष्ट्रात आल्यावर संताजी स्वस्थ बसला नव्हता, हे आपण पाहिले. त्याचे मोगली शत्रूशी झुंजणे जारीच होते. स. १६९४ च्या सुरुवातीस त्याने महाराष्ट्रातून गोवळकोंडाच्या प्रदेशात मोहीम काढली होती. त्याचा पाठलाग हिंमतखान करीत होता. त्याने संताजीस गोवळकोंडाच्या प्रदेशात बेहराम येथे गाठले - (जाने., फेब्रु. १६९४). उभयपक्षी लढाई घडून आली. त्यात खान विजयी झाल्याचे

१९. मोगल आणि मराठे (तारिखे दिल्कुशा), पृ. १२४-१२५; Storia Do Mogor Vol, III, p. 271, Diary & Consultation Book, 1694, p. 102

मोगली बातमीपत्र सांगते. यावेळी बहिर्जी पांढरे हा सरदार मराठ्यांकडून पुन्हा मोगलांकडे गेल्याचे दिसून येते. त्याने मोठी बहादुरी केल्याचे नमूद आहे.[२०]

गोवळकोंडा प्रदेशात धामधूम माजवून परत येत असता संताजीस बातमी लागली की, औरंगाबादेहून गलगला येथील बादशाही छावणीकडे छत्रसाल राठोड या मोगल सरदाराच्या देखरेखीखाली नऊ मोठ्या तोफा नेल्या जात आहेत. संताजीने तोफा घेऊन जाणाऱ्या लष्करी तुकडीवर मालकूर येथे हल्ला चढविला. नऊ तोफांची रसद लुटली जाणार एवढ्यात मतलबखान हा दुसरा मोगल सरदार छत्रसालाच्या साहाय्यास धावून आला. तेव्हा लढाई अर्धवट सोडून संताजीने सातारा प्रदेशातील महादेव डोंगराकडे प्रयाण केले[२१] - (फेब्रु. १६९४).

### विठ्ठल नीळकंठची शिष्टाई : संताजी-धनाजीची दिलजमाई

धनाजीही या सुमारास सातारा भागातच होता. त्याच्या आणि संताजीच्या दरम्यान निर्माण झालेला तणाव छत्रपतींसह सर्वांनाच अस्वस्थ करणारा होता. म्हणून संताजीसारखा अप्रतिम मोहरा दीर्घकाल रुसव्यात राखणे ही राज्याच्या हिताची गोष्ट नाही, हे जाणून राजाराम महाराजांनी आपला खास दूत विठ्ठल नीळकंठ यास महाराष्ट्रात पाठविले. संताजीची समजूत काढून त्याची धनाजीशी दिलजमाई घडवून आणण्याचा कार्यभाग विठ्ठल नीळकंठवर सोपविला होता. विठ्ठल नीळकंठ याने ही कामगिरी कशी पार पाडली याविषयी खुद्द राजाराम महाराजांनी चांदजीराव पाटणकर यास लिहिलेल्या, मागे उल्लेखिलेल्या १७ एप्रिल, १६९४ च्या पत्रात माहिती दिली आहे - "स्वामीने येथून राजश्री विठ्ठल नीळकंठ पाठविले होते. त्यांच्या यांच्या भेटी जाल्या. त्या उपरी राजश्री रामचंद्रपंत रा। परशरामपंतास सातारीयास पाठविले. त्यांनी येऊन उभयता सरदारांची येक्यता करून

---

२०. इतिहास आणि संस्कृती, अंक ४५, पृ. ६१; History of Aurangzib, Vol.V, p. 35
२१. इतिहास आणि संस्कृती, अंक ४५, पृ. ६६; History of Aurangzib, Vol.V, p. 35

दिल्ही आणि वैशाख[२२] माहाकारणे कर्नाटकात यावेयेसा निर्वाह केला आहे. हे वर्तमान उभयतांनी लिहिले." [२३] अशा प्रकारे सातान्याच्या मुक्कामी संताजी, धनाजी, विठ्ठल नीळकंठ व परशुराम त्र्यंबक यासर्वांची बैठक झाली. संताजीच्या मनातील सर्व समज-गैरसमजांचे निराकरण करून परशुराम त्र्यंबकाने उभय सेनानींची एकवाक्यता घडवून आणली. याचवेळी धनाजीकडे असलेले सेनापतिपद संताजीकडे पुन्हा सुपुर्द केले असावे. त्या उभयतांनी वैशाख महिन्यात कर्नाटकात फौजा घेऊन जाण्याचा निश्चय करून तशी पत्रेही जिंजीकडे रवाना केली.

उपर्युक्त पत्र एप्रिल, १६९४ मधील आहे. तत्पूर्वी एक-दीड महिना म्हणजे फेब्रु.-मार्च १६९४ मध्ये ही दिलजमाईची घटना घडून आलेली आहे. जिंजी येथे राजाराम महाराजांशी संताजीचा बिघाड होण्यास संताजी-धनाजी यांच्यामधील स्पर्धा (हेवेदावे?) कारणीभूत असावी, असा एकूण इत्यर्थ विठ्ठल नीळकंठच्या शिष्टाईच्या प्रकारातून दिसून येतो. याच सुमारास कर्नाटकात जिंजी येथे संताजीचा बंधू बहिर्जी याचेही राजाराम महाराजांनी समाधान करून त्यास जिंजीत हुजूर आणून सेवेत घेतले, ही गोष्ट ध्यानात घेण्यासारखी आहे.

## संताजी उत्तर कर्नाटकात मोहिमेवर

लवकरच संताजी आपली फौज घेऊन शत्रूच्या मुलखातील स्वारीवर निघालेला दिसतो. मोगली बातमीपत्रात मे, १६९४ च्या अखेरीची एक नोंद संताजी उत्तर कर्नाटकाच्या प्रदेशात दाखल झाल्याची माहिती देते : "हरकाऱ्यांच्या तोंडून कळाले की, संताजी हा सहा हजार स्वार व सात हजार पायदळ असे सैन्य घेऊन शव्वाल महिन्याच्या चवदा तारखेस (२९ मे, १६९४) नरगुंदकडे (बेळगावच्या पश्चिमेस ६० मैलांवर) रवाना झाला."[२४]

काही दिवस संताजी उत्तर कर्नाटकातच मोहिमेवर दिसतो.

---

२२. एप्रिल, १६९४

२३. Records of Shivaji Period, p. 191

२४. मोगल दरबारची बातमीपत्रे, पृ.६२

आपल्या फौजेच्या अनेक तुकड्या करून त्याने त्या प्रदेशात मोठी धामधूम माजविली. मोगली बातमीपत्रांत १८ जूनच्या सुमाराची यासंदर्भातील इंडीचा[२५] ठाणेदार यादगार बेग याची एक अर्जी सापडते. यादगार बेग त्यात लिहितो, "संता (संताजी) याचे एक हजार स्वार हे या प्रांतात संचार करीत आहेत. माझ्याजवळ फार थोडे सैन्य आहे. त्यांनी (संताजीच्या स्वारांनी) हल्ला केला, तर मी प्राणास मुकेन. बादशहांनी आज्ञा केली की, त्याच्या सेवेचा मजुरा झाला. यानंतर त्यांनी बक्षीउल्मुल्क बहरामंदखान याला आज्ञा केली की, यादगार बेगकडे अडीचशे स्वार नेमा आणि तीनशेचा मनसबदार तैनात करा. त्याने जाऊन यादगार बेगचे सहाय्य करून यावे. गनिम सापडला तर त्याचा मोड करावा."[२६]

पण बादशहाने यादगार बेगच्या साहाय्यास तैनात केलेले सैन्य इंडीकडे रवाना झाले नसावे. कारण लगेच दुसरे दिवशीचे बातमीपत्र सांगते की, संताजी हा भोपाळगडाहून महादेवाच्या डोंगराकडे रवाना झाला आहे.[२७] याचा अर्थ असा की, इंडीच्या ठाणेदाराची मदतीची अर्जी दरबारात पोहोचण्याच्या वेळी संताजीने इंडीचा परिसर सोडून भूपालगडाकडे कूच केले होते व तेथूनही तो महादेवाच्या डोंगराकडे परतला होता. यावरून संताजीच्या लष्कराच्या हालचाली किती विलक्षण वेगाने होत असत, याची थोडीफार कल्पना आपणास येते.

## संताजी, धनाजी व रामचंद्रपंत यांची संयुक्त मोहीम

या सुमारास रामचंद्रपंत, शंकराजी नारायण, संताजी, धनाजी या कर्त्या पुरुषांच्या ठिकाणी पूर्ण सहकार्याची भावना निर्माण झालेली होती. मोगली बातमीपत्रांत रामचंद्रपंत, संताजी व धनाजी या त्रिवर्गांनी संयुक्तपणे काढलेल्या एका महत्त्वपूर्ण मोहिमेची माहिती मिळते.

---

२५. इंडी विजापूरच्या उत्तरेस २५ मैलांवर
२६. मोगल दरबारची बातमीपत्रे, पृ. ६८
२७. कित्ता, पृ. ६८

२२ जुलै, १६९४ चे बातमीपत्र म्हणते, "तळबीडचा[२८] ठाणेदार अदानी याने लिहिले की : धनाजी जाधव व हणमंतराव (निंबाळकर) हे आठ हजार स्वार व दोन हजार पायदळ असे सैन्य घेऊन तळबीडजवळ आले असून, त्यांनी धामधूम चालविली आहे. संताजी दोन कोसांवर येऊन उतरला आहे. ते लोक राजारामाचा दिवाण रामचंद्र याच्या येण्याची वाट पाहत आहेत. बादशहाने आज्ञा केली की : हिंमतखानाने जाऊन गनिमांवर हल्ला चढवावा."[२९]

लवकरच रामचंद्रपंत संताजी-धनाजी यांना येऊन मिळाल्यावर त्यांनी महिमानगडाकडे कूच केले. महिमानगड (साताऱ्याच्या आग्नेयेस ३० मैल), वारुगड (साताऱ्याच्या पूर्वेस ३० मैल) इत्यादी किल्ले काबीज करण्याचा त्यांचा इरादा असावा. महिमानगडाच्या किल्लेदाराने यावेळी बादशहाकडे तातडीची विनंती धाडली की : "संताजी व धनाजी जाधव हे सैन्यासह वारुगडाजवळ आहेत. त्यांनी किल्ल्याला वेढा घालण्याच्या उद्देशाने तुकड्या रवाना केल्या असून, रस्ते अडवून धरले आहेत. कुमकेवाचून आमचा सर्वनाश होईल. लवकर कुमक धाडावी"-(१ऑगस्ट, १६९४). मराठ्यांच्या हल्ल्यापासून बादशाही किल्ले व ठाणी वाचविण्यासाठी कुमक पाठविण्याची व्यवस्था करण्यास बक्षीउल्मुल्क मुखलिसखान यास हुकूम देण्यात आला.[३०]

या सुमारास सातारा भागाच्या सीमावर्ती प्रदेशात अकलूज[३१] या ठिकाणी मोगलांचा हिंमतखान हा सरदार छावणी करून होता. मराठ्यांचा जोर वाढल्याचे पाहून त्याने बादशहाकडे जादा लष्करी तुकड्या पाठविण्यासंबंधी विनंती पाठविली. बादशहाने आतिशखान व इस्माईलखान मका या दोन सरदारांना हिंमतखानाच्या मदतीस जावे म्हणून हुकूम धाडला. तसेच हमीदुद्दीनखानाच्या फौजेतील बाराशे स्वार

---

२८. कऱ्हाडपासून वायव्येस ९ मैलांवर. वसंतगडाच्या पायथ्याशी. हंबीरराव मोहिते व ताराबाई यांची जन्मभूमी

२९. मोगल दरबारची बातमीपत्रे, पृ. ७० ३०. कित्ता, पृष्ठ ७४

३१. साताऱ्यापासून पूर्वेस ७० मैलांवर

हिंमतखानाच्या फौजेत तैनात करण्यात आले. हिंमतखानाच्या मागणीप्रमाणे पाच रेहकलेही (लहान तोफा) पाठविण्यात आले.[३२] बादशहाकडून हिंमतखानाकडे ही कुमक येण्यास काही दिवसांचा अवधी लागला असावा. कारण ऑगस्ट अखेर खान अकलूज येथेच छावणी करून राहिला होता. पुढे सरकण्यास तो धजला नाही. सप्टेंबराच्या सुरुवातीला त्याने वारुगडाकडे कूच केले आणि तो गडाच्या पायथ्याशी छावणी करून राहिला. ९ सप्टेंबर, १६९४ रोजी बादशहाने दरबारात आज्ञा केली : " हिंमतखान बहादूरच्या फौजेसाठी लागणाऱ्या दारूगोळ्यासाठी आठ हजार अश्रफ्या (सोन्याची नाणी) वारुगडाजवळील हिंमतखानाच्या छावणीत पोहोचवाव्यात. "[३३]

मोगल दरबारची बातमीपत्रे मराठ्यांच्या या वारुगडच्या परिसरातील मोहिमेवर अधिक प्रकाश टाकत नाहीत. बहुधा वारुगड, महिमानगड इत्यादी अनेक किल्ले मराठ्यांनी या मोहिमेत जिंकून घेतले असावेत. त्यादृष्टीने हिंमतखानाच्या छावणीत दारूगोळ्यासाठी बादशहाने आठ हजार अश्रफ्या पाठविल्याची बातमी सूचक वाटते. मराठ्यांनी ताब्यात घेतलेले किल्ले पुन्हा जिंकून घेण्यासाठी हा दारूगोळा पाठविला असावा, असा तर्क बांधण्यास जागा आहे.

## शंकराजी नारायणचा संताजीस उपदेश

या सुमारास संताजीची शंकराजी नारायण याच्याशी भेट घडून आली. त्या भेटीत शंकराजीने वडिलकीच्या नात्याने चार शब्द सुनावल्याचे जेधे शकावली सांगते. शकावलीमधील नोंदी फार त्रोटक असतात. तशा त्या जेधे शकावली मधीलही आहेत; पण संताजीच्या या भेटीसंबंधीची नोंद शकावली कर्त्याने बरीच विस्ताराने दिलेली आहे. यावरून या भेटीचे तत्कालीन राजकारणाच्या दृष्टीने किती महत्त्व होते, हे दिसून येते. ही नोंद पाहण्यापूर्वी आणखी एक मुद्दा ध्यानात घेतला पाहिजे, तो म्हणजे सन १६९० सालीच महाराष्ट्रातील स्वराज्याच्या

---

३२. मोगल दरबारची बातमीपत्रे, पृ. ७५

३३. इतिहास आणि संस्कृती, अंक ५०, पृ. ६५; मोगलदरबारची बातमीपत्रे, पृ. ८०

कारभारावर राजाराम महाराजांनी रामचंद्रपंत व शंकराजी नारायण यांची नेमणूक करून त्यांच्या हाताखाली अनुक्रमे संताजी व धनाजी या दोन सेनानींनी वागावे, अशी व्यवस्था लावली होती. म्हणजे संताजी हा रामचंद्रपंताच्या गोटातील माणूस होता. अशा परिस्थितीत उपदेशाचे चार शब्द पंताने न सुचविता ते शंकराजी नारायणने सुनवावेत ही गोष्ट संताजी-पंत संबंधासंबंधी अधिक विचार करावयास लावणारी आहे. यापूर्वीच म्हणजे स. १६९३ च्या सुरुवातीस संताजी जेव्हा जिंजीकडे होता तेव्हाच त्याच्या व पंतांच्या दरम्यान अनेक समज-गैरसमज निर्माण झालेले होते. त्यासंदर्भात संताजीने महाराष्ट्रात आल्यावर एक पत्र विस्ताराने लिहिले आहे ते मोठे प्रसिद्ध आहे. त्याची चर्चा पुढे येईलच. तूर्त या ठिकाणी एवढेच लक्षात ठेवले पाहिजे की, संताजी पंतापासून थोडा दुरावलेला होता आणि शकावलीमधील पुढील नोंद पाहिल्यानंतर असे वाटते की, तो शंकराजी नारायणच्या प्रभावाखाली आला होता. शकावलीमधील नोंद अशी :

"राजश्री शंकराजी पंत सचीव यांणी राजश्री संताजी घोरपडे यांसी बोली केली की, फौजेनसी जाऊन साहेबकाम करावे. राजश्री स्वामीजवळ (छत्रपतींजवळ) मुदे घालू नयेती. मर्यादेने राहोन (जिंजीचा) वेढा उठवावा. बेमानी करू नयै. यैसे बोली करून शफत घेतली. बा। (बरोबर) राजश्री येसाजी मलार मुतालिक दिल्हे. त्याबा। फौज हणमंतराव निंबाळकर सरलष्कर व सरदार मिलोन पंचवीस हजार स्वार दिल्हे. मानिल्हेच्या सदरेस बसोन उभयतांनी दिवाण कारभार करून इमाने वर्तावे येसी बोली करून कार्ती कमासी (ऑक्टो. १६९४) रवानगी केली. त्यांणी फौज भारी करून भांडियांच्या (तोफांच्या) आवाजाचे कूच करून मजल दर मजल कर्नाटकात गेले."[३४]

यावर्षीचे संताजीचे दसऱ्याचे सीमोल्लंघन अशा प्रकारे झाले. येसाजी मल्हार, हणमंतराव निंबाळकर अशी सरदार मंडळी पंचवीस हजार फौजेनिशी घेऊन संताजी मोठ्या दिमाखाने शत्रूच्या प्रदेशातील

३४. शिवचरित्र प्रदीप, पृ. ३७-३८

स्वारीवर साताऱ्याच्या प्रदेशातून निघाला. सोलापूर-गुलबर्गामार्गे तो हैदराबादेच्या रोखाने चालला. बादशहास जेव्हा संताजीच्या स्वारीची बातमी समजली तेव्हा त्याने साताऱ्याच्या प्रदेशातच छावणी करून राहिलेल्या हिंमतखानास संताजीच्या पाठलागावर जाण्याचा हुकूम केला. हैदराबादेचा सुभेदार रुस्तुमखान यास हिंमतखानास साहाय्य करावे म्हणून हुकूम पाठविण्यात आला. हिंमतखान बादशाही आज्ञा मिळताच त्वरेने पाठलागावर निघाला; पण मार्गात मोहिमेचे कष्ट न निभावल्याने त्याचे अनेक सहकारी त्यास सोडून गेले. अशा पळून गेलेल्या अधिकाऱ्यांना पुन्हा हिंमतखानाच्या फौजेत परत पाठविण्यासाठी बादशहाला खास अधिकाऱ्यांची नेमणूक करावी लागली. दरम्यान संताजीचा मागोवा घेत घेत हिंमतखान गोवळकोंडा प्रदेशात शिरला; पण संताजीने खानास हुलकावणी देऊन विजापूरकडे कूच केले. संताजीच्या फौजेशी टक्कर देऊ शकेल एवढे हिंमतखानाचे सैन्य प्रबल नाही, याची बादशहाला जाणीव होती. म्हणून त्याने बादशाही सेवेतील ज्येष्ठ सरदार गाजिउद्दीनखान बहादूर यास लिहिले की, त्याने आपला पुत्र चीनकुलीजखान (भावी निजामुल्मुल्क) यास हिंमतखानाच्या मदतीस पाठवावे[३५] - (३ डिसेंबर, १६९४).

पण चीनकुलीजखानाची फौज हिंमतखानास मिळण्यापूर्वीच खानाची संताजीशी पाणूर याठिकाणी लढाई घडून आली. संताजीचे अनेक सहकारी मारले गेल्याचे व त्याचा पराजय झाल्याचे इरकाऱ्यांनी (बातमीदारांनी) बादशहास कळविले - (७ डिसेंबर).[३६] लवकरच नळदुर्ग येथे खानाच्या सैन्याशी संताजीची आणखी एक लढाई झाली. मोगली बातमीपत्र म्हणते, " हिंमतखान बहादूर हा संताजीच्या पाठलागावर होता. संताजी हा नळदुर्गजवळ पोहोचला. तेथे दोघांचे युद्ध झाले. शत्रूची अनेक माणसे मृत अगर जखमी झाली. आपलीही बरीच माणसे मारली गेली. संताजी पराजित होऊन महादेवाच्या डोंगरात

३५. इतिहास आणि संस्कृती, अंक ५१, पृ. ५३, ५७, ५९, मोगल दरबारची बातमीपत्रे, पृ. ९४, ९७; History of Aurangzib, Vol. V, p. 37

३६. History of Aurangzib, Vol. V, p. 37

निघून गेला" - (१२ डिसें., १६९४).[३७] संताजीवर मिळविलेल्या विजयाबद्दल बादशहाने खानाचे अभिनंदन करून त्यास खिलतीची वस्त्रे व एक तलवार पाठवून दिली.[३८]

१२ डिसेंबरच्या मोगली बातमीपत्रांप्रमाणे संताजी हा महादेव डोंगराकडे गेलेला दिसत नाही. तो उत्तर कर्नाटकातच धामधूम करीत राहिला. रायचूरजवळ त्याची हिंमतखानाशी आणखी एक मोठी लढाई झाल्याचे ६ जाने., १६९५ चे बातमीपत्र सांगते : "हरकऱ्यांच्या तोंडून कळाले की, रायचूरजवळ हिंमतखान बहादूर व संताजीचे युद्ध झाले. बादशहाच्या कृपेने हिंमतखानाने संताजीच्या अनेक सहकाऱ्यांना ठार केले. अनेकजण जखमी झाले. हिंमतखानाला जय मिळाला. संताजीचे तीन सरदारपण मारले गेले. हिंमतखानाचे अनेक सैनिक मृत अथवा जखमी झाले. या विजयाबद्दल हिंमतखानाचा बाप खानजहान याने बादशहांना एक कट्यार नजर म्हणून दिली."[३९]

हिंमतखानाशी झालेल्या या सर्व लढाया संताजीच्या धावपळीच्या लढाया होत. त्या निर्णायक नव्हेत. उत्तम प्रकारे गाठ पडल्यास झुंज द्यायची, नाही तर सरळ सुरक्षित माघार घ्यायची; नको तिथे प्रतिष्ठा पणास लावायची नाही, हीच गनिमी युद्धनीती येथे दिसून येते.

## संताजीची खानदेशावर स्वारी :
## बुऱ्हाणपूरच्या मोगल सुभेदारास बांगड्यांचा आहेर

उत्तर कर्नाटकातून संताजीने आपल्या फौजेसह थेट औरंगाबादच्या दिशेने कूच केले. यावेळी संताजीजवळ वीस हजार घोडदळाची जंगी फौज होती. औरंगाबादच्या प्रदेशात त्याने धुमाकूळ माजवून ठिकठिकाणी लूट केली आणि शत्रूच्या फौजा येण्यापूर्वीच आणखी उत्तरेकडे खानदेशातील धरणगावाकडे[४०] कूच केले- (जाने. १६९५). लवकरच तो धरणगावाहून तापीच्या तीरावरील बुऱ्हाणपूर या

३७. मोगल दरबारची बातमीपत्रे, पृ. १०१
३८. कित्ता, पृ. १०१
३९. कित्ता, पृ. १०६
४०. औरंगाबादच्या उत्तरेस ८० मैलांवर

सुप्रसिद्ध शहरावर चालून गेला. उत्तरेकडून दक्षिणेकडे येणाऱ्या महामार्गावरील बुऱ्हाणपूर हे मोगलांचे महत्त्वाचे लष्करी ठिकाण होते. मराठे इतक्या अंतर्गत प्रदेशात घुसतील, असे तेथील अंमलदारांना वाटत नव्हते; पण कोसळलेल्या संकटास सामोरे जाण्यावाचून त्यांना अन्य पर्याय नव्हता. संताजीने बुऱ्हाणपूरच्या सुभेदाराकडून चौथाईची मागणी केली; पण अशी मागणी मान्य करणे म्हणजे मोगलांची मोठी नामुष्की होती. मोगली सुभेदाराने चौथाई देण्याऐवजी संताजीशी मुकाबला करण्याचे ठरवले. त्याप्रमाणे तो आपल्या सैन्यानिशी संताजीशी लढण्यासाठी शहराबाहेर आला; पण संताजीसमोर त्याचा टिकाव लागला नाही. त्याच्या फौजेचा संताजीने तत्काळ धुव्वा उडविला. शहराच्या रक्षणासाठी असलेल्या फौजेची अशी वाताहत झाल्यानंतर शहर संताजीच्या ताब्यात आले. संपूर्ण शहराची लूट करण्यात आली. मराठ्यांच्या हाती अमाप पैसा व जवाहर (Money and Jewels) पडले. बुऱ्हाणपूर लुटले गेल्याची बातमी कानावर पडताच बादशहाच्या तळपायाची आग मस्तकास गेली. बुऱ्हाणपूरचा पराभव हा सुभेदाराचा नादानपणा आहे, असे त्यास वाटले. तेव्हा अशा नादान सुभेदाराची जाहीर बेइज्जत करण्याच्या उद्देशाने बादशहाने त्याच्याकडे 'बांगड्यांचा आहेर' पाठविल्याचे सुरतकर इंग्रज लिहितात :

"He (the Emperor) hath sent him (the Governor of Burhanpur) some of those rings women wear on their arms for he had more men in the field than Santoo (Santaji)."

*[बादशहाने बुऱ्हाणपूरच्या गव्हर्नराकडे बायका हातात घालतात तशा कडी (बांगड्या) पाठवून दिल्या आहेत. कारण संताजीच्या सैन्यापेक्षा अधिक सैन्य त्याच्याजवळ होते. (असे असूनही त्याचा पराभव झाला होता.)]*

याच वेळी बादशहाने गाजिउद्दीनखान बहादूर या आपल्या सरदारास खानदेशात जाऊन संताजीस शिक्षा करण्याचा हुकूम

फर्माविला; पण गाजिउद्दीनखान देशात जाईपर्यंत मराठे पसार झाले होते.[४१]

## संताजीच्या स्वारीने सुरतेत घबराट

बुऱ्हाणपुराहून सुरतेवर हल्ला करून तिची लूट करण्याची संताजीची योजना होती. पूर्वी शिवाजी महाराजांनी ही नगरी दोन वेळा लुटून अगणित संपत्ती स्वराज्याच्या उभारणीसाठी महाराष्ट्रात आणली होती. त्याच स्वराज्याच्या रक्षणासाठी संताजी बुऱ्हाणपूर, सुरत यासारखी नगरे लुटीत होता. संताजीच्या या संभाव्य स्वारीच्या वार्ता सुरतेच्या वेशीवर धडकताच सुरतकरांमध्ये मोठी घबराट पैदा झाली. जो तो आपली धनसंपत्ती सुरक्षित जागी कशी राहील, यासाठी धडपडू लागला. युरोपियन वखारवाल्यांनी आपल्या वखारींच्या संरक्षणाची जय्यत तयारी सुरू केली. २० फेब्रु., १६९५ रोजी सुरतकर इंग्रज वखारवाले मुंबईकर इंग्रजांना लिहितात :

"(We) have been busy in making the best preparations we could for defence of the factory against Rama Rajah's troops; which have been daily expected by the town people, who are in great hurry, consternation and fright thereupon. They are burrying and securing what they can underground and packing up the rest to be gone on the news of approach (of the Marathas). The Governour hath wrote to Surjeet Cawne (Surjeetkhan) Subha of this province, for more soldiers and to the King (Aurangzeb) likewise..."

*(राजारामाच्या (मराठ्यांच्या) सैन्याच्या संभाव्य हल्ल्याला तोंड देता यावे म्हणून आमच्या वखारीच्या संरक्षणाच्या जय्यत तयारीत आम्ही गुंतलो आहोत. मराठे केव्हाही येतील, अशी सुरतकरांना भीती वाटत असल्याने त्यांची त्रेधातिरपीट उडाली आहे. शक्य तेवढी संपत्ती ते जमिनीत गाडून ठेवीत आहेत. मराठे आले की राहिलेले सामानसुमान घेऊन पळ काढायचा असे त्यांनी ठरविले आहे. ठाणेदाराने सुरतेच्या*

४१. श्री राजाराम महाराज, पृ. २३७-२३८

*संरक्षणासाठी सैन्याची कुमक पाठविण्यात प्रांताच्या सुभेदारास व बादशहास लिहिले आहे.)*

याचवेळी आपणाकडे वखारीच्या संरक्षणासाठी जादा तोफा व दारूगोळा पाठवावा, अशी सुरतकर इंग्रजांनी मुंबईकरांकडे विनंती धाडली होती. त्याप्रमाणे मुंबईकरांनी तोफा व दारूगोळ्याची कुमक पाठवूनही दिली- (२८ फेब्रुवारी); पण सुरतकरांच्या सुदैवाने संताजीने सुरतेवरील आपल्या स्वारीचा बेत बदलला. सुरतेऐवजी नंदुरबार या शहरावर तो घसरला.[४२]

## नंदुरबार शहरास वेढा

बुऱ्हाणपूर ते सुरत या मार्गावरील नंदुरबार हे महत्त्वाचे लष्करी ठाणे होते. संताजीने या शहरास वेढा देऊन तेथील फौजदाराकडे चौथाईची मागणी केली. त्याने संताजीची मागणी धुडकावून देऊन शहराच्या संरक्षणाची कडेकोट तयारी चालविली. नवी सैन्यभरती करून त्याने त्यांना शहराच्या संरक्षणाच्या कामगिरीवर नेमले. नंदुरबार संकटात असल्याचे पाहून अहमदाबादेचा सुभेदार सुरजितखान याने एक हजाराचे सैन्य मदतीस पाठविले. आसमंतातील इतर ठाणेदारांनीही कुमक पाठविली. अशा प्रकारे बाहेरून कुमक येताच नंदुरबारच्या फौजदाराने शहराबाहेर पडून मराठ्यांशी सलाबतपूर येथे लढाई दिली; पण फार वेळ रणांगणावर न थांबता तो नंदुरबारकडे लगेच परतला. मराठ्यांनी शहराच्या तटबंदीवर हल्ला चढविला; पण त्याचा फारसा उपयोग झाला नाही.

मराठे काही काल शहराजवळ छावणी करून राहिले. शहरास वेढा देऊन त्यास जेर करावे इतका वेळ त्यांच्याजवळ नव्हता. अन्नधान्य व पाणी यांची टंचाई त्यांना जाणवत होती. अशा परिस्थितीत नंदुरबारला वेढा देणे शहाणपणाचे नाही, हे उमजून ते आसमंतातील मुलूख लुटण्यासाठी पसार झाले. मराठ्यांच्या लष्करी तुकड्यांनी नंदुरबारच्या प्रदेशात मोठा धुमाकूळ माजविला आणि मोगली फौज येण्यापूर्वीच त्यांनी

४२. श्री राजाराम महाराज, पृ. २३८

संताजीच्या नेतृत्वाखाली साताऱ्याकडे परतीच्या प्रवासाचा रस्ता धरला- (मार्च १६९५).[४३]

संताजी अशा प्रकारे खानदेशात धुमाकूळ घालीत असता शंकराजी नारायण व हणमंतराव निंबाळकर या मराठा सेनानींच्या फौजा नाशिक-बागलाण भागात मोहीम करीत होत्या. मोगलांचा प्रसिद्ध सरदार मातबरखान हा त्यांचा प्रतिकार करीत होता.[४४]

## संताजीच्या खटाव परिसरातील लढाया

खानदेशाच्या स्वारीहून आल्यानंतर संताजीचा संचार सातारा भागातच होता. मे, १६९५ च्या मध्यास त्याने परळी येथे आपल्या दोन पुतण्यांची, बहिर्जीच्या मुलांची लग्ने साजरी केली.[४५] बहिर्जी यावेळी कर्नाटकात राजाराम महाराजांकडे होता. संताजी, बहिर्जी आणि मालोजी या घोरपडे बंधूंची कुटुंबे सातारा भागातच वास्तव्य करीत होती, असे दिसते.

जुलैमध्ये ऐन पावसाळ्यात संताजीच्या सैन्याने सातारा भागातील खटावच्या मोगली ठाण्यास वेढा दिला. खटाववर यावेळी रामचंद्र नावाचा ठाणेदार होता. त्याने धाडसाने हे ठाणे टिकवून धरले होते. हा मोगलांच्या चाकरीतील मराठा असावा. त्याने मोठ्या जिद्दीने ठाणे लढविण्याची तयारी केली. दरम्यान बादशहाने हमीदुद्दीनखानास या भागात मराठ्यांचा मोड करण्यास धाडले होते. त्याचप्रमाणे चीनकुलीजखान यासही हमीदुद्दीनखानाच्या मदतीस जाण्याविषयी हुकूम झाला होता.

३ सप्टेंबर, १६९५ चे मोगली दरबारचे बातमीपत्र सांगते की, हमीदुद्दीनखानाची दरबारात विनंती आली की : "गनिमांची फौज मोठी आहे आणि माझी लहान आहे. गनिमांनी सैन्य तयार ठेवले आहे. चीनकुलीजखान बहादूर अद्याप पोहोचले नाहीत. माझी इच्छा अशी आहे

४३. श्री राजाराम महाराज, पृ. २३९-२४०

४४. नवभारत, नोव्हें. १९६९, पृ. ५७

४५. History of Aurangzib, Vol. V, p. 38

की, बुणगे वगैरे जादा सामान खटावमध्ये सोडावे व सड्या सैन्यानिशी जाऊन गनिमांचे पारिपत्य करावे."

पण एकट्या हमीदुद्दीनखानाने संताजीसारख्या शत्रूवर चाल करून जाणे बादशहास धोक्याचे वाटले. तेव्हा बादशहाने दरबारातील बक्षीउल्मुल्क मुखलिसखान यास फर्माविले की : "खानाजादखाना-बरोबर देण्यासाठी साडेतीन हजार स्वार तयार असू द्या. खानाजादखानास मी सोमवारी हमीदुद्दीनखानाच्या कुमकेसाठी रवाना करीन. हमीदुद्दीनखानास कळवा की, खानाजादखान येऊन पोहोचेपर्यंत तुम्ही गनिमांवर चालून जाण्याचे थांबवावे."[४६]

खानाजादखान हा बादशाही फौजेत मीर अतिश (दारूगोळ्याचा अधिकारी) या जागेवर होता. त्यास बादशहाने ८ सप्टेंबर रोजी खटाव भागाकडे जाण्यासाठी निरोप दिला. निरोपाच्या वेळी बादशहा "फातेहा खैर" पढले, असे बातमीपत्र म्हणते. एवढेच नव्हे खानाजादखानाच्या फौजेतील सैनिकांना दोन महिन्यांचा पगार बादशहाने आगाऊ दिला.[४७] संताजीविरुद्ध पाठवावयाच्या फौजेची बादशहा किती काळजी घेत होता, हेच यावरून स्पष्ट दिसून येते.

पण चीनकुलीजखान अथवा खानाजादखान येण्यापूर्वीच हमीदुद्दीनखानाची संताजीशी लढाई घडून आली. साताऱ्याच्या आसमंतातील चंदनवंदन या किल्ल्याच्या पायथ्याशी असणाऱ्या वाड्या जाळण्यासाठी हमीदुद्दीनखानाने आपल्या हाताखालील अधिकारी फतेहुल्लाखान यास पाठविले होते. संताजी मोगली लष्कराच्या हालचालींची सर्व प्रकारची माहिती राखून होता. फतेहुल्लाखान किल्ल्याच्या पायथ्याशी पोहोचताच त्याच्यावर तो तुटून पडला. तेवढ्यात हमीदुद्दीन खानही तेथे पोहोचला. हातघाईची लढाई घडून आली. मराठ्यांच्या बाजूवर धनाजीचा एक पुत्र[४८] व एक अधिकारी असे

४६. मोगल दरबारची बातमीपत्रे, पृ. १२०-१२१

४७. कित्ता, पृ. १२१

४८. दुर्दैवाने याचे नाव नोंदलेले नाही.

रणांगणी ठार झाले. मोगली बातमीपत्र मराठ्यांनी माघार घेऊन किल्ल्यात आश्रय घेतल्याचे सांगते. यावेळी मोगलांनी पायथ्याच्या वाड्या जाळून गुरेढोरे पकडून नेली.[४९]

पण मराठ्यांची ही माघार तात्पुरत्या स्वरूपाची होती. लवकरच संताजीच्या मदतीस धनाजीही तिथे येऊन पोहोचला आणि मराठ्यांची मोगलांशी आणखी एक लढाई घडून आली. ही लढाईही चंदनवंदनच्या पायथ्याशी झाली असावी. खुद्द हमीदुद्दीनखानाच्या फौजेतून आलेले १३ सप्टेंबरचे बातमीपत्र या लढाईची हकिकत सांगते: "संताजी व धनाजी हे आपले सैन्य घेऊन डोंगराच्या अलीकडे दोन कोसांवर चालून आले होते. हे कळल्यावर हमीदुद्दीनखान याने फतेहुल्लाखान व नाहरखान यांना तिकडे पाठविले. फत्तेहुल्लाखान पोहोचला. युद्ध झाले. बादशहाच्या भाग्याने शत्रूपैकी अनेक लोक मारले गेले. शत्रूचा पराजय झाला. दोनशे घोड्या, तलवारी वगैरे लूट सापडली. यानंतर किल्ल्याच्या पायथ्याशी असणारी वाडी जाळून टाकण्यात आली. बादशहा म्हणाले, "सेवेचा मुजरा झाला. हमीदुद्दीनखानास बक्षीस म्हणून एक तलवार पाठवावी, अशी आज्ञा झाली."[५०]

## कर्नाटकातील मोगलांच्या हालचाली

महाराष्ट्र, उत्तर कर्नाटक, गोवळकोंडा येथील प्रदेशांत संताजीच्या अशा प्रकारच्या मोहिमा चालू असता दरम्यानच्या काळात कर्नाटकात मोगलांच्या हालचाली कशा होत होत्या, हे पाहणे संताजीच्या पुढच्या चरित्र-कहाणीच्या दृष्टीने महत्त्वाचे आहे.

आपण पाहिले की, तंजावरची मोहीम केल्यावर जुल्फिकारखान मोठ्या आवेशाने जिंजीच्या पायथ्याशी आला. हल्ला करून जिंजी घेण्याचे त्याने नाटकही केले; पण लवकरच त्याने वांदिवॉशला माघार घेतली (सप्टें. - ऑक्टो. १६९४). तेथे काही दिवस छावणी करून

---

४९. इतिहास आणि संस्कृती, अंक ५२, पृ. ४० -४४; History of Aurangzib, Vol. V, p. 38 - 39

५०. मोगल दरबारची बातमीपत्रे, पृ. १२२

राहिल्यानंतर ऑक्टोबरच्या शेवटी त्याने जिंजीच्या पश्चिमेस ४२ मैलांवर असलेला चांगमन हा किल्ला घेण्यासाठी ससैन्य कूच केले. किल्ल्याच्या उत्तर बाजूस त्याने छावणी दिली. मराठ्यांनी या छावणीस घेरून मोगलांना त्राही भगवान करून सोडले. मोगलांचे पिण्याच्या पाण्याच्या झऱ्यात आणि तळ्यात विष टाकून त्यांनी त्यांचा पाणीपुरवठा विषारी करून टाकला. त्यामुळे अनेक मोगल सैनिक मृत्युमुखी पडले. असे दिसते की, यामुळे किल्ला जिंकण्याचा विचार सोडून देऊन खानास दुसरीकडे कूच करावे लागले.[५१]

दरम्यान मद्रास, कर्नाटकात सर्वत्र अफवा पसरल्या होत्या की, जुल्फिकारखानाने राजाराम महाराजांशी संगनमत केल्याच्या संशयावरून मोगली फौजेत दुही माजली असून, दाऊदखान पन्नी, किशोरसिंग हाडा व राव दल्पत बुंदेला हे सरदार खानास कैद करण्याच्या इराद्यात आहेत, खुद्द बादशहाने दाऊदखानास तसे गुप्तपणे फर्माविले आहे;[५२] पण असे दिसते की, प्रत्यक्षात तसे काहीच घडून आले नाही. कदाचित खान या कारस्थानांबद्दल अधिक जागरूक राहिल्याने त्यास कैद करणे कोणास शक्य झाले नसेल.

स. १६९५ च्या मार्च महिन्यात जुल्फिकारखानाने जिंजीच्या आसमंतातील अनेक किल्ले जिंकून घेतले;[५३] पण जिंजी घेण्यासाठी तो पुढे आला नाही. या साली संताजी-धनाजीच्या फौजा येईपर्यंत कर्नाटकात फारशा घडामोडी झाल्या नाहीत. ऑक्टोबरमध्ये जुल्फिकारखानाने वेलोर किल्ल्यास वेढा दिला. वेलोर किल्ला म्हणजे मद्रास कर्नाटकातील जिंजीच्या खालोखाल महत्त्वाचा किल्ला होय. तो मराठ्यांच्या ताब्यात होता. खानाच्या वेढ्यामुळे किल्ल्याची शिबंदी हैराण झाली असतानाच धनाजी महाराष्ट्रातून मोठी फौज घेऊन कर्नाटकात आल्याची वार्ता वाऱ्यासारखी सर्वत्र पसरली. धनाजीचा समर्थपणे

५१. Diary & Consultation Book, 1694, pp. 127-128; Letters From Fort St. George, 1694, p.94

५२. कित्ता

५३. Public Despatches to England, 1694-96, p. 19

प्रतिकार करता यावा म्हणून खानाने आपली कुटुंबीय मंडळी व सामानसुमान यांना सुरक्षिततेसाठी राव दल्पत बुंदेला याच्याबरोबर अर्काटच्या किल्ल्यात पाठविले आणि वेढा उठवून स्वतः धनाजीशी लढण्याची तयारी करू लागला. अशा प्रकारे लढाई न देताच धनाजी वेलोरचा वेढा उठविण्यात यशस्वी झाला[५४] - (डिसेंबर, १६९५).

धनाजी आपल्या फौजेसह जिंजीकडे गेल्याचे खानास समजताच तो त्याच्या पाठलागावर निघाला. धनाजीने जिंजीच्या दक्षिणेला असणाऱ्या तिरुवाडी या मोगली ठाण्याच्या फौजदाराला घेरले होते. तेथे खान पोहोचून त्याने धनाजीशी लढाई दिली. भीमसेन सक्सेना म्हणतो की, खानाचा विजय झाला; पण खानास आपल्या सुरक्षिततेविषयी खात्री नसल्याने त्याने लगेच माघार घेऊन अर्काटच्या किल्ल्याचा आश्रय घेतला. धनाजीही आपल्या सहा हजार घोडदळानिशी राजाराम महाराजांच्या दर्शनासाठी जिंजीत येऊन पोहोचला.[५५]

आणि नेमके याच सुमारास संताजीने जिंजीकडे येत असता मोगलांच्या कासिमखान, खानाजादखान, सफशिकनखान इत्यादी नामांकित सेनानींचा प्रचंड पराभव केल्याची वार्ता एखाद्या बॉम्बस्फोटाप्रमाणे कर्नाटकांतील मोगलांवर कोसळली. या वार्तेने मद्रास, कर्नाटकांतील मोगल ठाणेदार व किल्लेदार भयभीत होऊन गेले. प्रत्येकजण आपापली कुटुंबे सुरक्षित स्थळी हलविण्याच्या उद्योगास लागला. सर्वत्र मोठी घबराट पसरली.[५६] कर्नाटकातील मोगली फौजेचे नीतिधैर्य पुन्हा एकदा खचून गेले. संताजीचा हा असामान्य पराक्रम आपण पुढील प्रकरणात पाहणार आहोत.

***

---

५४. शिवचरित्र प्रदीप, पृ. ३८

५५. मोगल आणि मराठे, (तारिखे दिल्कुशा), पृ. १२७; Diary & Consultation Book, 1695, P. 161

[illegible]ultation Book, 1695, p. 156



# ८.
# संताजीचे दोन महान विजय

## संताजीचे दसऱ्याचे सीमोल्लंघन

सन १६९५ सालच्या दसऱ्याच्या मुहूर्तावर महाराष्ट्रातील प्रमुख मराठी मुत्सद्दी व सेनानी रामचंद्रपंताच्या नेतृत्वाखाली मोगलांविरुद्धच्या चढाईच्या धोरणाचा विचार करण्यासाठी एकत्र जमले.[१] शत्रूशी बचावात्मक लढाई करण्याचे दिवस आता संपले होते. मराठ्यांना मोगल जिंकू शकत नाहीत, उलट मराठेच त्यांना अडचणीत आणू शकतात, ही भावना मराठ्यांमध्ये वाढीस लागली होती. या भावनेच्या बळावरच संताजी, धनाजी इत्यादी मराठा सरदारांनी मोठमोठ्या मोहिमांची योजना आखून त्या सालचे दसऱ्याचे सीमोल्लंघन साजरे केले.

जिंजी-मद्रासपर्यंत पसरलेला कर्नाटकाचा विस्तीर्ण प्रदेश संताजी-धनाजीच्या कार्याचे खास क्षेत्र होता. या सालच्या मोहिमा दोघांनीही याच क्षेत्रात आखल्या होत्या. मोहिमेत ठिकठिकाणी मोगली सैन्याचा समाचार घेत, ठिकठिकाणच्या चौथाईच्या खंडण्या वसूल करीत मराठ्यांचे हे उभय सेनानी जिंजीत राजाराम महाराजांच्या दर्शनास जाणार होते. त्यानुसार संताजीने प्रथम उत्तर कर्नाटकात शिरून रामदुर्ग किल्ल्यास[२] वेढा दिला. बादशहा धनाजीच्या हालचालीवर लक्ष ठेवूनच होता. त्याने तातडीने विजापूरचा सुभेदार नसुल्लाखान (सय्यद लष्करखानाचा पुत्र) यास रामदुर्गच्या किल्लेदाराच्या मदतीस जाण्याचा हुकूम केला. दुसरा मोगल सरदार हिंमतखान बहादूर (विजापुरी कर्नाटकाचा फौजदार) यानेही संताजीच्या पाठलागावर जावे, असे फर्माविले गेले.[३]

---

१. स्थिरबुद्धि राजाराम, पृ. ७६

२. बेळगावच्या पूर्वेस ५२ मैलांवर

३. इतिहास आणि संस्कृती, जाने. १९७७, अंक ५२, पृ. ४७

## संताजी गदग-कोप्पलच्या भागात

पण नसुल्लाखान, बहादूर हे सरदार रामदुर्गला पोहोचण्यापूर्वीच संताजीने वेढा उठवून आणखी दक्षिणेकडे गदगच्या दिशेने कूच केले. आपल्या फौजेसह तो ९ नोव्हेंबर रोजी गदगच्या[४] परिसरात पोहोचला. सुदैवाने या मोहिमेतील या वेळचे संताजीचे एक पत्र उपलब्ध आहे - (११ नोव्हें., १६९५). कोप्पल सुभ्यातील[५] देशमुख-देशपांडे इत्यादी वतनदारांना उद्देशून ते लिहिलेले आहे. तो एक प्रकारे विजयी मोहिमेवर निघालेल्या सेनापतीचा जाहीरनामाच आहे :

"राजश्री हणमाजी बनारस देशमुख व देशकुलकर्णी ता। हवेली किल्ले कोपल गो। अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्ये स्नो। संताजी घोरपडे सेनापती जत्फतन मुळूक दंडवत... आम्ही गदग प्रांते कटे फौजेनसी आलो आहो; परंतु तुम्ही हशम दारुगोली पाठविली नाही व आपली हकिकत लिहिली नाही. यावरून काय म्हणावे? हाली राजश्री माहादजी शंकर सरसुभेदार प्रांत कोपल यास दर्शनास बोलाविले आहेत. तरी त्याबराबरी आपला जमाव हशम दारुगोली बाण यैसे सिताबीने पाठऊन देणे. तुम्ही याचे आज्ञेत वर्तत जाणे. जाणिजे. हे विनंती.[६]

## संताजीस नेस्तनाबूद करण्याचा हुकूम

गदग-कोप्पलच्या प्रदेशातही संताजी फार काळ थांबला नाही. त्याने आणखी दक्षिणेकडे कूच करून तुंगभद्रा नदी पार केली आणि तो चित्रदुर्गच्या प्रदेशात आला. चित्रदुर्गचा नायक बरमाप्पा हा मोगली फौजांशी आपल्या प्रदेशात लढत होता. साहजिकच तो मराठ्यांचा साहाय्यक आणि मित्र बनला होता. संताजी चित्रदुर्गच्या प्रदेशात आल्यावर तो त्यास सामील झाला. बरमाप्पा नायकासारख्या स्थानिक नेत्यांचे प्रेम व सहकार्य संताजीने संपादन केल्यामुळेच त्या त्या

---

४. गदग - धारवाडच्या पूर्वेस ५२ मैलांवर

५. लक्ष्मेश्वर, नवलगुंद, कोप्पल, हल्ल्याळ, बेतगिरे, बेळगाव, संपगाव व गदग हे उत्तर कर्नाटकातील मराठ्यांचे सुभे होते.

६. शिवचरित्र साहित्य, खं. ६, पृ. २७-२८

प्रदेशातील शत्रूच्या लष्करी हालचालींची खडान्‌खडा माहिती त्यास मिळू शकत होती. अशा स्थानिक लोकांच्या सहकार्यामुळेच तो निर्धास्तपणे उत्तर कर्नाटकी प्रदेशात वावरू शकत होता.

औरंगजेब बादशहा यावेळी भीमा नदीच्या काठी ब्रह्मपुरी[७] येथे छावणी करून होता. संताजीच्या हालचालींच्या बातम्या एकसारख्या दरबारात येऊन थडकत होत्या. संताजी आपल्या मोठ्या फौजेसह जिंजीच्या रोखाने निघाला असून, त्यास अडवून खच्ची केले नाही, तर जिंजीपुढील युद्धक्षेत्राचे सर्व संतुलनच बिघडून जाईल व मोगली लष्करास फार मोठा धोका उत्पन्न होईल, हे बादशहाने अचूकपणे जाणले होते. म्हणूनच त्याने उत्तर कर्नाटकातील सिऱ्याचा फौजदार कासिमखान यास संताजीशी लढून त्यास नेस्तनाबूद करण्याचा तातडीचा हुकूम सोडला : "तुम्ही आपले सैन्य घेऊन त्या दुष्टाची (संताजीची) वाट अडवावी. खानाजादखान (उर्फ रुहुल्लाखान), सफशिकनखान, सय्यद असालतखान, महंमद मुरादखान यांच्याबरोबर बादशाही छावणीतील व बादशहांच्या निकट असलेल्या खास चौकीतील निवडक मन्सबदार, हफ्त चौकीतून निवडलेले मुबलक सैन्य आणि तोफखानाही देण्यात आले आहेत. त्यांच्याशी एक होऊन तुम्ही संताजीचा धुव्वा उडवावा."[८]

एकट्या कासिमखानाच्या हातून संताजीस नष्ट करण्याची कामगिरी पार पडणार नाही, हे जाणून बादशहाने आपल्या छावणीतील नामांकित सरदार व मन्सबदार निवडक सैन्यानिशी व भारी तोफखान्यासह पाठवून दिले होते. खाफीखान हा मिर्जा हसन या आणखी एका सरदाराचे नाव देतो. तसेच शहाजादा कामबक्षाची फौज या सरदारांबरोबर दिल्याचे सांगतो.[९] कासिमखानाचे मुख्य ठाणे सिरा

७. ब्रह्मपुरी हे ठिकाण सोलापूरच्या दक्षिणेस २४ मैलांवर आहे. २१ मे, १६९५ पासून बादशहा तेथे छावणी करून होता. त्याने या ठिकाणाचे नाव ब्रह्मपुरीऐवजी इस्लामपुरी असे ठेवले.

८. मराठे व औरंगजेब (मासिरे आलमगिरी), पृ. ६१

९. मराठ्यांचे स्वातंत्र्ययुद्ध (तारिखे खाफीखान), पृ. ६१

(चित्रदुर्गाच्या आग्नेयेस ५० मैल) या ठिकाणी होते; पण यावेळी तो चित्रदुर्गापासून ईशान्येस १२५ मैलांवर असणाऱ्या अधोनी[१०] किल्ल्याजवळ छावणी करून होता. त्याच्याजवळ तोफखान्यासह भारी फौज होती.

## दोन्ही मोगल फौजांची भेट

खानाजादखान हा आपल्या सहकाऱ्यांसह बादशाही छावणीतून निवडक फौजेसह चित्रदुर्गच्या रोखाने निघाला. बादशाही हुकूम मिळताच कासिमखानही अधोनीहून दक्षिणेकडे संताजीच्या मागावर निघाला. बादशाही छावणीकडून येणारे सरदार दरबारातील प्रतिष्ठित व्यक्ती होत्या. विशेषतः खानाजादखान हा तर खास बादशहाचा नातलगच होता. तो बादशहाच्या मावशीचा नातू होता. बादशहाची त्याच्यावर खास मर्जी होती. अशा बड्या उमरावांची मर्जी संभाळली पाहिजे, असे वाटून कासिमखानाने निघताना अधोनीच्या किल्ल्यातून कोरे करकरीत कर्नाटकी तंबू, सोन्याचांदीची पात्रे व चिनी मातीची सुशोभित भांडी इत्यादी सामान आपल्याबरोबर घेतले. लवकरच मोगलांच्या या दोन्ही फौजा चित्रदुर्गच्या उत्तरेस काही अंतरावर एकत्र आल्या. संताजीही त्याच परिसरात वावरत होता. त्याच्या दक्षिणेकडे जाण्याच्या संभाव्य मार्गापासून मोगलांच्या या संयुक्त फौजा अवघ्या सहा कोसांवर छावणी करून थांबल्या होत्या. दुसरे दिवशी या फौजेचा संताजीवरील मोहिमेस प्रारंभ होणार होता. त्यासाठी मोहिमेतील कूचेचा पहिला मुक्काम छावणीपासून पुढे तीन कोसांवर करण्याचे व तेथे शाही फौजेतील सरदार व मन्सबदार यांना बडी मेजवानी देण्याचे कासिमखानाने योजिले होते. कदाचित पुढे लढाईच्या घाईगर्दीत या पाहुण्यांचा पाहुणचार करावयाचा तसाच राहून जाईल व आपल्या मनात ती कायमची रुखरुख राहील, असे खानास वाटले असावे. त्याप्रमाणे अदल्या दिवशीच अधोनीहून आणलेले उत्तमोत्तम सामान पेशखान्याबरोबर[११] दुसऱ्या दिवशीच्या मुक्कामाच्या ठिकाणी पाठवून

१०. रायचूर व गुंतकल यांच्या दरम्यान. सध्या आंध्र प्रदेशात

११. पेशखाना : पुढील मुक्कामासाठी पाठविण्याचा लवाजमा

दिले होते.[१२]

## संताजीची व्यूहरचना

संताजी मोगली फौजेच्या हालचालींची व तिच्या सेनानींच्या योजनांची बित्तंबातमी राखून होता. दुसऱ्या दिवशीच्या मुक्कामावर कासिमखानाने उत्तमोत्तम सामानासह पेशखाना रवाना केल्याची खबर त्यास त्याच्या गुप्तहेरांकडून मिळाली होती. संताजीच्या दृष्टीने ही मोठी संधी चालून आली होती. त्याची विचारचक्रे फिरू लागली. त्याने आपल्या गनिमी रणनीतीचा अभेद्य चक्रव्यूह रचला. आपल्या फौजेच्या त्याने तीन तुकड्या केल्या. पहिल्या तुकडीने पुढे रवाना झालेल्या पेशखान्यावर भल्या पहाटे हल्ला करायचा. असा हल्ला झाला की, पेशखाना वाचविण्यासाठी कासिमखान, खानाजादखान इत्यादी सरदार छावणी सोडून धावत येणार; तेव्हा त्यांना मार्गातच छावणीपासून दूर अंतरावर दुसऱ्या तुकडीने गाठायचे व लढाई सुरू करायची; लढाई सुरू होताच छावणीतील बहुसंख्य सैनिक लढाईच्या ठिकाणी छावणीपासून दूर जाणार; अशा वेळी लढाई ऐन रंगात आली असता मागे छावणीवर तिसऱ्या तुकडीने अचानक हल्ला करायचा व ती पूर्ण लुटून घ्यायची, अशी एकूण संताजीने लढाईची आखणी केली व त्याप्रमाणे आपल्या सहकाऱ्यांना सूचना देऊन त्याने सर्व फौज तयार केली.

## मोगली पेशखान्यावर हल्ला व आग

भल्या पहाटे चार घटका झाल्यावर मराठ्यांच्या पहिल्या तुकडीने मोगलांच्या पेशखान्यावर हल्ला चढविला. त्यांनी अनेक मोगल सैनिकांना ठार केले. अनेकांना जखमी केले. पेशखाना सर्व लुटून फस्त केला. तंबू व इतर सामानसुमान यांना आगी लावल्या. मराठ्यांच्या हल्ल्याची बातमी जखमी होऊन निसटलेल्या सैनिकांनी कासिमखानाच्या छावणीत पोहोचवली असणार हे उघड आहे. तशी ती बातमी मोगली छावणीत पोहोचणे ही गोष्ट संताजीच्या योजनेबरहुकूम होती. त्याप्रमाणे मराठ्यांच्या हल्ल्याची बातमी समजताच कासिमखानाने

१२. मराठे व औरंगजेब (मासिरे आलमगिरी), पृ. ६१

आपल्या शाही पाहुण्यांची झोपमोड न करताच थोड्या सैन्यानिशी स्वतःच छावणी सोडली व पेशखान्याच्या रोखाने तो निघाला. खान छावणीपासून कोसभर अंतर गेला असेल नसेल तोच मार्गात दबा धरून बसलेल्या मराठ्यांच्या दुसऱ्या तुकडीने त्याच्यावर अचानक हल्ला चढविला. अशा प्रकारे मराठ्यांशी लढण्यासाठी खानास पेशखान्यापर्यंत जावे लागलेच नाही. मध्येच मराठ्यांनी त्याला गाठले व लढाई करण्यास भाग पाडले.[१३]

## कासिमखान व खानजादाखान यांच्याशी लढाई

एव्हाना मोगली छावणीत गडबड उडाली होती. त्या गडबडीने खानाजादखान व त्याचे सहकारी यांना झोपेतून जाग आली. मराठ्यांनी पेशखाना लुटून नेल्याची व त्यांचा प्रतिकार करावयास गेलेल्या कासिमखानाची व त्यांची लढाई सुरू झाल्याची खबर त्यांना दिली गेली. ही खबर समजताच ते कसेबसे स्वार होऊन आपल्या सैन्यासह छावणी व बाजारबुणगे तेथेच सोडून कासिमखानाच्या मदतीस धावले. हे सरदार कासिमखानास येऊन मिळताच लढाईस मोठा जोर चढला. साकी मुस्तैदखान लिहितो, "मराठ्यांपाशी असंख्य घोडेस्वार होते. त्यांच्या पायदळ सैन्यात बंदुकधाऱ्यांचा सपाटून भरणा होता. यामुळे उभय दळांत घनघोर युद्ध झाले. उभय दळांतील अनेक माणसे ठार झाली. मोगल सरदार व सैनिक यांनी ठाण मांडून निर्धाराने युद्ध केले. शत्रूचे अनेक सैनिक ठार अगर जखमी झाले; पण मराठे एक पाऊलही मागे हटले नाहीत. त्यांचा निश्चय थोडासुद्धा डळमळला नाही."[१४]

खाफीखान या लढाईचे वर्णन विस्ताराने करतो. तो लिहितो - "चहुकडे शस्त्रांची खणाखणी सुरू झाली. त्या दिवशी सकाळपासून संध्याकाळपर्यंत काफर (मराठे) आणि मुसलमान यांच्या फौजा लढत होत्या. बादशाही सैन्यातील शिपायांनी शौर्याची शर्थ केली; पण सैन्याचे सगळे बुणगे व सामानसुमान पूर्णपणे नष्ट झाले. त्या दिवशी रुहुल्लाखान

---

१३. मराठे व औरंगजेब (मासिरे आलमगिरी), पृ.६२; मराठ्यांचे स्वातंत्र्ययुद्ध (तारिखे खाफीखान) पृ.३१

१४. मराठे व औरंगजेब (मासिरे आलमगिरी), पृ. ६२

(खानजादखान) आणि महंमद मुरादखान यांनीही डोळ्यांत भरण्यासारखी कामगिरी गाजविली; पण सैन्यातील माणसांना व जनावरांना खाण्यास काही राहिले नाही. सैन्याचे सरदार रात्रभर हत्तीवर बसून होते. सैनिक घोड्यांचे लगाम हातात धरून उभे होते. रात्रीच्या छाप्याची काळजी करीत आणि उरलेल्या सामानाचे रक्षण करीत त्यांनी रात्रीचा दिवस केला."

"पण सूर्योदय होताच मराठ्यांनी पुन्हा हल्ला केला. मोठे निकराचे युद्ध झाले. त्या युद्धात मिर्जा हसन व त्याच्याबरोबर असलेले अनेक लहान-मोठे लोक प्राणास मुकले. मिर्जा हसन व इतर नामांकित सरदार यांची प्रेते शोधून काढण्याचा मोगलांनी प्रयत्न केला; पण मराठ्यांच्या भीतीमुळे ते शक्य झाले नाही. महंमद मुरादखान याचा मुलगा खुदादाद हा जखमा खाऊन पायउतारा झाला. तीन-चार दिवस तो बेपत्ता होता."[१५]

## मोगलांची दोड्डेरीकडे लांच्छनास्पद माघार

लढाई चालू असतानाच मराठ्यांच्या तिसऱ्या राखीव तुकडीने मोगलांच्या असुरक्षित छावणीवर हल्ला चढवून ती पूर्णपणे लुटून घेतली. लढाईच्या ऐन धुमश्चक्रीत आपली छावणी गारद झाल्याची धक्कादायक बातमी मोगल सरदारांना समजताच त्यांचा लढण्याचा धीरच खचून गेला. मराठ्यांनी आपल्याला मोठ्या पेचात पकडल्याचे व यातून आपली आता सहजासहजी सुटका नसल्याचे त्यांना जाणवले. आता पुढे काय करावे, याविषयी ते आपसात सल्लामसलत करू लागले. शेवटी जवळच्या दोड्डेरीच्या गढीवजा किल्ल्यात आश्रयास जावयाचे असे त्यांनी ठरविले. गढीच्या शेजारीच पाण्याचा तलाव होता. गढीत असणारा धान्यचाऱ्याचा साठा व मुबलक पाणी यामुळे आपल्या फौजेचा बचाव होईल, असे त्यांना वाटले असावे. त्याप्रमाणे त्यांनी दोड्डेरीच्या रोखाने हळूहळू माघार घ्यावयास सुरुवात केली. मराठ्यांशी लढत झगडतच ते

१५. मराठ्यांचे स्वातंत्र्ययुद्ध (तारिखे खाफीखान) पृ. ३२,
खाफीखान ही लढाई तीन दिवस चालल्याचे सांगतो; पण ते संभवनीय वाटत नाही. लढाई दीड दिवसांत संपली असावी.

दोड्डेरी गढीच्या पायथ्याशी येऊन पोहोचले.[१६]

## दोड्डेरीच्या पायथ्याशी मोगली फौजेचे हाल

मराठ्यांनी मोगली फौजेचा पिच्छा सोडला नव्हता. मोगल दोड्डेरीच्या पायथ्याशी पोहोचले खरे; पण त्यांना पाहाताच मोगल किल्लेदाराने गढीचे दरवाजे बंद करून घेतले! कारण बाहेरील एवढ्या मोठ्या फौजेला लागणारे अन्नधान्य व गवतचारा यांचा साठा गढीत नव्हता. म्हणून स्वतः मोगलांच्या सेवेत असूनही किल्लेदाराने मोगल सैनिकांस आत घेण्यास नकार दिला आणि ते अगदी योग्यही होते. तेव्हा निरुपाय होऊन मोगली फौज गढीच्या तटाजवळच थांबली. तिथेच त्यांनी मोर्चे बांधले आणि मराठ्यांशी लढणे चालू ठेवले. साकी मुस्तैदखान म्हणतो, "कासिमखान, खानाजादखान आणि ज्यांच्याबरोबर खाण्याचे काही सामान होते असे इतर सरदार यांनी आपापसात अन्न वाटून घेतले; पण सामान्य सैनिकांना खाण्यास अन्न नव्हते. तलावाचे पाणी काय ते त्यांना पिण्यास मिळे. मग हत्ती, घोडे इत्यादी जनावरांना दाणाचारा मिळण्याचे नाव कशाला?.... इतक्यात रात्र झाली. त्या काळतोंड्या गनिमांनी (मराठ्यांनी) मोगल सैन्याला चहूकडून कोंडले. मोगल सैन्य प्राण पणाला लावण्याच्या निर्धाराने तयार होऊन उभे राहिले. मराठे समोर येत; पण ते लढत नव्हते. त्यांनी मोगलांचा कोंडमारा केला होता. असे तीन दिवसपर्यंत चालले."[१७]

---

१६. मराठे व औरंगजेब (मासिरे आलमगिरी), पृ. ६२
संताजीने ज्या दोड्डेरी गढीच्या आसमंतात हा महान पराक्रम केला त्या गढीचा प्रस्तुत लेखकाने शोध घेतला आहे. चित्रदुर्गच्या पूर्वेस २० मैलांवर ही गढी असून, आज तिच्या अवशेषांचे फक्त ठिकाण अस्तित्वात आहे. गढीची तटबंदी संपूर्ण जमीनदोस्त झाली असून, त्या जागी आता फक्त मातीचे उंचवटे व त्याच्या शेजारी खंदकाचा खोलगट भाग शिल्लक आहे. या इतिहासप्रसिद्ध गढीकडे कर्नाटक सरकारचे पूर्ण दुर्लक्ष असून, आज त्या ठिकाणावर लोक शेतीभाती करीत आहेत. विशेष म्हणजे गढी शेजारच्या ज्या तलावाचा उल्लेख मोगल इतिहासकार करतात तो तलाव मात्र मोठा विस्तीर्ण असून, आजही तो उपयोगी आहे. ही गढी उद्ध्वस्त झाल्यानंतर तिच्या पूर्वेस कोसभर अंतरावर दोड्डेरी हे नवे गाव वसविले गेले. आज हेच गाव सर्वांना परिचित असून, पुरातन दोड्डेरी गढी मात्र विस्मृतीच्या पडद्याच्या आड गेली आहे.

१७. मराठे व औरंगजेब (मासिरे आलमगिरी), पृ. ६३

खाफीखानाने मोगलांच्या हालअपेष्टांचे वर्णन करताना म्हटले आहे : "तीन दिवसांत इस्लामच्या लष्कराला वास घेण्यालाही अन्न लाभले नव्हते. त्या दिवशी काही लोकांकरिता धान्य किंवा गवत यांची सरबराई झाली; पण इतर सामान्य माणसांना ये-जा करणे शक्य झाले नाही, अशा प्रकारे तीन-चार दिवस चालले. मोगल सैन्याने गढीच्या आश्रयाने तटाच्या समोर मोर्चे बांधले. रात्रीपासून पहाटेपर्यंत आणि पहाटेपासून रात्रीपर्यंत मोगल सैन्य मराठ्यांच्या हल्ल्यांचा प्रतिकार करीत होते. गुरेढोरे, उंट, घोडे सगळी मराठ्यांच्या हाती सापडली... समोर चालू असलेल्या युद्धामुळे गढीच्या लोकांनी गढीचे दरवाजे बंद केले होते. आतील व्यापारी आणि इतर माणसे शक्य तितके धान्य आणून गढीच्या भिंतीवरून विकीत. रुपया दोन रुपयास एक शेर या भावाने ते धान्य देत."[१८]

एवढ्यात मराठी लष्करात बातमी पसरली की, बादशहाने हिंमतखान बहादुरास मोगल सरदारांच्या साहाय्यासाठी पाठविले असून, तो चालून येत आहे. खाफीखान सांगतो की, ही बातमी मिळताच संताजीने लगेच आपल्या सैन्याचे दोन भाग केले आणि अनुभवी सरदारांना दोड्डेरीच्या पायथ्याशी असलेल्या मोगली सैन्याच्या तोंडावर ठेवून तो स्वतः हिंमतखानाच्या समाचारास गेला; पण मार्गातच त्यास समजले की, राजाराम महाराजांनी हिंमतखानाच्या बंदोबस्तासाठी फौज पाठविली आहे. तेव्हा निश्चिंत होऊन संताजी पुन्हा दोड्डेरीच्या पायथ्याशी आला.[१९]

## थूः तुमच्या मर्दुमकीवर!

हा सर्व संघर्ष चित्रदुर्गच्या प्रदेशात चालू होता. चित्रदुर्गच्या बरमाप्पा नायकास कासिमखानाने जेरीस आणले होते. आता कासिमखानावर सूड उगविण्याची आयती संधी नायकाकडे चालून आली. तो आपल्या हजारो पायदळ सैन्यानिशी संताजीस मिळाला.[२०]

१८. मराठ्यांचे स्वातंत्र्ययुद्ध (तारिखे खाफीखान), पृ. ३२-३३
१९. मराठ्यांचे स्वातंत्र्ययुद्ध (तारिखे खाफीखान), पृ. ३३
२०. मराठे व औरंगजेब (मासिरे आलमगिरी), पृ. ६३

अशा प्रकारे मराठ्यांचे बळ दिवसेंदिवस वाढत असता मोगलांच्या सरदार मंडळींनी आपले सैनिक गढीच्या बाहेरच ठेवून स्वतः गुपचूप कसा प्रवेश मिळविला, याची मोठी रंजक कथा खाफीखान आपणास सांगतो : "कासिमखान व इतर सरदार भयंकर पेचात सापडले होते. कासिमखान, रुहुल्लाखान (खानाजादखान) आणि सफशिकनखान यांचे तळ जवळ होते. त्यांनी गढीत शिरून घेण्याची गुप्त मसलत केली. महंमद मुरादखान आणि इतर सरदार यांचे मोर्चे काही अंतरावर होते. त्यांना ही योजना कळविण्यात आली नाही. प्रथम त्यांनी उरलेसुरले सामान गढीत पाठविण्यास सुरुवात केली. आम्हाला लढायचे आहे, यामुळे सामानाची अडगळ नको, असा त्यांनी पुकारा केला. पहिल्या रात्री गस्त घालण्याच्या निमित्ताने कासिमखान गोट्यातून बाहेर पडला. दरवाजातून गढीत शिरणे त्याला योग्य वाटेना. शिवाय दरवाजासमोर शिपाई-सरदारांची गर्दी होती, म्हणून तो दोर लावून भिंतीवर चढला आणि गढीत दाखल झाला. नंतर रुहुल्लाखान (खानाजादखान) आणि सफशिकनखान हे दरवाज्यातून आत आले. दरवाजाभोवती जमलेल्या सैनिकांशी त्यांना मारामारी करावी लागली. तोपर्यंत महंमद मुरादखान आणि इतर साथीदार यांना वरील बातमी लागली. ते मोठ्या कष्टाने गढीत दाखल झाले."

"गढीत गेल्यावर सफशिकनखानाने महंमद मुरादखानाकडे वळून म्हटले, 'किती हिंमतीने आपण गढीत आलो नाही!' महंमद मुरादखानाचा भाचा सुलतान हुसेन हा भयंकर चिडला. तो म्हणाला, 'थूः तुमच्या मर्दुमकीवर! आम्ही आत कसे आलो याचा टेंभा मिरविता काय?' त्याच्याबरोबरच्या लोकांनीही सफशिकनखानाची छीः थू केली."[२१]

## काय हे दुर्दैव ओढावले!

गढीच्या पायथ्याशी असणाऱ्या तलावाच्या पाण्यावर मोगलांनी तीन दिवस कसेबसे काढले. चौथ्या दिवशी पूर्वीच्या पायदळापेक्षा दहा पटीने जास्त सैन्य मोगलांवर चालून येताना दिसले. हे वाढलेले सैन्य

---

२१. मराठ्यांचे स्वातंत्र्ययुद्ध (तारिखे खाफीखान), पृ. ३३ - ३४

म्हणजे चित्रदुर्गच्या नायकाचे संताजीस येऊन मिळालेले पायदळ होय. साकी मुस्तैदखानाने या मराठ्यांच्या चढाईचे व मोगलांच्या दाणादाणीचे मोठ्या अलंकारिक भाषेत वर्णन केले आहे : "या कृष्णवर्णीय पायदळामुळे सूर्यप्रकाशाच्या ऐवजी वातावरण काळे ठिक्कर पडले. युद्धाला सुरुवात झाली. मोगलांचा दारूगोळा बहुतेक गारद झाला होता. उरलेला दारूगोळा खर्च होऊन गेला होता. त्यामुळे मोगल सैनिक हताश झाले. हे काय दुर्दैव ओढावले म्हणून मोगल सैनिक इकडेतिकडे धावत आणि आक्रोश करीत हताश होऊन गेले. दुष्ट काफरांच्या सैन्याने गोळ्यांचा सारखा वर्षाव चालविला होता. त्यामुळे या ठिकाणी अनेक मोगल सैनिक प्राणास मुकले. उरलेल्या मोगल सैन्याला मराठ्यांच्या कोंडमाऱ्यातून बाहेर पडण्याची वाट सापडेना. त्यामुळे ते सैनिक जबरदस्तीने किल्ल्यात घुसले. त्या प्रलयकारी युद्धात जे हजर होते आणि जे मर्दुमकीने लढले, असे विश्वासू सैनिक सांगतात, "पेशखान्यातील हल्ल्यात, वाटेत आणि तलावाच्या काठावर मिळून मोगल सैन्यातील एक तृतीयांश सैनिक दुष्ट काफरांच्या तीक्ष्ण खड्गांच्या भक्षस्थानी पडले."[२२]

गढीच्या पायथ्याशी मोगल सैनिकांची मोठी बिकट अवस्था झाली. बाहेरून मराठ्यांचे हल्ले व त्यातून वाचण्यासाठी किल्ल्यात शिरावे, तर गढीचे दरवाजे बंद. अशा परिस्थितीत सैनिकांनी जबरदस्ती करून गढीचे दरवाजे उघडण्यास भाग पाडले. मराठ्यांच्या समोरच मोगल सैनिक गढीत शिरले; पण मराठ्यांनी त्यांना अटकाव केला नाही. त्यांना माहीत होते की, गढीत एवढ्या सैनिकांसाठी अन्नधान्याची सामग्री नाही, उपासमारीने ते लवकरच आपणास शरण येतील. गढीत आश्रय घेतल्यावर पहिल्या दिवशी सर्व सैनिकांना ज्वारी-बाजरीच्या भाकरी वाटण्यात आल्या. गढीतील घरांच्या छप्परांना जे जुने-नवे गवत वापरले होते, ते हत्ती-घोड्यांना खाण्यास दिले गेले; पण पहिल्याच दिवशी गढीतील धान्य व चारा संपून गेला आणि पुढे काय याची विवंचना करीत

२२. मराठे व औरंगजेब (मासिरे आलमगिरी), पृ. ६३

मोगल सैनिकांची उपासमार सुरू झाली. आपणास भाकरी नाही, घोड्यास दाणा-चारा नाही, अशा परिस्थितीत 'प्राण गेलेत तर जावोत' पण परमेश्वराने या आपत्तीतून सोडवावे, असे त्यांना वाटू लागले.[२३]

खाफीखानाने आपल्या ग्रंथात हा प्रसंग जिवंत उभा केला आहे : "दिवसेंदिवस मोगल सैनिकांची अवस्था कठीण होऊ लागली. शेवटी परिस्थिती अशी आली की, लष्करातील गुरेढोरे, घोडे इत्यादी यांचा जवळजवळ निकाल लागला होता. उरलीसुरली जनावरे लोकांनी मारून खाल्ली. गढीत अंबरखान्यात व पेवांतून धान्य साठविले होते. कासिमखानाने ते काढले. सैन्यातील प्रमुख लोकांची नावे नोंदली. प्रत्येक माणसाला अच्छेर-पावशेर ज्वारी देण्यात आली. बरोबर थोडेसे अरजन (हिंदी चीना) नावाचे धान्य देण्यात येई. कणिक अथवा चणे यात मिसळून ते उकडून खात. बाकीच्या सामान्य लोकांची अक्षरशः उपासमार झाली. कित्येकजण उपासमारीमुळे गढीच्या भिंतीवरून उड्या टाकून मराठ्यांच्या आश्रयाला गेले. त्यापैकी अनेकांच्या कमरेला रुपये आणि अश्रफ्या होत्या. संताजीच्या सैनिकांनी त्यांच्या कमरा मोकळ्या करून त्यांचे सोनेनाणे काढून घेतले. मराठ्यांच्या छावणीतील लोक मेवामिठाई इत्यादी जिनसा घेऊन गढीच्या भिंतीपर्यंत येत आणि मन मानेल त्या किंमतींना त्या वस्तू विकत. गढीतील लोक रुपयांच्या पुरचुंड्या करून टाकीत आणि खाण्याच्या वस्तू वर ओढून घेत, त्यावर ते कसेबसे जगत."[२४]

## कासिमखानाची विषप्राशन करून आत्महत्या!!

मोगली लष्कर अशा भयंकर संकटात सापडले असता त्यावर आणखी एक आपत्ती कोसळली. त्यांचा सेनापती कासिमखान हा एकाएकी मृत्युमुखी पडला. साकी मुस्तैदखानाने नमूद केले आहे की, खानास अफूचे भयंकर व्यसन होते, गढीत कोंडला गेल्याने त्यास अफू मिळाली नाही. म्हणून तो तिसऱ्या दिवशी मरण पावला आणि गनिमाच्या

---

२३. कित्ता, पृ. ६३

२४. मराठ्यांचे स्वातंत्र्ययुद्ध (तारिखे खाफीखान), पृ. ३४

तावडीतून सुटला![२५] खाफीखानाने कासिमखानाच्या मरणाची, अफू न मिळाल्याने विषप्राशन आणि संताजीने केलेल्या बेइज्जतीचा धक्का अशी दोन संभाव्य कारणे दिली आहेत.[२६]

कासिमखान हा मोठा पराक्रमी व प्रतिष्ठेचा सरदार होता. बादशहाने खास करून आपणावर सोपविलेल्या या कामगिरीत असे भयानक अपयश यावे, ही गोष्ट त्याच्या मनाला भयंकर लागून राहिली असावी. मानी स्वभावाच्या कासिमखानास नियतीने केलेली ही अवहेलना सहन न झाल्याने त्याने आत्महत्याच केली असणे अधिक संभवनीय आहे.

कासिमखानाच्या आकस्मिक मृत्यूची बातमी मोगली लष्करात वाऱ्यासारखी पसरली. एवढेच नव्हे तर ती गढीबाहेरच्या मराठी लष्करातही पोहोचली. या बातमीने मराठे अधिकच शेर बनले आणि मोगल निराशेच्या खोल दरीत ढकलले गेले! त्यांच्यापैकी जे शूर सैनिक होते ते म्हणू लागले : "उपासमारीने आणि अशा दुर्दशेच्या अवस्थेत मरण्यापेक्षा काफरांवर तुटून पडणे बरे. एक जय तरी मिळेल नाहीतरी आम्ही शहीद तरी होऊ. या दोहोंपैकी काहीही झाले तरी सद्यःस्थितीतून आमची सुटका होईल आणि पुण्य पदरी पडेल."[२७]

## मोगलांची संताजीकडे जीवनदानाची याचना !

उपासमारीने सैनिक जीवावर उदार होऊन शहीद होण्याची भाषा करू लागले, तरी त्यांचे सरदार या संकटातून काही मार्ग काढण्याचा प्रयत्न करीत नव्हते. कदाचित बाहेरून कोठून तरी मोगली सैन्य आपल्या साहाय्याला येईल, अशी आशा त्यांना वाटत असावी. अशा सैन्याची ते वाट पाहात असावेत; पण मोगली लष्कराची स्थिती दिवसेंदिवस फारच बिकट होत गेली. साकी मुस्तैदखानाने म्हटले आहे की, जनावरांची तर अशी उपासमार चालू होती की, लष्करातील घोडी

२५. मराठे व औरंगजेब (मासिरे आलमगिरी), पृ. ६४
२६. मराठ्यांचे स्वातंत्र्ययुद्ध (तारिखे खाफीखान), पृ. ३४
२७. मराठे व औरंगजेब (मासिरे आलमगिरी), पृ. ६४

एक दुसऱ्याच्या शेपट्या गवत समजून खाऊ लागली होती! इकडे मराठेही गढीबाहेर अस्वस्थ बनत होते. गढीस वेढा देऊन उगाच बराच काल वाया घालविणे त्यांना धोक्याचे वाटत होते. खरोखरच दोड्डेरीत अडकून पडलेल्या मोगलांच्या साहाय्यास दुसरी एखादी मोठी मोगली फौज आली, तर हाती आलेले सर्व यश वाया जाण्याची शक्यता होती.

परिणाम मोगली सरदारांच्या शरणागतीची वाट न पाहता मराठ्यांनी गढीवर निर्णायक हल्ला चढविला आणि त्याचा एक बुरूज मुळापासून उखळून काढला. आता गढी मराठ्यांच्या हाती जाऊन आपण कैदी होणार हे मोगल सरदारांना कळून चुकले. आतापर्यंत त्यांनी नामुष्कीचा प्रसंग पुढे पुढे ढकलण्याचा प्रयत्न केला होता; पण आता मूर्तिमंत नामुष्की पुढे येऊन उभी राहिली होती. तिला सामोरे जाण्याशिवाय खानमजकुरांना आता दुसरे गत्यंतर नव्हते.

मोगल सरदारांपैकी खानाजादखान (उर्फ रुहुल्लाखान) हाच सर्वांत प्रमुख व प्रतिष्ठित सरदार होता. त्याने आपल्या सहकाऱ्यांशी सल्लामसलत करून संताजीकडे तहाची योजना करावयाचे ठरविले. जीवाचे अभय मिळावे, सरदारांना घोडा व अंगावरील कपड्यांनिशी जाऊ द्यावे व त्या मोबदल्यात शक्य तेवढी जबर खंडणी देऊ, असा खानाजादखानाचा तहाचा प्रस्ताव घेऊन त्याचा दिवाण व काही मोगल सरदार संताजीकडे गेले. या शिष्टमंडळात एक दख्खनी मुसलमान सरदारही होता. शिष्टमंडळाने तहाची बोलणी सुरू करून खंडणी किती द्यावी लागेल, असे संताजीस विचारताच तो म्हणाला, "तुमच्याजवळ असलेले हत्ती, घोडे, सामानसुमान आणि नगद तर घेईनच, याशिवाय एक लाख होन म्हणजे साडेतीन लाख रुपये हवेत. यापेक्षा कमी नाही."

यावर मोगलांच्या शिष्टमंडळातून आलेला तो दख्खनी मुसलमान सरदार हळूच संताजीच्या कानाशी लागला आणि त्यास म्हणाला, "हे काय बोलणे झाले! अहो अटी कडक करा. एक लाख होन तर एकट्या रुहुल्लाखानाकडून खंडणी म्हणून मिळतील!" युद्धातील पारडे पूर्णपणे संताजीच्या बाजूस झुकले होते. अशा परिस्थितीत त्याने त्याचा पूर्ण फायदा उठविल्यास नवल नव्हते. लगेच त्याने खंडणीची

रक्कम वाढविली. शेवटी बोलणी होऊन सर्व सरदारांवर मिळून दोन लाख होन म्हणजे सात लाख रुपये इतकी खंडणी ठरविली गेली. प्रत्येक सरदाराने आपणास जीवदान मिळाल्याबद्दल खंडणीच्या रकमेचे मुचलके लिहून दिले. खंडणी वसूल होईपर्यंत सरदारांचे आप्त अथवा जवळच्या मातबर व्यक्ती ओलीस म्हणून ठेवून घेतल्या गेल्या.[२८]

## सच्चा सेनापती असा वागतो!

तह झाल्याबरोबर लढाई संपली. प्रतिपक्ष शरण आला. शरणागतास अभय देऊन त्यास विश्वासाने वागविणे, हे सच्चा सेनापतीचे कर्तव्य असते. संताजी याबाबतीत किती मोठ्या दिलाने वागला, हे मोगल इतिहासकारांनीच लिहून ठेवले आहे. तह झाल्याबरोबर संताजीने गढीच्या आतील मोगली लष्करास निरोप धाडला : "किल्ल्यातील लोकांनी आता काही भय न बाळगता बाहेर यावे. किल्ल्याबाहेर त्यांनी दोन रात्री काढण्यास काही हरकत नाही. कुणापाशी काही चीजवस्तू असल्यास त्याला कोणत्याही प्रकारचा उपसर्ग होणार नाही. त्यांना हव्या त्या जिनसा माझ्या लष्करातून विकत घेण्यास माझी परवानगी आहे."[२९]

साकी मुस्तैदखान म्हणतो की, गढीत दाखल झाल्यापासून तेरा दिवसांनी मोगल लष्कराची सुटका होऊन ते गढीबाहेर पडले. तेरा दिवसांच्या उपासमारीने मोगल सैनिक गलितगात्र झाले होते. संताजीने गढीच्या दरवाजावर आपली माणसे नेमली होती. त्यांच्याकडे शरण आलेल्या मोगल सैनिकांना अन्नदान करण्याचे काम सोपविले होते. जसजसे मोगल सैनिक बाहेर येत तसतसे मराठे त्यांना एका बाजूने

---

२८. मराठ्यांचे स्वातंत्र्ययुद्ध (तारिखे खाफीखान), पृ. ३५
साकी मुस्तैदखान तहासंबंधी अशी माहिती देतो : "खालील अटीवर तह ठरला. कासिमखानाचे हत्ती, घोडे, जडजवाहीर, नगदी सोनेनाणे ही सर्व संपत्ती संताजीला देण्यात यावी. याशिवाय वीस लाख रुपये संताजीला देण्यात यावेत. कासिमखानाचा विश्वासू सेवक आणि खासगीचा कारभारी बालकिशन याचा मुलगा याने ओलीस राहावे." - मराठे व औरंगजेब (मासिरे आलमगिरी), पृ. ६४

२९. मराठे व औरंगजेब (मासिरे आलमगिरी), पृ. ६४

भाकरी, तर दुसऱ्या बाजूने पाणी देऊन बाहेर पाठवीत होते.[३०] खानाजादखान व त्याचे सहकारी यांना आपला घोडा व अंगावरील कपडे यानिशी सुखरूप बाहेर पडू दिले. इतर सैनिकांना मात्र फक्त कपड्यानिशी जाण्याची परवानगी दिली गेली. मागे राहिलेले हत्ती, घोडी, जडजवाहीर इत्यादी सामानसुमान मराठ्यांच्या हाती पडले. खाफीखान म्हणतो, "या मोहिमेत बादशाही सैन्याची फार दुर्दशा झाली. मोगलांची संपत्ती, सामानसुमान, सरदारांचे जडजवाहीर इत्यादी त्या दुष्ट काफराच्या (संताजीच्या) हाती सापडली. त्यांची किंमत पन्नास-साठ लाखांपेक्षा जास्त होती."[३१]

मोगली लष्कराने गढीबाहेर दोन-तीन दिवस मुक्काम केला. संताजीने त्यांच्या पोटापाण्याची चोख व्यवस्था केल्याने त्यांना पुनर्जन्म प्राप्त झाला. तिसऱ्या दिवशी खानाजादखान आपल्या सहकाऱ्यांसह बादशाही छावणीकडे जाण्यास निघाला. विशेष म्हणजे मार्गात त्याच्या रक्षणासाठी संताजीने आपले एक खास लष्करी पथक त्याजबरोबर पाठविले.[३२]

दोड्डेरीच्या गढीत कोंडल्या गेलेल्या मोगल लष्कराच्या बचावासाठी बादशाही छावणीतून हमीदुद्दीनखान बहादूर व हैद्राबादेहून रुस्तुमदिलखान रवाना झाले होते. खानाजादखान हा अधोनीजवळ पोहोचला असता ते त्यास येऊन भेटले. तोपर्यंत सर्व खेळ खलास झाला होता. हमीदुद्दीनखान बहादूर व रुस्तुमदिलखान या उभयतांनी खानाजादखान व त्याचे सहकारी यांना आपल्याजवळचे तंबू, कपडेलत्ते व रोख रक्कम दिली. अधोनीचा किल्लेदार रादअंदाजखान यानेही संकटातून बचावलेल्या खान मजकुरांस सर्व प्रकारची मदत केली. अधोनीच्या परिसरातील गावातून फजित पावलेल्या लष्करासाठी अन्नधान्य व इतर आवश्यक सामान गोळा करण्यात आले.[३३]

---

३०. कित्ता
३१. मराठ्यांचे स्वातंत्र्ययुद्ध (तारिखे खाफीखान), पृ. ३५
३२. मराठे व औरंगजेब (मासिरे आलमगिरी), पृ. ६४
३३. कित्ता, पृ. ६४-६५

खासा औरंगजेब बादशहाने पाठविलेल्या नामांकित अशा बड्या उमरावांच्या या मोहिमेचा असा भयंकर शेवट झाला. या संकटाची बातमी जेव्हा बादशहाला देण्यात आली तेव्हा तो उद्‌गारला : "जे काही घडले ते परमेश्वरी इच्छेने झाले. सरदारांच्या हातची ही गोष्ट नव्हती." खाफीखान म्हणतो, "पण बादशहाला फार वाईट वाटले. त्याने सरदारांना आपल्यासमोर येऊ दिले नाही. त्याने संबंधित अधिकाऱ्यांच्या लांब लांब बदल्या केल्या."[३४]

केवळ संताजीच्याच लष्करी जीवनातील नव्हे तर छत्रपती राजाराम महाराजांच्या कारकिर्दीतील हा मराठ्यांचा महान विजय आहे. बलाढ्य फौजा बाळगून आत्मविश्वासाने वावरणाऱ्या शत्रूच्या शूर सेनानींना आपल्या गनिमी युद्धतंत्राच्या विलक्षण कौशल्याने हमखास पेचात आणून दाती तृण धरावयास लावणारा सेनानी म्हणून दक्षिणेत संताजीची जी मोठी ख्याती झाली ती अशा महान विजयांमुळेच होय. संताजीचे नाव ऐकताच नामांकित मोगल सेनानींच्या उरात धडकी भरत असे, असे खुद्द औरंगजेबाच्या इतिहासकाराने - खाफीखानाने लिहून ठेवले आहे ते यथार्थच होय.

विशेष नमूद करण्यासारखी गोष्ट अशी आहे की, संताजीच्या या महान विजयाची कहाणी सर्वस्वी त्या कालातील मोगल इतिहासकारांनी, म्हणजे शत्रूपक्षीय लोकांनी लिहून ठेवलेल्या हकिकतींवर आधारित आहे. मराठीत या घटनेबद्दल जवळजवळ माहिती नाहीच, असे म्हटले तरी हरकत नसावी. फक्त जेधे शकावली या

---

३४. मराठ्यांचे स्वातंत्र्ययुद्ध (तारिखे खाफीखान), पृ. ३५-३६
साकी मुस्तैदखान लिहितो, "मोहिमेत फजीत पावलेल्या सरदारांच्या बदल्या बादशाही आज्ञेने करण्यात आल्या. खानाजादखान जाफराबाद बीदरच्या सुभेदारीवर. सफशिकनखान यास धामुनीच्या फौजदारीवर, सय्यद असालतखान यास रणथंबोरच्या किल्लेदारीवर आणि महंमद मुरादखान यास दोहद आणि गोध्रा येथील फौजदारीवर अशा बदल्या बादशाही आज्ञेने करण्यात आल्या. बाकीचे सैन्य बादशाही फौजेत दाखल करण्यात आले." - मराठे व औरंगजेब (मासिरे आलमगिरी), पृ. ६५

घटनेची नोंद देते : "पौष शुध ११. ते दिवसी संताजी घोरपडे याणी खानजादीखान व कासीमखान सिरिया (सिरा) जवळ डोडेरी (दोड्डेरी) म्हणऊन गाव आहे तेथे कैद केले. कासीमखान तर मेला. खानाजादखानास लाख रुपये घेऊन वाट दिल्ही."[३५]

## हिंमतखान बहादूर बसवापट्टणच्या आश्रयास

दसऱ्यानंतर संताजीने जेव्हा कर्नाटक मोहिमेस प्रारंभ केला होता, तेव्हा विजापूरचा सुभेदार नसुल्लाखान व विजापुरी कर्नाटकाचा फौजदार हिंमतखान बहादूर या दोघांना त्याचा प्रतिकार करण्याचा बादशहाने हुकूम केल्याचे आपण पाहिलेच आहे; पण या दोन्ही मोगल सरदारांना झुकांडी देऊन संताजी तुंगभद्रा पार करून चित्रदुर्गच्या प्रदेशात गेला आणि तेथे त्याच्यावर चालून येणाऱ्या कासिमखान, खानाजादखान इत्यादी मोगल सरदारांचा त्याने दणदणीत पराभव केला. या खानांच्या बचावासाठी बादशहाला हमीदुद्दीनखान व रुस्तुमदिलखान या आणखी दोन सरदारांना पाठवावे लागले; पण संकटात सापडलेल्या आपल्या सरदाराच्या बचावासाठी दुसरा सरदार पाठवावा, तर तोही मराठ्यांकडून संकटात पडल्याची बातमी येऊन पोहोचावी, अशी बादशहाची अवस्था झाली. १५ जाने. १६९६ चे मोगल

---

३५. शिवचरित्र प्रदीप, पृ. ३८, जेधे शकावलीमधील संताजीच्या या विजयाची तारीख खरे जंत्रीप्रमाणे ५ जाने., १६९६ अशी येते. साकी मुस्तैदखानाने ही तारीख १९ जाने., १६९६ अशी दिली आहे - (मराठे व औरंगजेब : मासिरे आलमगिरी, पृ. ६१). या दोन्ही तारखा चुकल्या आहेत. आपण पाहिलेच आहे की, ११ नोव्हें., १६९५ रोजी संताजी गदग प्रांतात आहे. तेथून तो दक्षिणेकडे चित्रदुर्ग प्रांतात गेल्यावर लवकरच ही घटना घडून आलेली आहे. ता. ५ डिसें., १६९५ च्या आपल्या Diary & Consultation Book मध्ये मद्रासकर इंग्रज संताजीने कासिमखानाच्या केलेल्या पराभवाचा निर्देश करतात - (DC, 1695, p. 156). याचा अर्थ स्पष्ट आहे की, ५ डिसें., १६९५ पूर्वी सुमारे ८/१० दिवस म्हणजे २५ नोव्हें. च्या सुमारास ही घटना घडून आली; पण संताजीचा मोगलांशी हा संघर्ष १०/१२ दिवस चाललेला दिसतो. यावरून संताजीचा पेशखान्यावरील पहिला हल्ला १३/१४ तारखेस घडून आला असावा व अखेरच्या शरणागतीचा प्रसंग २५ नोव्हें. च्या सुमारास घडून आला असावा, असे अनुमान बांधावे लागते.

दरबारचे बातमीपत्र काय म्हणते पाहा : "बादशहा हे बक्षीउल्मुल्क मुखलिसखान यास म्हणाले, 'रुस्तुमदिलखान हा खानाजादखान याच्या कुमकेला गेला आहे. त्याला गनिमांनी (मराठ्यांनी) घेरले आहे. विजापुरी कर्नाटकचा फौजदार हिंमतखान बहादूर यास लिहा की - तुम्ही खानाजादखान, रुस्तुमदिलखान इत्यादी सरदारांची सुटका करवून आपल्याकडे घेऊन जा. हमीदुद्दीनखान हा खानाजादखानाला बसवापट्टणच्या मार्गे हुजुरात घेऊन येईल."[३६]

पण बादशहाचा हा हुकूम हिंमतखान बहादुरास मिळण्यापूर्वीच खानाने अधोनीच्या वाटेवर असणाऱ्या खानाजादखान व त्याचे सहकारी यांची भेट घेऊन त्यांचे सांत्वन केले होते. या खान मंडळींना संताजीने सड्या घोड्यानिशी व अंगावरील वस्त्रानिशी दोड्डेरीहून बादशाही छावणीकडे जाण्यासाठी निरोप दिला होता. हिंमतखान बहादूर हा मोठा उदार अंतःकरणाचा माणूस होता. त्याने खानाजादखानास 'वस्त्रे, पोशाख, चार हत्ती, चार घोडे व दोन हजार होन' असा सरंजाम भेट म्हणून दिला. इतर सरदारांनाही कमी-अधिक प्रमाणात त्याने भेटी दिल्या. एवढेच नव्हे तर खान मंडळींना अधोनीपर्यंत पोहोचविण्यासाठी पाचशे स्वारांचे एक पथकही त्याने दिले.[३७]

यावेळी हिंमतखान बहादुराने चित्रदुर्गच्या पश्चिमेस सुमारे २० मैलांवर असणाऱ्या बसवापट्टण[३८] येथे आपले मुख्य ठाणे केले होते. हिंमतखान बहादुराजवळ मोठे सैन्य नसल्याने व बादशहाने त्याच्याकडे पाठविलेली सैन्याची पथके अद्यापि त्यास येऊन न मिळाल्याने त्याने संताजीवर चालून जाण्याचे धाडस न करता बसवापट्टणच्या गढीतच मुक्काम केला होता.[३९] खान आपल्यावर हल्ला करण्याच्या योजनेत असून, तो बादशाही पथकांची मार्गप्रतिक्षा करीत असल्याची बातमी

३६. मोगल दरबारची बातमीपत्रे, पृ. १२८
३७. मोगल दरबारची बातमीपत्रे, पृ. १२९
३८. दोड्डेरीपासून पश्चिमेस ४० मैलांवर
३९. मोगल दरबारची बातमीपत्रे, पृ. १२९

संताजीस दोड्डेरी येथेच समजली. बादशाही सैन्य बसवापट्टणला येऊन हिंमतखान बहादुराचे लष्करी बळ वाढण्यापूर्वीच संताजीने हल्ला करण्याची योजना आखली. दोड्डेरीच्या गढीत आपली शिबंदी ठेवून त्याने आपल्या सैन्याचे दोन भाग केले. पहिले सैन्य त्याच प्रदेशात बादशाही आज्ञेने त्याच्यावर चालून येणाऱ्या हमीदुद्दीनखानाच्या प्रतिकारासाठी त्याने ठेवले, तर दुसरे सैन्य स्वतः घेऊन तो बसवापट्टणवर चाल करून गेला. यावेळी त्याच्याकडे १० हजार घोडदळ व १२ हजार पायदळ अशी २२ हजारांची जंगी फौज होती.

## हिंमतखान बहादुराची बादशहाकडे मदतीची याचना

चित्रदुर्गच्या प्रदेशात मोगल-मराठा संघर्ष पराकोटीस पोहोचला होता. संताजीच्या पारिपत्यासाठी एकामागून एक मोगल सरदार पाठविला जात होता. यावेळीसुद्धा हमीदुद्दीनखान, रुस्तुमदिलखान व हिंमतखान असे तीन मोगल सरदार या प्रदेशात वावरत होते. वास्तविक हे तीन सरदार एकत्र आले असते, तर संताजीशी ते समर्थपणे लढू शकले असते; पण हे संताजीने घडू दिले नाही. हिंमतखान बहादुरास बाहेरून अन्य कोणाची कुमक मिळण्यापूर्वीच नेस्तनाबूद करण्याची योजना संताजीने आखली आणि विद्युतगतीने हालचाली करून तो बसवापट्टणवर घसरला.

बसवापट्टणमधील हिंमतखान बहादुराची स्थिती मात्र बिकट झाली होती. त्याने बादशहाला तातडीची विनंती पाठविली : "संताजी हा मोठे सैन्य घेऊन बसवापट्टणवर चालून आला आहे. माझ्यापाशी सैन्य फार थोडे आहे. अद्याप बादशाही सरदारांची कुमक आली नाही. जी परिस्थिती आहे ती कळवीत आहे. मी प्रयत्नांची पराकाष्ठा करीन." हिंमतखान बहादुराने प्रामाणिकपणे व कळकळीने लिहिले होते. मोगलांची दोड्डेरीच्या पराजयाची जबर जखम अद्यापि ताजी होती. तसाच प्रसंग हिंमतखान बहादुरावर ओढवू नये म्हणून बादशहाने हमीदुद्दीनखान व रुस्तुमदिलखान यांना हुकूम केला : "तुम्ही अद्याप

हिंमतखान बहादुराच्या साहाय्यार्थ गेला नाहीत. तुम्ही तातडीने जावे"[४०] - (२५ जाने., १६९६).

पण बादशहा एवढीच तजवीज करून थांबला नाही. यावेळी पन्हाळ्यास शहाजादा बेदारबख्त[४१] वेढा घालून बसला होता. त्याला त्या वेढ्यातून काढून बादशहाने बसवापट्टणकडे जाण्याचा हुकूम केला - (२६ जाने., १६९६).[४२]

हिंमतखान बहादूर बसावपट्टणमध्ये, बादशहा सोलापूरजवळ ब्रह्मपुरीच्या छावणीत, शहाजादा बेदारबख्त पन्हाळ्याच्या पायथ्याशी, अशा परिस्थितीत हिंमतखान बहादूरची कुमक पाठविण्यासंबंधी विनंती दरबारात आली - (२५ जानेवारी). तत्पूर्वीच २० जानेवारी रोजी बसवापट्टणजवळ संताजी-हिंमतखान बहादूर यांची लढाई घडून आली.

## संताजीचा दुसरा मोठा विजय : हिंमतखान ठार

हिंमतखान बहादूर हा खरोखरच नावाप्रमाणे धाडसी आणि पराक्रमी होता. त्याच्याजवळ सैन्य थोडे असल्याने आतापर्यंत त्याने संताजीवर आक्रमण केलेले नव्हते; पण आता खुद्द संताजीच त्याच्यावर चालून आला असता पळून न जाता त्याने त्याच्याशी मुकाबला करण्याचे ठरविले. आपले सैन्य घेऊन तो बसवापट्टणच्या गढीतून बाहेर पडला आणि संताजीवर त्याने चाल केली.

संताजीने आपल्या सैन्याच्या दोन तुकड्या केल्या होत्या. एक तुकडी त्याने बसवापट्टणजवळच्या जंगली प्रदेशात लपवून ठेवली होती आणि दुसऱ्या तुकडीचे स्वतः नेतृत्व करून तो खानाशी लढत होता. घनघोर लढाई सुरू झाली. खान शौर्याने लढत होता. उभयपक्षी अनेक सैनिक रणांगणी पडले. एवढ्यात संताजीने माघार घेऊन आपल्या सैन्यासह पळ काढावयास सुरुवात केली. खानास वाटले अवसान गळून संताजी पळून जातो आहे. तेव्हा त्यास मोठा चेव चढला व त्याने आपले सैन्य घेऊन संताजीचा पाठलाग सुरू केला. संताजी पुढे व त्याच्या मागे

४०. मोगल दरबारची बातमीपत्रे, पृ. १३१
४१. औरंगजेबचा नातू. शहाजादा आज्जमचा पुत्र.
४२. मोगल दरबारची बातमीपत्रे, पृ. १३१

खान असे होत पहिली तुकडी जेथे दबा धरून बसली होती त्या जंगलात ते आले. खान व त्याचे सैन्य आपल्या कह्यात आल्याबरोबर संताजी एकाएकी थांबला व पलटी खाऊन त्याने लढाईला सुरुवात केली. त्याच वेळी जंगलात दबा धरून बसलेले मराठी सैन्य अचानक पुढे येऊन त्याने खानास त्याच्या सैन्यासह घेरले. संताजीचे अनेक बर्कंदाज (बंदुकधारी) जंगलातील झाडावर चढून बसले होते. बंदुकी चालविण्यात ते निष्णात समजले जात. त्यांनी मोगल सैन्यावर गोळ्यांचा वर्षाव सुरू केला. मोगल सैनिक त्यांच्या गोळ्यांनी बळी पडू लागले. सर्व बाजूंनी वेढला जाऊनही खान मोठ्या पराक्रमाने लढला. बादशहाला त्याने काही दिवसांपूर्वी लिहिल्याप्रमाणे खरोखरीच त्याने प्रयत्नाची पराकाष्ठा केली. खान हत्तीवर बसून लढाई करीत होता. ऐन लढाईत त्याच्या कपाळाला मोठी गोळी लागली व तो जबर जखमी होऊन हौद्यातच कोसळला.[४३] तेवढ्यात मोगल सैन्यातील एक जमादार अली बाकी बेग खानाच्या हत्तीजवळ येऊन पोहोचला. त्याने पाहिले की, खान बेशुद्ध होऊन हौद्यात पडला असून परिस्थितीने अतिशय प्रतिकूल वळण घेतले आहे; पण अशाही स्थितीत हिंमत न हरता बाकी बेगने बेगुमानपणे हत्तीवरील माहुतास फर्माविले : 'खान जिवंत आहे. हत्ती पुढे चालीव. मी गनिमांना परतवून लावीन.' त्याप्रमाणे माहुताने हत्ती पुढे चालविला. बाकी बेग आपल्या पुत्रासह ठाण मांडून शौर्याने लढला; पण लवकरच तोही बाणाच्या व तलवारीच्या जखमा होऊन जमिनीवर कोसळला. आता मोगल सेनेचे नीतिधैर्य पूर्ण नष्ट होऊन तिचा पुरा पाडाव झाला. या लढाईत मोगलांचे एकूण ५०० सैनिक ठार झाले. बाकी बेगला मराठ्यांनी उचलून आपल्या छावणीत नेले.[४४] खुद्द संताजीस या लढाईत बाणाच्या दोन जखमा झाल्या. काही मोगल सैनिकांनी जखमी हिंमतखान बहादुरास आपल्या ठाण्यात नेले. तेथे तो त्याच दिवशी मध्यरात्री मरण पावला -

४३. खाफीखान म्हणतो की, कपाळी गोळी लागून हिंमतखान तत्क्षणीच ठार झाला; पण मोगल दरबारचे बातमीपत्र म्हणते की, तो गंभीर जखमी होऊन बेशुद्ध पडला व त्या दिवशी मध्यरात्री मरण पावला.

४४. मोगलांचा पाडाव होताच बाकी बेगने जवळच्या किल्ल्यात आश्रय घेतल्याचे व संधी साधून तेथून तो निसटून बादशहापाशी आल्याचे साकी मुस्तैदखान म्हणतो.

(२० जानेवारी, १६९६). खानाच्या लष्करातील हत्ती, घोडे, बाजारबुणगे सर्व काही संताजीच्या हाती पडले.[४५]

## खानजहान बहादुराचे बादशहाकडून सांत्वन

वीस जानेवारीस ही लढाई घडून आली; पण तिची बातमी ब्रह्मपुरीतील बादशाही छावणीत पोहोचण्यासाठी १३/१४ दिवस लागले - (२ फेब्रुवारी). हिंमतखान बहादूर हा मोगल दरबारातील ज्येष्ठ उमराव उम्दतुल्मुल्क खानजहान बहादूर याचा पुत्र. आपल्या पुत्राची बातमी कानावर पडताच तो बादशहाच्या दरबारात आला आणि त्यास म्हणाला : "हिंमतखान बहादूर आपल्या सेवेत मरण पावला. माझी हीच इच्छा आहे की, आपल्या सेवेत मीही कामी यावे." यावर बादशहाने सिंहासनावरून खाली उतरून हिंमतखानाच्या आत्म्यास शांती लाभावी म्हणून प्रार्थना केली आणि खानजहान बहादुराचे सांत्वन करताना म्हटले : "खान बहादूर हा शहीद झाला!" त्यानंतर बादशहाने त्यास आपल्या डेऱ्यावर जाण्यासाठी निरोप दिला. तो गेल्यावर बादशहाने आपला पुत्र शहाजादा कामबक्ष यास "खानजहान बहादूरच्या समाचारासाठी त्याच्या डेऱ्यावर" जाण्याची आज्ञा केली. एवढेच नव्हे तर बादशहाने खास अधिकाऱ्यांबरोबर आपल्या मुदपाकखान्यातील भोजन खानजहान बहादुराच्या डेऱ्यात पाठविण्याची आणि त्यास जेवू घालून येण्याची व्यवस्था केली.[४६]

## संताजीच्या हमीदुद्दीनखानाशी लढाया

हमीदुद्दीनखान व रुस्तुमदिलखान हे दोन मोगल सरदार अधोनीजवळ छावणी करून होते आणि बसवापट्टण येथे आश्रय घेतलेल्या हिंमतखान बहादुराच्या साहाय्यास तातडीने जावे म्हणून बादशहाने हुकूम केला होता - (२५ जाने., १६९६), हे आपण पाहिले; पण हे दोन सरदार बसवापट्टणकडे निघण्यापूर्वीच संताजीने हिंमतखान

---

४५. मोगल दरबारची बातमीपत्रे, पृ. १३३; मराठे व औरंगजेब (मासिरे आलमगिरी), पृ. ६४-६५

४६. मोगल दरबारची बातमीपत्रे, पृ. १३३ - १३४

बहादुरावर स्वारी करून त्यास ठार केले होते - (२० जाने., १६९६).

बादशहाचा हुकूम मिळताच हमीदुद्दीनखान व रुस्तुमदिलखान यांनी लष्करातील जड सामान अधोनीच्या किल्ल्यात ठेवले आणि ५ हजार घोडदळ व ७ हजार पायदळ अशा १२ हजार फौजेनिशी बसवापट्टणकडे कूच केले - (१ फेब्रु.). इकडे पन्हाळ्याच्या पायथ्या-पासून बेदारबख्तही संताजीच्या पारिपत्यासाठी बसवापट्टणकडे निघाला होता. तो बेळगाव-धारवाडमार्गे बंकापुरास (धारवाडच्या दक्षिणेस ५० मैल) पोहोचला होता. या सुमारास त्याने आपल्या लष्करातील जड सामान बंकापुरात ठेवून सड्या फौजेनिशी बसवापट्टणकडे कूच केले होते.[४७]

हिंमतखान बहादुरास ठार केल्यावर संताजीने बसवापट्टणास वेढा घातला होता. बसवापट्टणचा किल्लेदार महंमद ऐवज व दुसरा मोगल अधिकारी अजमतुल्लाखान हे दोघे बसवापट्टणची गढी लढवीत होते. अधोनी ते बसवापट्टण हे अंतर सुमारे १४० मैलांचे असून ते कापण्यासाठी हमीदुद्दीनखानाच्या फौजेस २५ दिवस लागले. हमीदुद्दीनखान बसवापट्टणपासून अवघ्या ८ कोसांवर आला असता संताजी त्याच्यावर चालून आला-(२५ फेब्रुवारी). उभयपक्षी लढाई घडून आली. मोगली बातमीपत्रात तिचा सविस्तर वृत्तांत दिला आहे : “संताजी हा बसवापट्टणच्या वेढ्यात गुंतला होता. हमीदुद्दीनखान तेथून आठ कोसांवर आला. आपले बरेच सैन्य वेढ्याच्या कामात ठेवून संताजी हा हमीदुद्दीनखान याजवर चालून आला. बादशहाच्या कृपेने शत्रूपैकी अनेकजण ठार वा जखमी झाले. शत्रूचा पराजय झाला. चार कोसपर्यंत त्याचा पाठलाग करण्यात आला. चार सजलेले घोडे व शस्त्रे आमच्या हाती सापडली. त्यानंतर शत्रूच्या स्थळावर (तळावर) हल्ला करून ते लुटले. संताजी तेथून पळून गेला. हमीदुद्दीनखान व इतर अधिकारी यांनी शत्रूच्या तळावर मुक्काम केला. यानंतर हमीदुद्दीनखानाने संताजीची बातमी आणण्यासाठी हेर नेमले. हेरांनी बातमी आणली की,

४७. कित्ता, पृ. १३६ व १४१

संताजी हा चित्रदुर्गकडे गेला. यामुळे हमीदुद्दीनखान याने तेथेच मुक्काम केला. मृतांचे दफन व जखमी लोकांची शुश्रूषा इत्यादी कामे करून दोन-तीन दिवसांनी तो गनिमांच्या पारिपत्यासाठी रवाना होणार आहे."[४८]

बादशहा संताजीच्या पारिपत्यासाठी किती उत्सुक होता, हे त्या सुमारच्या दरबारातील बातमीपत्रावरून स्पष्ट होते. बसवापट्टण येथे संताजीच्या हालचाली केंद्रित झाल्या होत्या. तेव्हा बादशहाने बसवापट्टणच्या प्रदेशाचा नकाशा तयार करून दाखविण्याची आज्ञा केलेली होती. त्याप्रमाणे दरबारातील वाकियानवीस भोलानाथ याने नकाशा तयार करून बादशहास दाखविला. शहाजादा बेदारबख्तही त्या प्रदेशाकडे रवाना झाला होता. आता तो कुठे आहे म्हणून बादशहाने विचारणा केल्यावर त्यास सांगण्यात आले : "तो बंकापुरहून (तीन मार्च रोजी) संताजीच्या पारिपत्यासाठी रवाना झाला आहे. बादशहाने विचारले, 'बंकापुरापासून तुंगभद्रा किती दूर आहे.' कळविण्यात आले की : अठरा कोस आणि तेथून बसवापट्टण दहा कोस आहे."[४९]

याच वेळी म्हणजे २५ मार्च १६९६ रोजी हमीदुद्दीनखानाने बादशहास लिहिलेले पत्र दरबारात दाखल झाले. त्यात संताजीशी लढून आपण त्याचा पराभव केला, याचा वृत्तांत खानाने दिलेला होता. हे पत्र वाचल्यावर बादशहाने त्याच्या प्रती आपला पुत्र शहाजादा आज्जम व नातू शहाजादा बेदारबख्त यांना माहितीसाठी पाठवून देण्यांची दरबारातील अधिकारी सियादतखान यास आज्ञा केली. तसेच पत्राच्या आणखी दोन जादा प्रती काढून त्या जुल्फिकारखान बहादूर व खानाजादखान यांनाही पाठवा आणि त्याबरोबर "सैनिक अशा दृढनिश्चयाने लढत असतात!" असा आपला निरोपही लिहून कळवा,

४८. मोगल दरबारची बातमीपत्रे, पृ. १४२
संताजीशी लढण्याच्या कामात बसवापट्टणचा फौजदार दाऊद दिलनाक व बसवापट्टणचा किल्लेदार महंमद ऐवज यांनी चांगली कामगिरी केल्याचे बादशहाच्या कानावर गेले. त्याने दाऊदला खिदमत दौलतखान ही पदवी दिली, तर महंमद ऐवजला ऐवजखान ही पदवी देऊन त्याच्या मन्सबीत वाढ केली.

४९. कित्ता, पृ. १३६ व १४३

असा त्याने हुकूम दिला.[५०] जिंजीचा किल्ला जिंकून घेण्यात जुल्फिकारखानाने केलेली कुचराई व संताजीच्या हातून खानाजादखानाने खाल्लेला सपाटून पराभव या पार्श्वभूमीवर बादशहाने या दोन सरदारांना हा टोमणा मारला होता.

हमीदुद्दीनखान पुढे सरकून बसवापट्टण येथे पोहोचला; पण संताजी तो परिसर सोडून गेला नव्हता. नुकत्याच झालेल्या लढाईत खानाने संताजीचा केलेला पराभव हा निर्णायक नव्हता. संताजीचे बरेच सैन्य बसवापट्टणच्या वेढ्यात होते व थोडे सैन्य घेऊन तो खानावर चालून आला होता. खानाजवळ १२ हजार फौज होती. स्वाभाविकच संताजीने माघार घेतल्याचे दिसते; पण तो लवकरच खानावर पुन्हा चालून आला. बसवापट्टणमधून बाहेर पडून खानाने संताजीशी लढाई दिली. मोगली बातमीपत्र सांगते : "संताजी हा युद्ध करण्यासाठी हमीदुद्दीनखानावर चालून आला. खानानेही त्याच्याशी लढा दिला. बादशहाच्या भाग्याने शत्रुंपैकी अनेकजण ठार अथवा जखमी झाले. शत्रूचा पराजय झाला. दोनशे घोडी व इतर शस्त्रास्त्रे आम्हा गाजींच्या हाती लागली. बादशहा म्हणाले, "मुजरा झाला"[५१]

## हमीदुद्दीनखानाचा बादशहाकडून सन्मान

हमीदुद्दीनखान संताजीसारख्या पराक्रमी मराठा सेनानीवर मिळविलेल्या विजयाने खूश झाला. कासिमखान, खानाजादखान, हिंमतखान यासारख्या नामांकित मोगल सरदारांना पराजित करणाऱ्या संताजीवर खानाने मिळविलेले हे विजय बादशहाच्या मनाला उभारी देणारे होते. खानाने मिळविलेल्या विजयाप्रीत्यर्थ त्याने त्यास 'हमीदुद्दीनखान बहादूर' ही पदवी बहाल केली. एवढेच नव्हे तर खास फर्मान पाठवून त्याचे अभिनंदन केले. फर्मानाबरोबर खिलतीची वस्त्रे व शिरपेच पाठविण्याचा त्याने हुकूम केला.[५२]

---

५०. कित्ता, पृ. १४३

५१. मोगल दरबारची बातमीपत्रे, पृ. १४४

५२. मोगल दरबारची बातमीपत्रे, पृ. १४५

संताजीविरुद्ध बसवापट्टण गढी लढविण्यात अजमतखान, बलरसखान व अजमतुल्लाखान यांनी चांगली कामगिरी केल्याबद्दल त्यांच्या मन्सबी वाढविण्यात आल्या. त्याचप्रमाणे हमीदुद्दीनखानाच्या फौजेतील त्याचे सहकारी रुस्तुमदिलखान, मुगलखान, छत्रसाल बुंदेला इत्यादींना खिलतीची वस्त्रे पाठविण्यात आली.[५३]

चित्रदुर्गच्या प्रदेशात दोन अडीच महिने संताजीच्या मोगलांशी लढाया सुरू होत्या. या कालात त्याने दोन मोठे विजय प्राप्त केले. हमीदुद्दीनखानाशी लढताना त्याने निर्णायक लढाई दिलेली दिसत नाही. खानाशी दोन लढाया करून आपली विशेष प्राणहानी होऊ न देता तो खाली जिंजीकडे निघून गेला. १२ हजारांची ताज्या दमाची फौज खानाकडे होती. तिच्याशी निष्कारण लढाया देत बसणे संताजीस आवश्यक वाटले नसावे. दुसरे असे की, हमीदुद्दीनास मिळण्यासाठी शहाजादा बेदारबख्त त्वरेने चित्रदुर्गच्या प्रदेशात येत होता. या दोन्ही फौजा एकत्र येऊन त्यांची संयुक्त फौज बनण्यापूर्वीच संताजी जिंजीकडे छत्रपती राजाराम महाराजांच्या दर्शनास गेला. संताजीचे हे विजय म्हणजे राजाराम महाराजांच्या कारकिर्दीला उज्ज्वल बनविणारे विजय होते. या विजयांनी मराठ्यांची कर्नाटकातच नव्हे तर सर्व दक्षिणेत प्रतिष्ठा वाढली होती. सर्वत्र मराठ्यांच्या नावाचा दरारा प्रस्थापित झाला होता. बरोबर याचवेळी, यशाच्या अत्युच्च शिखरावर असताना, संताजीचे राजाराम महाराजांशी वितुष्ट आले आणि परिणती अत्यंत दुःखद अशा घटनेत झाली. तोच वृत्तांत आपण पुढील प्रकरणात पाहणार आहोत.

***

५३. मोगल दरबारची बातमीपत्रे, पृ. १४४ व १४६



# ९.
# संताजीचा राजाराम महाराजांशी बिघाड

## मद्रास - कर्नाटकात मराठ्यांचा वाढता जोर

जानेवारी १६९६ च्या सुरुवातीसच धनाजी जाधव हा आपल्या फौजेसह जिंजीच्या प्रदेशात (मद्रास-कर्नाटकात) पोहोचला होता. जिंजीच्या आसमंतात मोगली फौजांबरोबर अनेक धावपळीच्या लढाया करून तो मार्चच्या पहिल्या आठवड्यात राजाराम महाराजांच्या दर्शनास जिंजीत गेला.

दरम्यान संताजीच्या मोगलांवरील दणदणीत विजयांच्या वार्ता सर्व कर्नाटकभर पसरल्या होत्या. त्यामुळे कर्नाटकातील मराठे शेर बनून सर्वत्र वावरत होते. मद्रासकर इंग्रज २० जाने., १६९६ रोजी लिहितात, "The Moratta's + + + increasing at Chingee (Jinji), frequently sending parties into several parts of the country near Tegnapatam.[1] ...and it is our opinion that there ought to be a fair correspondence kept with them from that place, during the present uncertain posture of things between them and Moors (the Mughals); the former by all advices appearing to be in all probability of being masters of all their country unless the Mogull (the Emperor) shall speedily send a very considerable army to the assistance of Zulphakar Cawn..."[2]

*(मराठ्यांचा जिंजीत भलताच जोर झाला आहे. तेघ्नापट्टणजवळच्या प्रदेशात ते सतत आपल्या सैन्याच्या तुकड्या पाठवीत असतात. सध्याच्या मोगल-मराठा संबंधाच्या अनिश्चित*

१. पांदेचरीच्या दक्षिणेस १२ मैल

२. Diary and Consultation Book, 1696, p. 9

*स्वरूपाच्या पार्श्वभूमीवर आपण तेघ्नापट्टणहून मराठ्यांशी मैत्रीचा पत्रव्यवहार ठेवणे आवश्यक आहे, असे आमचे मत आहे. सर्व बाजूंनी आमच्याकडे बातम्या तर अशा येताहेत की, मोगल बादशहाने जुल्फिकारखानाच्या मदतीस बऱ्यापैकी मोठी फौज तातडीने पाठवून दिली नाही तर मराठे या प्रदेशाचे स्वामी झाल्यासारखीच स्थिती होणार आहे.)* जुल्फिकारखानाच्या मदतीला मोगल बादशहाने तातडीने मोठी फौज पाठविली नाही, तर सर्व मद्रास-कर्नाटक मराठ्यांच्या मालकीचा झाल्यातच जमा आहे, असे इंग्रज लिहितात, त्यात अतिशयोक्ती मुळीच नव्हती.

कर्नाटकात सर्वत्र मोगलांनी बचावात्मक पवित्रा घेतला होता. जुल्फिकारखानाने जिंजीचा वेढा उठवून अर्काटच्या किल्ल्याचा आश्रय घेतला होता. गेले कित्येक महिने बादशाही छावणीतून त्यांच्या छावणीकडे रसद न आल्याने त्यांच्या फौजातील सैनिकांची मोठी कुचंबणा चालू होती. बाहेरून नव्या सैन्याची कुमकही नव्हती. अशा प्रतिकूल परिस्थितीत बाहेर पडून तो मुलखातून खंडण्याही वसूल करू शकत नव्हता. मद्रासचा इंग्रज गव्हर्नर आपल्या पत्रात खानाच्या हलाखीचे वर्णन करताना म्हणतो,

"Zulphakar Cawn's camp has not had above eight thousand Horse for above a year past and at this time is less than five thousand. At present there passes nothing from hence to the camp, but a little Grain, the merchants being frightened... of the Morattas forces, Wch : robb all they meet"[3] (January 31)

*(गेले वर्षभर जुल्फिकारखानाच्या छावणीत आठ हजारांच्या वर घोडदळ नाही. आता तर ते पाच हजारांहून कमी आहे. सध्या येथून खानाच्या छावणीत थोड्याबहुत अन्नधान्याशिवाय काहीही जात नाही. व्यापाऱ्यांनी मराठ्यांची मोठी धास्ती खाल्ली आहे. मराठे हाती सापडेल*

---

३. Public Despatches to England, 1694-96, p. 43

*ते लुटून नेतात.)*

जुल्फिकारखानाच्या फौजेची अवस्था मार्चच्या अखेरीपर्यंत तशीच राहिली. मोगल दरबारच्या बातमीपत्रांवरून दिसते की, १९ मार्च रोजी बादशहाने अडचणीत सापडलेल्या खानाकडे १५ लाख रुपयांचा खजिना पाठविला.[४] खजिन्याची ही रसद एप्रिलच्या सुरुवातीस खानाच्या छावणीत पोहोचली असावी.

दरम्यान पन्हाळ्याच्या पायथ्याहून संताजीच्या पारिपत्यासाठी निघालेला शहाजादा बेदारबख्त बसवापट्टणला पोहोचला होता; पण त्यापूर्वीच संताजी बसवापट्टण प्रदेश सोडून खाली दक्षिणेस बंगलूरच्या प्रदेशात गेला होता. आता चित्रदुर्गच्या नायकास शिक्षा करण्याशिवाय शहाजाद्यास काही काम उरले नव्हते. शहाजाद्याने नायकाविरुद्ध मोहीम हाती घेताच तो शरण आला. खंडणी देऊन नायकाने प्रकरण मिटविले.[५] शहजादा तसाच दक्षिणेत जिंजीकडे येणार व जुल्फिकारखानाची जागा घेणार, अशा प्रकारच्या वदंता या सुमारास सर्वत्र पसरल्या होत्या. संताजी हा बंगलूरच्या प्रदेशात खाली येणाऱ्या शहाजाद्यास अटकाव करण्यासाठीच थांबला आहे, असेही बोलले जात होते[६] (मार्च-एप्रिल १६९६).

## संताजीचा राजाराम महाराजांशी बिघाड

एप्रिल १६९६ मध्ये संताजी मद्रास-कर्नाटकाच्या प्रदेशात आला. मद्रासजवळच्या फोर्ट सेंट डेव्हिड येथील इंग्रजीची २३ एप्रिलची नोंद सांगते की, संताजी जिंजीकडे येत आहे;[७] पण तो जिंजीत आल्याचे दिसत नाही. धनाजीप्रमाणे आपणही जुल्फिकारखानाशी एक-दोन लढाया करून जावे, असे त्याने योजलेले होते. त्याप्रमाणे संताजीची खानाशी अरणी (जिंजीच्या उत्तरेस ३० मैल) या ठिकाणी लढाई घडून आली.

---

४. इतिहास आणि संस्कृती, एप्रिल १९७७, अंक ५३, पृ. ५३

५. History of Aurangzib, Vol. V., pp. 100-101

६. Letters From Fort St. George, 1696, pp. 21 & 29

७. Fort St. David Consultations, 1696, p. 52

औरंगजेबचा चरित्रकार भीमसेन सक्सेना या लढाईची माहिती देताना म्हणतो, "कासिमखानाचा पाडाव केल्यानंतर संताजी हा जिंजीकडे वळला. जुल्फिकारखानाला हे कळताच तो अर्काटहून (वेलोरच्या पश्चिमेस १० मैल) त्याचा पाठलाग करीत निघाला. अरणी मुक्कामी युद्ध होऊन त्यात संताजीचा मोड झाला. जुल्फिकारखानाला जय मिळाला."[८]

संताजीकडे यावेळी २० हजारांहून अधिक फौज होती. याउलट खानाजवळ ५ हजारांहून अधिक फौज नव्हती. अशा स्थितीत पाच हजार मोगली फौजेने २० हजारांच्या मराठी फौजेचा पराभव केला, असे म्हणणे हास्यास्पद ठरेल. सत्य असे दिसते की, संताजीच्या फौजेतील एखाद्या तुकडीने खानाशी लढाई दिली असावी.

८ मे १६९६ रोजी संताजी आपल्या फौजेनिशी जिंजीत दाखल झाला. यावेळी त्याच्याजवळ ४० हजारांची फौज आहे, अशी फोर्ट सेंट डेव्हिड येथील इंग्रजांना बातमी मिळाली होती; पण त्यांच्या अंदाजाने ही फौज २० हजारांहून थोडी अधिक असावी, असे त्यांनीच म्हटले आहे आणि तेच अधिक ग्राह्य वाटते.[९]

जिंजीच्या किल्ल्यात संताजीचा मुक्काम महिनाभर होता असे दिसते. जिंजीच्या खाली दक्षिणकडे एखादी मोहीम काढण्याची तो तयारी करीत होता. संताजीच्या या संभाव्य मोहिमेची बातमी हेराकरवी फोर्ट सेंट डेव्हिड येथील इंग्रजांना लागली होती. एवढेच नव्हे तर त्यांनी संताजीच्या मोहिमेच्या संभाव्य मार्गावरील आपल्या वखारींच्या

८. मोगल आणि मराठे (तारिखे दिल्कुशा), पृ. १२८

९. जेधे शकावलीत संताजी जिंजीत राजाराम महाराजांना चैत्र शके १६१८ मध्ये (मार्च-एप्रिल १६९६) भेटल्याचे म्हटले आहे; पण हा काल थोडा चुकला आहे. फोर्ट सेंट डेव्हिडचे इंग्रज आपल्या डायरीत नोंद करतात : "Haveing certaine advices that Santogee Goorpurrow arrived Chingie on Friday last (as the report goes) wth. 40,000 Horse & Foot, but we suppose it probable that there is above 20,000 and knowing that the Morattas are alwais very quick in their Motion." FDC, 1696, p. 59

संरक्षणाची तजवीजही चालवली होती.[१०]

पण संताजीची ही नियोजित लष्करी मोहीम निघूच शकली नाही. त्याच्या आतच दुर्दैवाने जिंजीत अत्यंत वाईट घटना घडून आली आणि ती म्हणजे संताजीचा राजाराम महाराजांशी बिघाड घडून आला. विशेष म्हणजे इंग्रज वखारवाल्याशिवाय इतर कोणीही या अत्यंत महत्त्वाच्या घटनेबद्दल माहिती देत नाही. इंग्रजही या बिघाडाचे प्रत्यक्षात काय कारण होते, हे सांगत नाहीत. ते फक्त बातमी देतात. १० जून, १६९६ रोजी फोर्ट सेंट डेव्हिडचे इंग्रज लिहितात,

"Our spies from the Moratta Camp and several other hands doe give an account of the **nondutifull behaviour of Santogee Goarpurrow** and his brother Virogee Goarpurrow which has caused a Generall Dissatisfaction amongst the Moratta Commanders. Wee have reason to belive that they will not follow Santogee Goarpurrow and his Brother but that they may all wait upon King Rama Raja... From the above advices wee conclude that the Morattas Affairs will take up some time to be settled a new at Chingie..."[11]

*(मराठ्यांच्या छावणीतील आमच्या हेरांकडून आणि इतर अनेक विश्वसनीय गोटांतून आम्हास संताजी घोरपडे व त्यांचा बंधू बहिर्जी*

१०. फोर्ट सेंट डेव्हिड येथील इंग्रज आपल्या Diary & Consultations मध्ये लिहितात : "Receiveing Advices from our spies and severall other hands that Santogee Goarpur Row with a considerable Number of horse said to be about 20,000 besides foot is Designed to the southward and fearing that they may plunder the Rt. Hon'ble Compas. Bounds (and having transiently heard it was their intention to doe it) ordered That Ensigne Natll; Eyton with. 30 men doe keep a strict Guard at Chummuncdulum to prevent their attempts on Mangi Coppoang; and that Ensigne Robt. Reay with. the like number doe the same at Treepopolore to hinder their Attempts on said Places" - FDC, 1696, p. 67

११. Fort St. David Consultation, 1696, p. 67

*घोरपडे यांच्या बेशिस्त वर्तनाबद्दल निश्चित स्वरूपाची बातमी समजली आहे.*

*त्यांच्या या वर्तनामुळे (जिंजीमधील) मराठा सरदारात मोठी अस्वस्थता निर्माण झालेली आहे. आम्हाला खात्री आहे की, हे सरदार संताजी घोरपडे व त्याचा बंधू यांच्या मागून जाणार नाहीत. ते राजाराम महाराजांशीच एकनिष्ठ राहतील.... वरील वृत्तांतावरून आम्हास असे वाटते की, जिंजीतील वातावरण स्थिरस्थावर होण्यासाठी आणखी काही कालाचा अवधी लागेल.)*

## संताजीकडून राजाराम महाराज, धनाजी जाधव पराभूत : अमृतराव निंबाळकर ठार!

जिंजी दरबारात राजाराम महाराजांशी वितुष्ट येताच संताजी आपल्या फौजेसह बाहेर पडला. ही घटना मे १६९६ च्या अखेरीस अगर जूनच्या प्रारंभीस घडून आली असावी. यावेळी त्याच्याजवळ २० हजारांहून मोठी फौज होती, हे ध्यानी घेतले पाहिजे. अशी मोठी फौज एखाद्या बंडखोर सेनानीजवळ असणे म्हणजे राजाला मोठी धोकादायक गोष्ट होती. स्वाभाविकच संताजीच्या पारिपत्याचा विचार राजाराम महाराजांनी केला आणि ते धनाजी जाधव, अमृतराव निंबाळकर, हणमंतराव घोरपडे इत्यादी मराठा सरदारांसह संताजीशी लढाई देण्यासाठी जिंजीबाहेर पडले. भीमसेन सक्सेना म्हणतो की, संताजी हा स्वतंत्र होण्याच्या मार्गावर आहे, असे धनाजीने राजाराम महाराजांना भासविले आणि त्याच्याशी लढून त्यास ठार मारण्याची युक्ती त्यांना त्याने सांगितली.[१२]

कांचीपुरमजवळ आयेवारकुटी येथे मराठ्यांचे छत्रपती व सेनापती यांची ही अभूतपूर्व लढाई घडून आली! ही लढाई मोठी

---

१२. भीमसेन लिहितो, "संताजी घोरपडे व धनाजी जाधव यांच्यात पूर्वीपासून वैमनस्य होते. धनाजीने राजारामाला भासविले की, संताजाचा जोर खूप वाढला आहे. तो शूर आणि कुशल शिपाईगडी आहे. तो स्वतंत्र होण्याच्या विचारात आहे. त्याला ठार मारले पाहिजे." - मोगल आणि मराठे (तारिखे दिल्कुशा), पृ. १३१

धुमश्चक्रीची झाली असावी. तिच्यात राजाराम महाराजांचा पराभव होऊन ते संताजीचे कैदी बनले! धनाजी जाधवास रणांगणावरून पलायन करावे लागले आणि अमृतराव निंबाळकरास कैद होऊन हत्तीच्या पायी जावे लागले! दुसऱ्या दिवशी स्वतः संताजी आपले हात बांधून राजाराम महाराजांसमोर उभा राहिला. आपल्या हातून घडलेल्या अपराधाबद्दल क्षमायाचना करीत तो म्हणाला, "मी तुमचा सेवक आहे. तुम्ही धनाजीला माझ्या बरोबरीचा दर्जा देऊ इच्छित होता... म्हणून मला असे उद्धटपणे वागणे भाग पडले. आपण आता जी आज्ञा कराल त्याप्रमाणे मी वागेन"[१३] अशा प्रकारे छत्रपतींसमोर क्षमा मागून संताजीने त्यांना मुक्त केले आणि जिंजी किल्ल्यात सुखरूपपणे पोहोचविण्याची व्यवस्था केली- (जून १६९६).

भीमसेन सक्सेना हाही आपल्या ग्रंथात मराठ्यांच्या या यादवी लढाईची माहिती देतो : "राजाराम आणि धनाजी हे बरेच मोठे सैन्य घेऊन संताजीवर तुटून पडले. त्यांच्या सैन्याच्या आघाडीवर अमृतराव निंबाळकर हा अद्वितीय सेनानी होता; पण युद्धात अमृतराव हा संताजीच्या सैनिकांच्या हातून मारला गेला. उभय पक्षांचे वैमनस्य चालूच राहिले. राजाराम आणि धनाजी हे जिंजीच्या किल्ल्यात परतले. संताजी आपल्या देशाकडे परतला."[१४]

मराठी कागदपत्रांतही या अभूतपूर्व लढाईचे पडसाद उमटल्याचे दिसतात. या घटनेची नोंद घेताना जेधे शकावलीने म्हटले आहे : "चैत्र मासी राजारामाच्या दर्षणास संताजी घोरपडे चंदीस (जिंजीस) गेले. जेष्ट मासी (मे-जून) कची[१५] अलिकडेस भांडण जाले. धनाजी जाधव पलोन देशास आला. अमृतराव निंबाळकर पडिला. संताजीची फत्ते जाली.'[१६]

---

१३. मराठे व औरंगजेब (मासिरे आलमगिरी), पृ. ७१
१४. मोगल आणि मराठे (तारिखे दिल्कुशा), पृ. १३१
१५. कांचीपुरम
१६. शिवचरित्र प्रदीप, पृ. ३८

आणखी एका मराठी कागदात या लढाईचा महत्त्वपूर्ण उल्लेख आहे. हा कागद म्हणजे राजाराम महाराजांनी हणमंतराव घोरपडे यास या लढाईत पराक्रम केल्याबद्दल दोन गावांचे इनाम दिल्याची सनद आहे. त्यात राजाराम महाराज म्हणतात, "तुम्ही देशीहून कर्नाटक प्रांतास स्वामींच्या पायाशी एकनिष्ठता धरून स्वामीसन्निध आलेत. त्यावर आयेवारकुटीयाचे भांडणी आमृतराव निंबाळकर येही उडी टाकली. त्याबरोबर तुम्ही सेरीक होऊन ते प्रसंगी उडी टाकून तुम्ही शूरत्वाची सीमा केली. एकनिष्ठ सेवक. तुमचे चालवणे स्वामीस आगत्य."[१७]

दुसऱ्या एका मराठी सनदेत या लढाईत अमृतराव निंबाळकराबरोबर खटाव प्रांतातील तिमाजी घाटगे हा मराठा सरदार "स्वामिकार्यावर खर्च" झाल्याचा उल्लेख आहे.[१८]

मराठ्यांच्या सेनापतीचा खुद्द मराठ्यांच्या राजाशीच संघर्ष घडून आल्याने त्याचे पडसाद सर्व दक्षिणभर उमटणे स्वाभाविक होते. एवढेच नव्हे तर या पार्श्वभूमीवर संताजीबद्दल काही वदंताही निर्माण झाल्या. अशीच वदंता कर्नाटकातून पश्चिम किनाऱ्यावरील सुरतेपर्यंत येऊन थडकली होती. सुरतकर इंग्रज संताजीच्या या लढाईसंबंधाने काय लिहितात ते पाहा : "Rama Rajah is surprised by one of his Captains Santo Ghorpura and taken prisoner. It is said he designed to serve the Raja so; and they report likewise. Zulphikar Cawn offered him a vast reward in the King's (Aurangzeb's) name to surrender him up; and the King himself promised to make him a Barra Hazari Umrao; but some give out common danger hath united them again and Rama Rajah is set at liberty, which others contradrict. So that in his important affair there is nothing of certainty"[19] - (१८जुलै १६९६).

---

१७. सनदपत्रातील माहिती, पृ. १७८

१८. पेशवे दप्तर, खंड ३१, पृ. ७३

१९. श्री छत्रपति राजाराम महाराज, पृ. १९७

*(राजारामाशी झालेल्या लढाईत त्याचा एक सरदार संताजी घोरपडे याने त्याचा पराभव करून, एवढेच नव्हे तर त्यास कैद करून, सर्वांनाच धक्का दिला आहे. पण असे करण्यात राजाची सेवा करण्याचाच आपला उद्देश आहे, असे त्याने जाहीर केले आहे. तिकडे मोगल सेनापती जुल्फिकारखान याने राजारामाच्या मोबदल्यात संताजीस बादशहाच्या नावाने भले मोठे पारितोषिक देण्याचा प्रस्ताव पाठविला होता. एवढेच नव्हे खुद्द बादशहाने त्यास बारा हजारी उमराव करतो, म्हणून आश्वासन दिले होते; पण त्याचा काहीही उपयोग झाला नाही. औरंगजेबाच्या स्वारीच्या रूपाने उभे असलेल्या संकटाने मराठ्यांना पुन्हा एकदा एक केले आणि त्यातून राजाची मुक्तता केली गेली. अर्थात काहींना ही हकिकत खरी वाटत नाही. मात्र एक खरे की, या अत्यंत महत्त्वाच्या प्रकरणात निश्चितपणे काहीच सांगता येत नाही.)*

संताजीने राजाराम महाराजांना कैद केल्यानंतर त्यांना आपल्या ताब्यात द्यावे म्हणून जुल्फिकारखानाने बादशहाच्या वतीने मोठे इनाम देऊ केले; एवढेच नव्हे तर खुद्द बादशहाने संताजीस बारा हजारी उमराव करतो, म्हणून आश्वासन दिले; पण मोगली आक्रमणाच्या धोक्याने मराठ्यांना पुन्हा एक केले आणि राजाराम महाराजांना मुक्त केले गेले, ही सुरतकर इंग्रजांची बातमी सर्वस्वी ग्राह्य मानली, तर बादशाही मन्सबीच्या व इनामाच्या मोबदल्यात शत्रूच्या ताब्यात छत्रपतीस न देता त्यास सुखरूपपणे राजधानीत पोहोचविले, ही संताजीची मोठीच कामगिरी मानावी लागेल. स्वराज्यावर संताजीने केलेला हा महान उपकार मानावा लागेल. कारण यावेळी राजाराम महाराज मोगलांच्या ताब्यात गेले असते, तर मराठ्यांच्या स्वातंत्र्याचा लढाच संपुष्टात आला असता.

संताजी-राजाराम महाराज यांच्यामधील या लढाईसंबंधाने दोन महत्त्वाच्या बाबी नमूद करावयास हव्यात. पहिली बाब अशी की, राजाराम महाराज धनाजीसह संताजीवर चालून गेल्यावरच निरुपाय होऊन संताजीस धन्याशी लढावे लागले; त्यात राजाराम महाराजांचा पराभव झाला व ते संताजीच्या हाती सापडले, यात संताजीचा काही

अपराध नाही. लढाईत हार-जीत ही कोणाची तरी होणारच. दुसरी बाब अशी की, खुद्द छत्रपतींशी लढूनसुद्धा संताजी मोगलांना मिळालेला नाही. तो काळ असा होता की, मोठमोठे नामवंत मराठे सरदार आपल्या देशमुखीच्या वतनासाठी बिनदिक्कत मोगलांना जाऊन मिळत असत. क्षुद्र स्वार्थापोटी त्यांना स्वराज्यावरील प्रेम फिके वाटत असे. या पार्श्वभूमीवर संताजीचे हे कृत्य खास उल्लेखनीय व स्तुत्य वाटते.

## संताजी सेनापतिपदावरून दूर

संताजी-राजाराम महाराज यांची ही लढाई जून १६९६ मध्ये झाली. या पूर्वीच म्हणजे संताजी जिंजीतून बाहेर पडल्यावर लगेच तो सेनापतिपदावरून हटविला गेला असावा, हे उघड आहे. आयेवारकुटीच्या लढाईत संताजीकडे मोठी फौज असावी, म्हणूनच तो राजाराम व धनाजी यांचा पराभव करू शकला. अशा बंडखोर सेनानीकडे एवढी सेना असणे हे मोठे धोकादायक होते. ही सेना आपल्या बाजूला आणणे, हे आता राजाराम महाराजांसमोरचे सर्वांत महत्त्वाचे काम होते. त्याप्रमाणे महाराजांनी संताजीच्या फौजेतील बहुसंख्य सरदार व त्याचे सैन्य आपल्याकडे बोलावून घेतले. संताजीहून छत्रपतींचा अधिकार कितीतरी मोठा होता. स्वाभाविक छत्रपतींच्या आवाहनाला प्रतिसाद देऊन संताजीचे बहुसंख्य सहकारी त्याला सोडून गेले; स्वराज्याच्या हितसंवर्धनासाठी त्यांनी संताजीला सोडणे व राजाराम महाराजांच्या पायाशी रुजू होणे योग्य आणि आवश्यकही होते.

अशाच मकाजी देवकाते नावाच्या एका मराठी सरदाराच्या संदर्भात राजाराम महाराजांनी महाराष्ट्रातील रामचंद्रपंत अमात्य यास लिहिलेले एक पत्र उपलब्ध आहे. त्यात महाराज म्हणतात, "संताजी घोरपडे याणी स्वामीच्या पायासी हरामखोरी केली. याकरिता त्यास सेनापतिपणाचा कार्यभाग होता तो दूर करून फौज हुजूर आणविली. त्यावरून राजश्री मकाजी हटकरराऊ देवकाते हे आपल्या जमावनसी स्वामीसंनिध आले. येकनिष्ठपणे स्वामिसेवा करीत आहेती"[२०] - (२७ ऑक्टो. १६९६).

२०. पेशवे दप्तर, खंड ३१, पृ. ३२

संताजीने बंडखोरी केल्यामुळे त्याच्या हाताखालची फौज हुजूर आणविल्याचे राजाराम महाराजांनी येथे स्पष्ट म्हटले आहे. याचा परिणाम असा झाला की, संताजीच्या फौजेचे बळ दिवसेंदिवस कमी-कमी होत गेले; पण त्याही परिस्थितीत मराठी राज्याचा शत्रू जुल्फिकारखान याच्याशी कर्नाटकात संताजी लढाया देत राहिला.

## संताजीचा मोगलांशी शेवटचा संघर्ष

कर्नाटकातील मराठ्यांच्या वाढत्या दबावाखाली जुल्फिकारखानास जिंजीचा वेढा उठवावा लागला होता. मद्रास किनारपट्टीवरील वेलोर, वांदिवॉश, अर्काट अशा ठिकाणी तो मोठ्या बंदोबस्ताने छावणी करून राहत होता. सप्टेंबर १६९६ मध्ये तो अर्काट येथे छावणी करून होता. संताजी आपल्यावर चालून येत असल्याची बातमी त्यास मिळताच तो अर्काटमधून आपली फौज घेऊन बाहेर पडला; पण मार्गातच संताजीने त्याच्या फौजेची कोंडी केली. इतकी की, खानाच्या सैनिकांची उपासमार होऊ लागली. तेव्हा अर्काटमध्ये आपणास सुखरूप माघार घेऊ द्यावी, म्हणून खानाने संताजीकडे याचना केली. तेव्हा संताजीने त्याच्या माघारीस संमती दिली. त्याप्रमाणे खान अर्काटकडे कसाबसा परतला; पण मद्रासकर इंग्रजांच्या बातमीप्रमाणे संताजी पुन्हा अर्काटला वेढा घालण्याच्या विचारात दिसतो : "It is said Santogee is gathering all his men to besiege Arcott. If he bee in earnest they will probably bee too hard for the Moors (the Mughals) for they are five to one. But there hath hitherto seemd to be an understanding between the Nabob and Moratta and perhaps it will end onely in a Good Piscash"[21] - (३० सप्टें., १६९६).[२२] संताजीने जर मनावर घेतले तर मोगलांना आपले संरक्षण करणे अवघड होणार आहे; कारण मराठे-मोगल यांचे लष्करी बल पाचास एक अशा प्रमाणात आहे; पण मराठे व खान यांचे पूर्वीपासून आतून संगनमत

---

२१. Piscash : पेशकश - खंडणी

२२. Letters From Fort St. George, 1696, p. 91

असल्याने असे काही न होता हे प्रकरण खंडणीवर भागविले जाईल, असे इंग्रज म्हणतात. यावरून एक गोष्ट तरी स्पष्ट होते की, अद्यापि म्हणजे सप्टें., १६९६ पर्यंत तरी संताजीजवळ मोठी फौज होती. लवकरच म्हणजे ऑक्टोबरमध्ये मागे उल्लेखिलेल्या पत्राप्रमाणे[२३] ही फौज संताजीच्या हाताखालून काढून घेण्यात राजाराम महाराज यशस्वी झाले आणि संताजीची बाजू लंगडी पडली.

उपरिनिर्दिष्ट ३० सप्टें., १६९६ च्या पत्रात मद्रासकर इंग्रज संताजीच्या एकूण सैन्याची संख्या २५ हजार अशी देतात; पण पुढे १४ ऑक्टो., १६९६ च्या पत्रात तीच संख्या १२ हजार अशी देतात. प्रत्यक्षात ती १२ हजारांहून फारच कमी असावी. कारण येथून पुढे केवळ ५/६ हजार फौज असणाऱ्या जुल्फिकारखानाशी लढताना संताजीस शेवटी माघार घ्यावी लागली आहे. खानाशी त्याच्या अनेक चकमकी होऊन शेवटी त्यास पळ काढावा लागला, असे इंग्रज नमूद करतात. खान त्याचा पाठलाग करीत मद्रासच्या उत्तरेकडील पुलिकतपर्यंत (मद्रासपासून २५ मैल) येऊन पोहोचल्याचे ते १४ ऑक्टो. च्या पत्रात म्हणतात.[२४] पुढे २८ ऑक्टो. च्या पत्रात ते लिहितात की, संताजीचा पाठलाग करीत खान त्रिवेलोरच्या (अर्काटच्या ईशान्येस ४० मैल) उत्तरेस आला असून, संताजी मात्र कृष्णापट्टमपर्यंतचा (मद्रासच्या उत्तरेस ८० मैल) प्रदेश लुटीत गेला आहे; कृष्णापट्टम येथे त्याने ४२ हत्ती पकडले, खानाने मात्र त्याचा पुढे पाठलाग न करता काही दिवस त्रिवेलोरला मुक्काम केला आणि नंतर तो अर्काटला आपल्या तळाकडे परतला; संताजी आता तिरुपात्तूरला परतला असून, कावेरीपट्टणम येथील बादशाही खजिन्यावर डोळा ठेवून आहे.[२५]

खान अर्काटला जाताच संताजी पुन्हा त्या प्रदेशात परतला. उपरिनिर्दिष्ट पत्रात तो तिरुपात्तूरला म्हणजे अर्काटच्या नैऋत्येस ६०

२३. पेशवे दप्तर, खं. ३१, पृ. ६२

२४. Letters From Fort St. George, 1696, p. 100

२५. कित्ता, पृ. १०४

मैलांवर पोहोचल्याचे म्हटले आहे. कावेरीपट्टणम हे ठिकाण तिरुपात्तूरपासून पश्चिमेस २५ मैलांवर आहे; पण तिरुपात्तूर येथेही संताजी फार दिवस थांबल्याचे दिसत नाही. दिवसेंदिवस संख्याबलाने दुबळ्या होत जाणाऱ्या फौजेनिशी आता कर्नाटकसारख्या प्रांतात वावरणे धोक्याचे आहे, हे जाणून त्याने आता महाराष्ट्राचा रस्ता धरला. जाता जाता कडाप्पा या ठिकाणी बादशहाने खानाच्या लष्करासाठी पाठवून दिलेला खजिना आल्याची त्यास वार्ता समजली. म्हणून तो कडाप्पाच्या दिशेने वळला; पण जुल्फिकारखानास संताजीच्या हालचालीची बातमी समजताच तो अर्काटहून त्वरेने कडाप्पाकडे निघाला. तीन दिवसांची कूच केल्यावर खानास समजले की, संताजीने मार्ग बदलला आहे व कडाप्पा येथील खजिन्यास काही धोका नाही. तेव्हा तो पुन्हा अर्काटला परतला[२६] - (नोव्हेंबर १६९६).

संताजीने कडाप्पाचा रोख बदलून कडाप्पा व पेनुकोंडा यांच्या दरम्यानच्या प्रदेशातून तुंगभद्रेच्या दिशेने कूच केले होते. पेनुकोंड्यास शहाजादा बेदारबख्त छावणी करून होता. संताजी त्याच्या बाजूला येत असल्याची बातमी समजताच त्याने अर्काट मुक्कामी असणाऱ्या जुल्फिकारखानास तातडीने आपल्या कुमकेस येण्याविषयी निरोप पाठविला. त्याप्रमाणे खान आपली फौज घेऊन त्वरेने पेनुकोंड्यास गेला. भीमसेन लिहितो, "बादशहाचा नातू व शहाजादा आज्जम याचा मुलगा शहाजादा बेदारबख्त यांना गनिमांना तंबी देण्याच्या कामावर नेमण्यात आले होते. तो यावेळी पेनुकोंडा (बंगळूरच्या उत्तरेस ७५ मैल) येथे तळ देऊन होता. त्याने जुल्फिकारखानास कळविले की, गनिमांचा

२६. मद्रासकर इंग्रज आपल्या दि. २३ नोव्हें., १६९६ च्या Diary & Consultation Book मध्ये लिहितात : "The Spy Braminy advices from the camp that Zulphakar Cawn receiving intelligence of Santogee Gurporows marching with his Army towards Currapa (Cuddapah) where the Treasure which came from the King (Aurangzeb) for the payment of the Nobobs forces was Lodged, March'd three days journey with. his army to goe to their reliefe if assaulted, but receiveing advice that Santogee Gruporrow Marched another way, returned to Arcott." - DC, 1696, p. 142

मोड करण्यासाठी तुम्ही या. त्याप्रमाणे जुल्फिकारखानाने शहाजाद्याची भेट घेतली. तो आला असे पाहताच गनीम परागंदा झाले. यानंतर जुल्फिकारखानाने शहाजाद्याचा निरोप घेतला आणि तो अर्काटला परत आला."[२७]

शहाजादा बेदारबख्त व जुल्फिकारखान यांना वाटले असावे की, मोगलांच्या संयुक्त फौजेस घाबरून संताजीने मार्ग बदलला व तो परागंदा झाला; पण वस्तुस्थिती अशी होती की, संताजी आता त्यांच्याशी लढण्याच्या लष्करी आणि मानसिक स्थितीत नव्हता. त्याचे बरेच सहकारी त्यास सोडून गेलेले होते. उरलेले जाण्याच्या मार्गावर होते. अशा परिस्थितीत तो मोगलांशी संघर्ष टाळून महाराष्ट्राकडे निघाला होता; पण संताजीच्या दुर्दैवाला आता खरी सुरुवात झालेली होती. उत्तर कर्नाटकात विजापूरच्या बाजूने महाराष्ट्रात येत असता मागून त्वरेने येऊन धनाजी जाधवाने त्यास गाठले. संताजीच्या आयुष्यातील हा शेवटचा संघर्ष होता. दुर्दैवाने त्याचे पर्यावसान संताजीच्या खुनात झाले. त्याचा वृत्तांत आपण पुढील प्रकरणी पाहणार आहोत.

***

२७. मोगल व मराठे (तारिखे दिल्कुशा), पृ. १३०



# १०.
# संताजीचा खून : मराठेशाहीतील शोकांतिका

## खाफीखानाचे शिव्याशाप

संताजी दुर्दैवाच्या फेऱ्यात सापडून कर्नाटकातून महाराष्ट्रात येत असता त्याच्या मागावर मोगल शत्रू तर होतेच; पण स्वकीय शत्रूही होते. संताजीचा राजाराम महाराज व धनाजी जाधव यांसारख्या स्वकीयांशी झालेला संघर्ष व त्यातून पुढे घडून आलेला दुःखान्त शेवट ही घटनाच इतकी जबरदस्त होती की, तत्कालीन प्रत्येक इतिहासकाराला तिचे वर्णन करण्याचा मोह झाला होता. अर्थात सर्व इतिहासकारांची वर्णने सारखी नसणे स्वाभाविक होते. ज्याला जशी माहिती मिळाली तसे तो लिहीत गेला; पण लिहीत असतानासुद्धा खाफीखानासारखा शत्रूंचा इतिहासकार संताजीविषयीची द्वेषाची भावना त्याच्या मृत्यूनंतरही विसरला नव्हता, ही गोष्ट नमूद करण्यासारखी आहे.

खाफीखान म्हणतो, "संताजीचा मृत्यू ही या वर्षी बादशहाच्या नशिबाने एक चांगली घटना घडून आली. दुष्ट संताजीची पाळेमुळे खणून निघाली आणि तो नरकात प्रविष्ट झाला. त्या नालायक कुत्र्याच्या मारल्या जाण्याबद्दल भिन्नभिन्न हकिकती आहेत; पण त्यावेळी लष्करात हजर असलेल्या विश्वसनीय लोकांकडून जे ऐकण्यात आले ते लिहीत आहे."[१]

मोगलांशी लढत असताना संताजीने मोगली फौजांवर जे जबरदस्त आघात केले व नामांकित अशा मोगल सरदारांना मातीस मिळविले, त्या पार्श्वभूमीतून खाफीखानाचे हे विषारी फुत्कार निर्माण झाले आहेत, हे ध्यानी घेतले पाहिजेत. खाफीखानाचे सर्वांत जास्त शिव्याशाप संताजीच्या वाट्यास आले आहेत, कारण मोगलांची सर्वांत जास्त फटफजिती संताजीनेच केली होती; पण असा हा खाफीखान

१. मराठ्यांचे स्वातंत्र्ययुद्ध (तारिखे खाफीखान), पृ. ३६

संताजीच्या पराक्रमाचे न कळत वर्णन करून जातो, तेव्हा त्याची साक्ष संताजीच्या चरित्रास लाख मोलाची ठरते.

### गाजिउद्दीन फिरोजजंग पांढराफटक पडला!

संताजी कर्नाटकातून महाराष्ट्राकडे येत असल्याच्या बातम्या बादशाही छावणीत पोहोचल्या होत्या. संताजीस मार्गातच अडवून त्यास नेस्तनाबूद करण्यासाठी बादशहाने गाजिउद्दीनखान बहादूर फिरोजजंग[२] याची नेमणूक केलेली होती. गाजिउद्दीन फिरोजजंग हा मोगल दरबारातील एक प्रतिष्ठित, अनुभवी व पराक्रमी सरदार होता. या सुमारास तो विजापूरजवळ छावणी करून होता. संताजीही विजापूरच्या प्रदेशातूनच महाराष्ट्रात येत होता.

सर्जाखान, कासिमखान, खानाजादखान, हिंमतखान, जुल्फिकारखान इत्यादी नामांकित मोगल सरदारांची हैराणगत करणारा संताजी आपल्या छावणीच्या प्रदेशाजवळ आल्याचे समजताच गाजिउद्दीनखान फिरोजजंगची गाळण उडाली. संताजी कुठे दूरवरच्या प्रदेशात असता, तर त्याचा पाठलाग करण्यात खानास काही टंगळमंगळ करण्यास अवकाश होता; पण आता संताजी साक्षात त्याच्या प्रदेशातच हजर झाल्याने त्याची बेइज्जत होण्याचा बाका प्रसंग पुढे उभा राहिला होता. संताजीशी न लढता पुढे जावे, तर बादशाही दरबारात आपली बेअब्रू होईल, लढावयास जावे तर संताजी आपली धडगत ठेवणार नाही; बहुतेक आपण त्याच्या हातून मारले जाणार, या विचाराने खानाच्या मनावर जबरदस्त पगडा बसविला; पण या अडचणीवर मात करणारी एक पळवाट त्याने शोधून काढली. ती कशी ते खाफीखान म्हणतो, "दुष्ट संताजीचा उच्छाद कमालीचा वाढला, त्याचा व इतर शत्रूंचा पाडाव करण्यासाठी गाजिउद्दीनखान बहादूर फिरोजजंग हा विजापूरपासून चार-पाच मजलांवर मुक्काम करून होता... या सुमारास बातमी आली की, नालायक संताजी... आठ-नऊ कोसांवर आला आहे. भले भले

२. चीनकुलीजखान उर्फ निजामुल्मलक (हैद्राबाद संस्थानचा संस्थापक) याचा हा पिता. हा तुर्क होता. औरंगजेबही तुर्क असल्याने त्यास गाजिउद्दीन फिरोजजंगाबद्दल विशेष आस्था होती.

नामांकित वीर संताजीचे नाव ऐकताच घाबरून जात. त्यांचे अवसान गळून जाई. (संताजी आल्याची बातमी ऐकताच) गाजिउद्दीन याचा चेहरा पांढराफटक पडला. त्याच्यापाशी फौज थोडी होती. त्याने आपण संताजीवर चालून जातो, असा पुकारा केला. पुढील मजल नीट करून आपला गोट तिकडे हलविण्यासाठी त्याने एका अधिकाऱ्याची नेमणूक केली आणि त्याने स्वतः आडवाटेने विजापूरचा रस्ता धरला!"[३]

खाफीखानाने संताजीच्या विलक्षण दराऱ्याविषयी इतके स्पष्ट व स्वच्छ लिहिलेले आहे की, त्यावर जादा टीकाटिपणीची आवश्यकता नाही; पण गाजिउद्दीन फिरोजजंग हा मोठा सुदैवी होता. त्याला संताजीच्या भीतीने विजापुरात आश्रय घेण्याची यातायात करावी लागली नाही. विजापूरपासून आठ-नऊ कोसांवर असतानाच त्यास बातमी लागली की, संताजीचा काटा परस्पर निघाला आहे!

## धनाजी-हणमंतरावाकडून संताजी पराभूत

आयेवारकुटीच्या लढाईत संताजीच्या हातून सपाटून पराभव खाऊन धनाजीस जिंजीकडे पळून जावे लागले होते. लवकरच राजाराम महाराजही जिंजीत आले आणि संताजीच्या हाताखालची फौज आपल्याकडे आणण्यात ते यशस्वी झाले. अशा परिस्थितीत संताजीचा पाठलाग करून त्यास पराजित करणे ही गोष्ट आता सुलभ झाली होती. स्वाभाविक संताजी कर्नाटकातून महाराष्ट्राकडे मार्गस्थ होताच राजाराम महाराजांनी धनाजी व हणमंतराव निंबाळकर या दोघा सरदारांना त्याच्या पाठलागावर पाठविले. हणमंतराव हा अमृतराव निंबाळकराचा बंधू. संताजीच्या हातून अमृतरावाच्या झालेल्या हत्येने व्यथित होऊन सुडाच्या भावनेने स्वाभाविकपणेच तो पेटून उठलेला होता. धनाजीने हणमंतरावाच्या या भावनेचा पुरेपूर उपयोग करून घेतला. हणमंतरावास आपल्या फौजेच्या आघाडीवर ठेवून धनाजी झपाट्याने संताजीच्या पाठलागावर निघाला. कर्नाटक-महाराष्ट्राच्या सीमाप्रदेशात त्याने संताजीस गाठले. हणमंतरावाच्या आघाडीच्या

३. मराठ्यांचे स्वातंत्र्ययुद्ध (तारिखे खाफीखान), पृ. ३७

सैन्याने संताजीवर हल्ला चढविला. खाफीखान या लढाईचे वर्णन करताना म्हणतो, "हणमंतराव नावाचा एक प्रसिद्ध सरदार होता. त्याला धनाजीने इशारा दिला. संताजीचे सरदार धनाजीला मिळाले होतेच. (आता) हणमंतरावाने धनाजीच्या सूचनेप्रमाणे संताजीवर हल्ला केला. धनाजीची फौजही त्याच्याबरोबर होती. संताजीची फौज मोडली. त्याचे सामानसुमान बाजारबुणगेही लुटले गेले. त्याचे बरेच स्वार राऊत हणमंतरावाला येऊन मिळाले. संताजीची अनेक माणसे जखमी अगर मृत झाली. संताजी असहाय होऊन डोंगराळ भागात असलेल्या आपल्या घराकडे निघाला"[४] - (नोव्हें. - डिसेंबर १६९६).

संताजीची ही शेवटची लढाई. खरे म्हणजे त्याच्या जीवनाची शेवटची लढाई तो खेळत होता आणि आता तो पावला-पावलांवर हरत होता. त्याचे बहुतेक सहकारी त्यास सोडून गेले होते. फौज मोडली होती. सामानसुमान, बाजारबुणगे लुटले गेले होते. अशा स्थितीत काही जीवाभावाचे सहकारी व काही मोजके सैनिक यांच्यासह तो परत सातारा भागात आला.

### आजा गाजिउद्दीनखान फिरोजजंग संताजीच्या पाठलागावर

संताजीशी सामोरे जाऊन लढण्याचा प्रसंग तर आला नाहीच, उलट मराठ्यांच्या आपसातील यादवी युद्धामुळे त्याचा परस्पर काटा निघाला, ही वार्ता गाजिउद्दीनखान फिरोजजंगाच्या फौजेत येताच सर्वांना विलक्षण आनंद झाला. आता गाजिउद्दीनखान फिरोजजंग संताजीच्या पाठलागाची योजना आखू लागला. पाठलाग कसा करायचा याविषयी तो आपल्या सहकाऱ्यांशी सल्लामसलत करीत असतानाच त्यास बादशहाचा हुकूम हाती पडला. बादशहाने खानास लिहिले होते. "मराठे सरदारांच्या आपापसातील भांडणावरून असे दिसते की, दुष्ट संताजी लवकरच आपल्या कर्माची शिक्षा पावेल. तरी तुम्ही त्याचा पाठलाग करून त्या दुष्टाचा नाश करण्याचा प्रयत्न करा. म्हणजे त्याचे श्रेय तुम्हाला मिळून तुमचे नाव काळाच्या पानावर नोंदले जाईल आणि

---

४. कित्ता, पृ. ३७-३८

शत्रू एकत्र येऊ शकणार नाही."[५]

बादशाही हुकूम मिळताच गाजिउद्दीनखान फिरोजजंगाने आपली फौज घेऊन संताजीचा पाठलाग सुरू केला. जेधे शकावलीमधील या घटनेसंबंधीची नोंद कालदृष्ट्या अत्यंत महत्त्वाची आहे. त्यात म्हटले आहे की, चैत्र मासी म्हणजे मार्च-एप्रिल १६९७ मध्ये संताजी सातारा प्रदेशात आला आणि त्याचा पाठलाग करीत गाजिउद्दीन मागून आला.[६] गाजिउद्दीखान फिरोजजंगाच्या फौजेस बळकटी यावी म्हणून बादशहाने शहाजादा बेदारबख्त व हमीदुद्दीनखान यांच्या फौजेतील सैन्याच्या काही तुकड्या त्याच्याकडे पाठवून दिल्या. मतलबखान हा खास अंमलबजावणीचा अधिकारी म्हणून नेमला गेला होता.[७]

धनाजीने संताजीचा लढाईत पुरता मोड केला, तरी त्याने त्याचा पाठलाग सोडलेला नव्हता. म्हणजे एका बाजूने धनाजी तर दुसऱ्या बाजूने गाजिउद्दीनखान फिरोजजंग अशा प्रकारे संताजीची साताऱ्याच्या भागात कोंडी केली गेली. खाफीखान लिहितो, "एकीकडून बादशाही फौज आणि दुसरीकडून धनाजी जाधवाची फौज याप्रमाणे त्या सावजाला मृत्यूच्या जाळ्यात पकडण्यात आले. संताजीची फौज मोडली. त्याची व त्याच्या सैन्याची फारकत झाली."[८]

साताऱ्याच्या भागात संताजीच्या शेवटच्या चकमकी गाजिउद्दीनखान फिरोजजंग याच्याशी न होता त्या धनाजीशी झाल्या, असे दिसते. साकी मुस्तैदखान सांगतो, "त्या भागात संताजीची व धनाजीची गाठ पडून अनेक संघर्ष झाले. या खेपेस संताजीस दैव प्रतिकूल झाले. संताजीचा प्रचंड पराजय झाला. काही निवडक लोकांसह तो विपन्न अवस्थेत पळाला."[९] रियासतकार सरदेसाई यांनी

---

५. मराठ्यांचे स्वातंत्र्ययुद्ध (तारिखे खाफीखान), पृ. ३८
६. शिवचरित्र प्रदीप, पृ. ३९
७. मराठे व औरंगजेब (मासिरे आलमगिरी), पृ. ७२
८. मराठ्यांचे स्वातंत्र्ययुद्ध (तारिखे खाफीखान), पृ. ३८
९. मराठे व औरंगजेब (मासिरे आलमगिरी), पृ. ७२

म्हटले आहे की, धनाजीच्या लष्करातील हणमंतराव निंबाळकराची संताजीशी शेवटची चकमक सातान्याच्या प्रदेशातील दहिगावजवळ (अकलूजच्या पश्चिमेस १५ मैल) झाली[१०] - (एप्रिल १६९७).

## संताजीची स्वयमेव मृगेन्द्रता

स्वकीय आणि परकीय शत्रूंनी सभोवार मृत्यूचे जाळे टाकले असता आणि हे जाळे प्रत्यही आवळले जात असताही संताजीला आपल्या सेनापतित्वाचा विसर पडला नव्हता, हे विशेष होय. युद्धात हरलो म्हणून काय झाले? आपण स्वयंसिद्ध सेनापती आहोत, ही त्याची भावना त्यास अखेरपर्यंत सोडून गेलेली नव्हती. या संदर्भात या कालातील संताजीचे एक दुर्मीळ पत्र उपलब्ध आहे.

सातारा प्रांतात खटावजवळ वडगाव या गावी जयरामस्वामी[११] नावाचे एक मोठे सत्पुरुष शिवकालात होऊन गेले. त्या काळी लष्कराच्या हालचालींचा गावांना उपद्रव होत असे. सातारा प्रांतातील खटाव, कोरेगाव, रहिमतपूर, म्हसवड हा भाग मोगलांच्या अमलाखाली होता. या भागातील गावांचे संरक्षण करणे हे मोगलांचे कर्तव्य होते व या गावातून सक्तीने महसूल गोळा करणे, हे मराठ्यांचे युद्धकर्तव्य होते. अशा परिस्थितीत जयरामस्वामींच्या समाधीच्या गावी आपल्या लष्कराने (मराठा) कोणत्याही प्रकारचा त्रास देऊ नये, म्हणून संताजीने मराठी लष्कराला उद्देशून एक हुकूमवजा पत्र दिलेले आहे. ते असे-

॥ श्री शंकर ॥

जयराम स्वामी

राजश्री पागा व सिलेदार गोसावी यांसी अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य श्रे॥ संताजी घोरपडे जफुतन मुलूक[१२] जोहार. सु॥ सबा तिसैन अलफ. मौजे वडगाऊ ता. निंबसोडी हा गाव राजश्री (जयरामस्वामी)

१०. स्थिरबुद्धि राजाराम, ८३

११. शिवकालीन सत्पुरुष : स. १५९९-१६७२. यांची समाधी वडगावास असून पश्चिम महाराष्ट्रात प्रसिद्ध आहे.

१२. जप्तन मुलूख ही संताजीची पदवी : प्रदेश जिंकणारा

यांचा आहे, तरी तुम्ही या गावाच्या वाटे नव जाणे. गेलिया तुमचा मुलाहिजा होणार नाही. यैसे खरे समजोन या गावाचे वाटे नव जाणे. जाणिजे. छ १८ रमजान" - (१ एप्रिल, १६९७).[१३]

सुमारे वर्षापूर्वीच राजाराम महाराजांनी संताजीचे सेनापतिपद काढून घेतले होते; पण संताजीला त्याची पर्वा नव्हती. आपले सेनापतिपदाशी जडलेले नाते अतूट आहे, या भावनेतूनच संताजीने आपल्या नावामागे उपरिनिर्दिष्ट पत्रात सेनापती ही पदवी लावली आहे. काही व्यक्ती आपल्या कर्तृत्वाने मोठ्या होतात आणि मग त्यांचे पतन झाले तरी त्या आपले मोठेपण प्राणापलीकडे जपण्याचा प्रयत्न करतात. सम्राट नेपोलियन वॉटर्लूवर पराभूत झाला आणि इंग्रजांनी त्यास सेंट हेलना बेटावर विजनवासात धाडले; पण इंग्रजांच्या कैदेत असताही सम्राट नेपोलियनला त्याच्या मोठेपणाची जाणीव सोडून गेलेली नव्हती. क्षुद्र मनाचे इंग्रज अधिकारी त्यास 'जनरल नेपोलियन' म्हणून संबोधित; पण स्वाभिमानी नेपोलियन मात्र स्वतःला स्वयंसिद्ध सम्राट समजत असे.

महाराणा प्रताप, शिवछत्रपती, संताजी घोरपडे, सम्राट नेपोलियन यांसारख्या इतिहासातील महान व्यक्तींच्या स्वयंभू कर्तबगारीकडे पाहिल्यानंतर संस्कृतमधील एका सुभाषिताची आठवण झाल्याशिवाय राहत नाही.

नाभिषेको न संस्कारो सिंहस्य क्रियते मृगैः।
विक्रमार्जितसत्त्वस्य स्वयमेव मृगेन्द्रता॥

(वनातील मृगांकडून सिंहाचा कोणताही औपचारिक संस्कार अगर अभिषेक केला जात नाही. स्वसामर्थ्याने प्राप्त केलेल्या त्याच्या स्थानामुळेच त्याला राजेपण प्राप्त झालेले असते.)

पण काही प्रसंगी जेव्हा अशा वनराजाला दैवगतीने अधोगती प्राप्त होते तेव्हा त्याची अवस्था पिंजऱ्यात सापडलेल्या अन्य प्राण्यांसारखीच बनते. संताजीची अवस्था अशा पिंजऱ्यात अडकलेल्या वनराजासारखी झालेली होती.

---

१३. भा. इ. सं. मं., वार्षिक इतिवृत्त, शके १८३७, पृ. ३१४

## शंभुमहादेवाचा डोंगर : संताजीचे आश्रयस्थान

साताऱ्याच्या प्रदेशात पश्चिम बाजूवर सह्याद्रीच्या उंच उंच पर्वत रांगा आहेत. सातारा किल्ला हा अशाच एका पर्वत रांगेवर उभा आहे; पण सह्याद्रीशिवाय या प्रदेशात अनेक लहान-मोठ्या डोंगररांगा आहेत. त्यापैकी वाई-साताऱ्याच्या पूर्वेस व फलटणच्या दक्षिणेस पूर्व-पश्चिम पसरलेली एक मोठी डोंगररांग आहे. तिला शंभुमहादेवाचा डोंगर असे म्हणतात. हा डोंगर खंडाळ्यापासून सुरू होतो व तसाच सोलापूर जिल्ह्यात जातो. या डोंगराच्या एका रांगेत उंच ठिकाणी शिखरशिंगणापूर हे शंभुमहादेवाचे तीर्थक्षेत्र आहे. या देवाच्या नावावरून या डोंगरास शंभुमहादेवाचा डोंगर असे म्हटले जाते. पंढरपूर, तुळजापूर, वाडी, रत्नागिरी (कोल्हापूरजवळचा जोतिबा) यांसारखे हे महाराष्ट्रातील बहुजन समाजाचे मोठे श्रद्धास्थान आहे. छत्रपती घराण्याचीही या देवावर मोठी श्रद्धा होती.

शंभुमहादेवाच्या डोंगराच्या पठारावरून माण नदी उगम पावते. तिच्या काठी दहीवडी, म्हसवड ही मोठी गावे वसली असून, तिच्या प्रदेशाला माणदेश असे म्हटले जाते. राजाराम महाराजांच्या कारकिर्दीत या शंभुमहादेवाच्या डोंगरास मोठे महत्त्व प्राप्त झाले. कारण संताजी, धनाजी इत्यादी मराठा सरदारांच्या फौजा शत्रूच्या प्रदेशात मोहिमेवर जाण्यापूर्वी येथेच छावणी करून राहत असत. शिखरशिंगणापूरच्या महादेवास साकडे घालून संताजी-धनाजी यांनी अनेक वेळा येथूनच शत्रूंच्या प्रदेशांवर प्रहार करण्यासाठी कूच केले होते. मराठी फौजांचा माग काढीत अनेक वेळा मोगली फौजा या प्रदेशात येत असत आणि मग कित्येक दिवस धावपळीच्या लढाया घडून येत. मराठ्यांची ही मायभूमीच असल्याने त्यांना या डोंगराळ प्रदेशाच्या भौगोलिक ज्ञानाचा गनिमी युद्धासाठी मोलाचा उपयोग होई. संताजीने आतापर्यंत ज्या शंभुमहादेवाच्या डोंगरातच मोठमोठ्या मोहिमांचे मनसुबे रचले होते, त्याच ठिकाणी तो आता शेवटी असहाय अवस्थेत आश्रयासाठी आला होता. शंभुमहादेवाचा डोंगर आपणास दगा देणार नाही, असा त्याला विश्वास वाटत होता; पण निसर्गापेक्षा माणसेच अधिक दगलबाज

असतात, हे तो विसरला होता.

संताजीने शंभुमहादेवाच्या डोंगरात ज्या ठिकाणी आश्रय घेतला होता, ते ठिकाण म्हसवडच्या उत्तरेस[१४] सुमारे १०/१२ मैलांवर आहे. हा प्रदेशच मुळात कमी पावसाचा असल्याने डोंगररांगा उघड्याबोडक्या बनल्या आहेत. त्यातच आजूबाजूच्या विस्तीर्ण नापीक माळरानांनी प्रदेश अधिक रूक्ष व ओसाड बनला आहे. शिवकालात या डोंगरदऱ्यांत काही झाडी असावी. आज ती अभावानेच दिसते.

महादेवाच्या डोंगरातील संताजीच्या एकेकाळच्या निवासस्थानाकडे पोहोचण्यासाठी दोन-तीन मैल डोंगरदऱ्यांतून पायी बिकट वाटेने प्रवास करावा लागतो. संताजीचे राहण्याचे ठिकाण म्हणून जवळजवळ असणाऱ्या दोन गुहा दाखविल्या जातात. आज गुहांच्या तोंडावर बरीच पडझड होऊन मातीचा ढिगारा साचला आहे; पण त्या कालात त्या राहण्यायोग्य असणार हे उघड आहे. सभोवतालच्या उंच डोंगरदऱ्या यांनी या निवासस्थानास नैसर्गिक संरक्षण दिलेले आहे. त्या भागातील माहीतगार माणसाशिवाय संताजीच्या या निवासस्थानाची माहिती बाहेर पडणे अवघड होते.

## संताजीच्या खुनाचे ठिकाण

संताजी या गुहांसमोर मारला गेला नाही. त्याच्या खुनाची जागा गुहांपासून सुमारे दोन फर्लांग दूर आहे. त्या ठिकाणी जाण्यासाठी गुहांसमोरच्या दरीतूनच वळसे घेत जावे लागते. गुहांसमोरून वाहणारा दरीतील ओढाच तेथे जातो. या ओढ्यात स्नान करीत असता शत्रूने अचानक हल्ला करून त्यास ठार मारले. शिवकालात या ठिकाणी बोरी-करवंदीच्या दाट जाळ्या असाव्यात. या जाळ्यांसमोर ओढ्यात संताजी मारला गेला म्हणून आजही हे ठिकाण 'संताजी बावाची जाळी' म्हणून ओळखले जाते.

संताजीच्या गुहांसमोरूनच ओढा वाहत असता तो इतक्या दूरवर स्नानासाठी का गेला असावा, असा प्रश्न साहजिकच उत्पन्न होतो;

१४. म्हसवड : साताऱ्याच्या पूर्वेस ५० मैलांवर

पण स्थानिक मंडळींनी या शंकेचे केलेले निरसन विचारात घेण्यासारखे आहे. संताजीच्या गुहांसमोरच्या ओढ्यात उभे राहिले असता स्नानानंतर सूर्याला अर्घ्य द्यायचे म्हटले, तर सूर्योदय झाल्यानंतरही समोरच्या उंच डोंगरांमुळे दीड दोन तास सूर्यदर्शन होऊ शकत नाही. याउलट उपरोक्त बावाच्या जाळीच्या ठिकाणी पूर्वेकडील डोंगर बसका आहे. तेथे सूर्योदयानंतर सूर्यदर्शन लवकर होऊ शकते. केवळ याच कारणासाठी संताजी गुहांपासून इतक्या दूर अंतरावर स्नानासाठी आला असावा.

## नागोजी माने याचे राजकीय चरित्र

संताजीचा खून स्वकीयांपैकी ज्या नागोजी माने याने केला, त्याचे राजकीय चरित्र आणि चारित्र्य यांची माहिती करून घेणे आवश्यक आहे. नागोजी हा म्हसवडचा देशमुख. साताऱ्याच्या प्रदेशातील हे शिवकालातील एक प्रतिष्ठित व घरंदाज मराठे घराणे. आदिलशाही दरबारचे ते एकनिष्ठ सेवक होते. शिवकालात आदिलशाही दरबारच्या वतीने शिवाजी महाराजांच्या सत्तेला पायबंद घालण्यासाठी साताऱ्याच्या प्रदेशात म्हसवडकर मान्यांची स्थापना आदिलशहाने केलेली होती. स. १६६५ सालच्या मिर्झा राजा जयसिंगाच्या विजापुरावरील स्वारीत नागोजीचा पिता रतोजी माने याने आदिलशाही सेनापती सर्जाखान याच्या लष्करात राहून मोठा पराक्रम केल्याचे म्हसवडकर मान्यांच्या कागदपत्रांत नमूद आहे. रतोजीच्या या पराक्रमावर खूश होऊन आदिलशहाने त्यास अनेक गावांची देशमुखी व सरदेशमुखीची वतने बहाल केली होती.[१५]

शिवकालात ही सरदार-वतनदार मंडळी रक्ताच्या नात्याने एकमेकांशी बांधली गेली असत. नागोजीस प्रसिद्ध निंबाळकर घराण्यातील अमृतराव व हणमंतराव निंबाळकर यांची बहीण राधाबाई ही दिलेली होती. नागोजी हा आपल्या पित्याप्रमाणे किंबहुना त्याच्याहून अधिक पराक्रमी निघाला; पण तो नुसता पराक्रमी सेनानी नव्हता, तर तो राजकीय डावपेच खेळणारा राजकारणी सरदार होता. आपल्या

---

१५. Records of Shivaji Period, pp. 123-125, 134-135

पित्याप्रमाणे तो आदिलशाही दरबारशी एकनिष्ठ राहिला, असे वाटत नाही. आदिलशाही बुडण्यापूर्वीच स. १६७८ साली त्याने मोगलाकडे संधान बांधले होते.[१६] पण तो लगेच मोगली चाकरीत गेला नाही. पुढे लवकरच औरंगजेब बादशहा दक्षिणेत आला. संभाजी राजांशी संघर्ष केल्यानंतर काही कालाने तो विजापूर जिंकण्यासाठी वळला. एप्रिल १६८५ मध्ये विजापूरला मोगलांनी वेढा दिला. विजापूर जिंकून घेण्याचा बादशहाचा निर्धार पक्का होता. तेव्हा विजापूर पडल्यावर मोगलांना मिळण्यापेक्षा तत्पूर्वीच त्यांना मिळावे असा राजकारणी विचार करून नागोजीने मार्च १६८५ मध्येच मोगलांची चाकरी स्वीकारली. बादशहाने त्यास म्हसवड परगण्यात १३ लक्ष ५० हजार दामांची[१७] जहागीर बहाल केली, तसेच त्यास म्हसवडची ठाणेदारीही दिली गेली[१८] (१० मार्च, १६८५).

आदिलशाही आता बुडणार हे लक्षात येताच चाणाक्ष नागोजीने परिस्थितीचा अंदाज घेऊन तत्पूर्वीच मोगलांची चाकरी स्वीकारली. पुढे लवकरच सप्टें. १६८६ मध्ये आदिलशाहीचा अवतार समाप्त झाला. त्यानंतर गोवळकोंड्याची कुतुबशाही घेतली गेली. मोगली फौजा मराठी राज्यात सर्व बाजूंनी हल्ला करू लागल्या. अशा संकटकालात खुद्द छत्रपती संभाजी महाराजच मोगलांच्या हाती सापडले आणि त्यांची क्रूरपणे हत्या करण्यात आली. त्यानंतर स्वराज्यातील ठाणी व किल्ले एकामागून एक याप्रमाणे मोगलांच्या ताब्यात आले. अनेक सरदार-वतनदारांचा धीर खचून गेला. त्यांच्यापैकी बहुतेकांनी स्वार्थापोटी अथवा परिस्थितीच्या दबावाखाली मोगलांपुढे शरणागती स्वीकारून मोगली चाकरी स्वीकारली. नागोजी तर यापूर्वीच मोगलांना मिळाला होता. आता त्याच्यात व या वतनदारांत फारसा फरक राहिलेला नव्हता.

पण अशाही परिस्थितीत मोगलांना न मिळालेली रामचंद्रपंत,

---

१६. Records of Shivaji Period, P. 136

१७. दाम : तांब्याचे एक नाणे. औरंगजेबाच्या कालात १ रुपयास ४६ दाम असे विनिमयाचे प्रमाण होते.

१८. Records of Shivaji Period, p. 137

संताजी, धनाजी यांसारखी काही जिद्दीची मंडळी होती. ती नव्या छत्रपतीभोवती जमली आणि त्यांनी मोडलेले स्वराज्य सावरले. मराठे गेलेली ठाणी व किल्ले परत जिंकू लागले. मोगली फौजा पराभूत होऊ लागल्या. स्वराज्य नष्ट न होता पुन्हा जोमाने वाढत आहे, हे लक्षात येताच मोगलांना मिळालेले सरदार-वतनदार आता 'स्वगृही' परतू लागले. राजाराम महाराजांनीही त्यांच्या पूर्वीच्या अपराधांकडे दुर्लक्ष करून त्यांना स्वराज्य रक्षणाच्या कार्यास जुंपले. यावेळी मोगलांना सोडून स्वराज्यात येण्याची एक लाटच निर्माण झाली होती. या लाटेचाच एक भाग म्हणजे जिंजीच्या समोर प्रत्यक्ष जुल्फिकारखानाच्या फौजेत मोर्चे बांधून बसलेले नेमाजी शिंदे, माणकोजी पांढरे व नागोजी माने हे तीन पराक्रमी सरदार मोगलांना पारखे होऊन जिंजीत राजाराम महाराजांच्या पायाशी रुजू झाले! - (नोव्हें. १६९०).[१९] अर्थात स्वराज्यात येत असता या सरदारांना त्यांची पूर्वीची वतने तर परत दिली गेलीच शिवाय काही नवीन वतने, इनामे, जहागीर अशीही बक्षिसे राजाराम महाराजांनी बहाल केली.

१२ एप्रिल, १६९१ रोजी राजाराम महाराजांनी असेच एक बारा महालांच्या सरदेशमुखीचे वतन नागोजी मान्यास बहाल केलेले दिसते. सरदेशमुखीच्या सनदेत राजाराम महाराज म्हणतात, "तुम्ही पूर्वी तांब्राकडे (मोगलांकडे) होतेत ऐसियासी स्वामीचे राज्य म्हणजे देवता भूमी. या राज्यास तांब्राचा उपद्रव न व्हावा, मराठ धर्म राहावा, स्वामीच्या राज्याची अभिवृद्धी व्हावी या उद्देशे स्वामीच्या पायापासी येकनिष्ठाता धरून कर्नाटकात चंदीचे (जिंजीच्या) मुक्कामी स्वामीपाशी आलेती, येऊन विनंती केली की, आपणास देश्यात सरदेशमुखीचे वतन करून दिल्हे पाहिजे. ते बितपसील (यापुढे बारा महालांची नावे दिली आहेत.)... एकूण माहाल बारा. १२ माहालाचे वतन करून द्यावयासी आज्ञापत्र देविले पाहिजे म्हणोन विदित केले. ऐसीयासी तुम्ही स्वामी सेवेवरी येक चित्ते वर्तत आहा. तुम्हावर स्वामी कृपाळू होऊन नूतन वतन

---

१९. शिवचरित्र प्रदीप, पृ. ३५ - ३६

सरदेशमुखीचे वतन सदरहू बारा माहालांचे करून दिल्हे असे..."[२०]
मोगलांची चाकरी सोडून स्वराज्यात आल्यावर नोगजीने राजाराम महाराजांकडून १२ महालांची ही सरदेशमुखी घेतली, यात काही वावगे केले, असे नाही. त्या कालात सर्वच वतनदारांना पूर्वी शिवाजी महाराजांनी जप्त केलेली वतने परत करण्यात आली. एवढेच नव्हे तर त्यांच्यापैकी नागोजीसारखे जे पराक्रमी वतनदार होते त्यांना नूतन वतने बहाल केली गेली.

नागोजीची आणखी एक कामगिरी नमूद केली पाहिजे. ती म्हणजे मोगलांच्या चाकरीत गेलेल्या अनेक मराठा सरदारांना त्याने स्वराज्यात आणले. हणमंतराव घोरपडे वजारतमाब व कृष्णाजी घोरपडे हे मोगलांकडे होते. स. १६९१ साली ते नागोजीच्या मध्यस्थीने राजाराम महाराजांकडे आले. ४ जून १६९१ रोजी राजाराम महाराजांनी हणमंतराव घोरपड्यास जी सनद दिली आहे, त्यात म्हटले आहे, "तुमचे विशई राजश्री नागोजी माने यानेही विनंती केली (की) तुमचा मुदा स्वामीच्या राज्यात यावयाचा आहे. स्वामीने त्याजयोग्य भाग्य दिधलिया त्या प्रांती राजश्री रामचंद्रपंडित अमात्य याजकडे येतील. म्हणौन विदित केले. त्यावरून तुमचा मनोदये कलला की महाराष्ट्र धर्म पूर्ण रक्षावा... (वगैरे)"[२१]

नागोजी माने म्हणजे काही सामान्य वतनदार नव्हता. तो फौजबंद पराक्रमी व कर्तबगार सेनानीही होता. जिंजीला वेढा घालून बसलेल्या मोगली लष्कराशी लढताना त्याने मोठी तलवार गाजविली. खुद्द छत्रपती त्याजवर इतके प्रसन्न झाले होते की, त्यांनी त्यास नांदेड-औरंगाबादेपासून वऱ्हाडपर्यंतचा मुलूख जिंकण्याचा स्वतंत्र कार्यभाग सांगितला होता. १८ मार्च, १६९३ रोजी राजाराम महाराजांनी रामचंद्रपंतास लिहिलेल्या एका पत्रात नागोजीचा मोठा गौरव केला असून, त्याच्यावर सोपविलेल्या या उपरिनिर्दिष्ट कामगिरीचा उल्लेख

---

२०. Records of Shivaji Period, p. 144

२१. शिवचरित्र साहित्य, खं. ५, पृ. १०

केलेला आहे. महाराज म्हणतात, "राजश्री नागोजी माने याणी स्वामीच्या राज्याकारणे बहुत श्रम करून गनिमास पराभवाते पावविला. स्वामीस संतोशी केले. याकरिता याजवरी स्वामी अतिशयेसी कृपा करून याचे चालवीत आहेत. यैशास हे थोरा करिनियाचे कार्यकर्ते याला स्वतंत्र कार्यभाग सांगितलियाने बहुत थोर कार्य करून देतील. मामला थाटितील. यैसे जाणोन सरकार नांदेड व औरंगाबाद तहद वराडपावेतो नामजाद सुभा सांगोन पाठविले आहे, तरी हे त्या प्रांते जमावानशी जाऊनु प्रांत कबज करतील व कितेक देशात खंडणिया घेतील आणि काही जमाव पोख्ता करून गनिमास गर्देस मेलवितील. स्वामींचे राज्य वृधीस पावऊन आपलाही नामोश (कीर्ती) करून घेतील..."[२२] नागोजीस "थोरा करिनियाचे कार्यकर्ते" गौरवून राजाराम महाराजांनी या पराक्रमी पुरुषापासून किती मोठ्या कामगिरीची उमेद बाळगली होती, हेच या पत्रावरून स्पष्ट होते.

नागोजीप्रमाणे त्याचा पुत्र सिधोजी हाही शूर होता. या दोघा पिता-पुत्राबद्दल राजाराम महाराजांनी आपल्या अनेक पत्रांत मोठ्या आस्थेने लिहिले आहे. स. १६९५-९६ पर्यंत नागोजी राजाराम महाराजांशी पूर्णपणे एकनिष्ठ राहिलेला दिसतो; पण नंतर त्याच्या मनात चलबिचल निर्माण होऊन तो पुन्हा मोगलांशी आतून संधान बांधण्याच्या प्रयत्नात लागल्याचे दिसून येते. संताजीच्या खुनाच्या सुमारासच तर मोगलांची कृपा संपादन करण्यासाठी त्याचा पत्रव्यवहारही चालत होता. त्याची चर्चा पुढे येईलच.

## संताजीच्या खुनाच्या निरनिराळ्या हकिकती

शेकडो लढाया गाजविणाऱ्यास व अनेक नामांकित मोगल सरदारांना धुळीस मिळविणाऱ्या संताजीचा शेवटी पराभव होऊन असहाय अवस्थेत अंत झाला. ही घटना समस्त मोगलांना सुटकेचा निःश्वास टाकावयास लावणारी होती. स्वाभाविकच अशा खळबळजनक घटनेबद्दल निरनिराळ्या हकिकती व आख्यायिका सर्वत्र प्रसृत झाल्यास

२२. शिवचरित्र साहित्य, खं. ५, ले. ८४६

नवल नव्हते. त्या सर्वांमधून ऐतिहासिक सत्याचा मागोवा घेणे, ही अभ्यासकाच्या दृष्टीने कठीण कामगिरी आहे. तथापि सुदैवाने या संदर्भात तत्कालीन अस्सल कागदपत्रे आपल्या साहाय्याला येत असल्याने ऐतिहासिक सत्याच्या जवळ पोहोचणे शक्य होते आहे.

तत्कालीन इतिहास - लेखकांमधील खाफीखान, साकी मुस्तैदखान व भीमसेन सक्सेना या तिघांनीही संताजीच्या मृत्यूविषयी हकिकती दिल्या आहेत. त्या जशा त्यांच्या कानावर आल्या तशा त्यांनी निवेदन केलेल्या होत्या. या तिघांपैकी खाफीखान थोडी सविस्तर माहिती देतो :

"नागो म्यान (माने) नावाचा एक मोठा सरदार होता. काही दिवस बादशहाच्या चाकरीत राहून तो परत आपल्या लोकांकडे गेला होता. तो त्या भागातच राहत होता. काही वर्षांपूर्वी संताजीने त्याच्या भावाला (येथे मेव्हण्यास असे पाहिजे) हत्तीच्या पायी दिले होते. त्यामुळे संताजी आणि नागोजी यांच्यात भयंकर हाडवैर होते. त्यात नागोजीच्या बायकोने (राधाबाईने) त्याला साथ दिली. त्याने आपल्या माणसांना बरोबर घेऊन संताजीचा पाठलाग केला. तो त्याच्या ठिकाणावर पोहोचला त्यावेळी थकून आणि असहाय बनून संताजी एका ओढ्यावर आंघोळ करीत होता. त्याने गाफील संताजीवर हल्ला करून त्याला ठार मारले आणि त्याचे डोके कापून एका तोबऱ्यात घातले. त्याने तो तोबरा घोड्याला बांधला. आपल्या बायकोपाशी किंवा काहींच्या मते धनाजी जाधवापाशी तो ते डोके घेऊन निघाला. वाटते तोबरा निसटून जमिनीवर पडला. फिरोजजंगाचे (गाजिउद्दीन फिरोजजंगाचे) स्वार आणि हरकारे (हेर) संताजीचा पाठलाग करीत त्या डोंगराळ भागात फिरत होते. संताजीचे डोके असलेला तोबरा त्यांच्या हाती पडला. त्यांनी संताजीचे शिर ओळखले. लुत्फुल्लाखान हा फिरोजजंगाच्या आघाडीच्या तुकडीवर होता. संताजीचे डोके त्याच्याकडे नेण्यात आले. लुत्फुल्लाखानाने ते फिरोजजंगाकडे आणले. परमेश्वरानेच ही फत्ते आपणास दिली म्हणून ते परस्परांचे अभिनंदन करू लागले. आनंदसूचक नगारे वाजविण्यात आले."

"नंतर ख्वाजा बाबा तुराणी याजबरोबर संताजीचे डोके बादशहाकडे पाठविण्यात आले. बादशहाने त्या काफराचे डोके नजरेखाली घातले. परमेश्वराकडून ही देणगी मिळाल्याबद्दल बादशहाने त्याचे आभार मानले. नगारेनौबती वाजविण्याची त्याने आज्ञा केली. ख्वाजाबाबाला खुशखबरखान अशी पदवी देण्यात आली. बादशहाने आज्ञा केली की, संताजीचे डोके लष्करातून व दक्षिणेच्या काही शहरांतून मिरवावे.

या प्रकरणाबद्दल इतरही काही आख्यायिका आहेत. खरे काय ते परमेश्वर जाणे!"[२३]

संताजीस मारल्यानंतर त्याचे डोके तोबऱ्यात घालून नागोजी निघाला; पण वाटेत तोबरा निसटून खाली पडला व संताजीचे डोके लुत्फुल्लाखानाच्या हाती पडले, ही खाफीखानाच्या कानावर आलेली एक आख्यायिका होती; पण त्यात फारसे तथ्य आहे, असे नाही. याचे कारण नागोजीसारखा एक हुशार सेनानी एवढा गलथानपणा दाखवील, असे वाटत नाही. तथापि खाफीखानाच्या वृत्तांतातून काही महत्त्वाच्या बाबी स्पष्ट होतात-

१. नागोजीने हे कृत्य मेहुण्याच्या वधाच्या सुडाच्या भावनेने प्रेरित होऊन केले. या कामी त्याची बायको राधाबाई हिची त्याला साथ मिळाली.

२. संताजी गाफील स्थितीत ओढ्यावर अंघोळ करीत असता नागोजीने त्याच्यावर हल्ला करून त्यास ठार केले.

३. शंभुमहादेवाच्या डोंगराच्या परिसरात यावेळी गाजिउद्दीनखान फिरोजजंगाची माणसे संताजीच्या मागावर होती. फिरोजजंगाच्या लष्कराच्या आघाडीवर असलेल्या लुत्फुल्लाखान या सरदाराच्या हाती संताजीचे डोके आले, त्याने ते फिरोजजंगाकडे व फिरोजजंगाने ते बादशहाकडे पाठविले.

४. संताजीचे डोके पाहून बादशहास इतका आनंद झाला की,

२३. मराठ्यांचे स्वातंत्र्ययुद्ध (तारिखे खाफीखान), पृ. ३८-३९

त्याने परमेश्वराचे आभार मानून ही बातमी आणणाऱ्या ख्वाजाबाबास खुशखबरखान ही पदवी दिली.

५. बादशाही आज्ञेने संताजीचे डोके बादशाही छावणीतून व दक्षिणेतील प्रमुख नगरांतून मिरविण्यात आले.

आता औरंगजेबाचा दुसरा चरित्रकार साकी मुस्तैदखान संताजीच्या मृत्यूबद्दल काय हकिकत सांगतो ते पाहू : "(धनाजीशी संघर्ष झाल्यानंतर) संताजी नागोजी माने याच्या गावी पोहोचला. नागोजीने त्याला आश्रय दिला; पण त्याने नागोजीच्या मेव्हण्याचा वध केला होता. म्हणून नागोजीच्या बायकोने आणि तिच्या दुसऱ्या भावाने ठरविले की, संताजीला जिवंत म्हणून सोडावयाचे नाही. नागोजीने संताजीस उदार मनाने निरोप दिला; पण त्याची बायको व तिचा भाऊ हे त्याचा पाठलाग करून त्याचा निकाल लावण्याची संधी पाहत होते."

"पुढे काय घडले याबद्दल मतभेद आहेत. एक मत असे आहे की, तो (संताजी) खान फिरोजजंगाच्या हाती सापडला आणि त्याला ठार मारण्यात आले. दुसरे मत असे आहे की, त्याच्या दावेदारांनी त्यास ठार मारले. संताजीचे डोके फिरोजजंगाच्या सैनिकांच्या हाती सापडले. ते बादशहाकडे पाठविण्यात आले. बादशहाने फिरोजजंगाची प्रशंसा करून त्याला बक्षिसे दिली."[२४]

संताजीसारखा स्वाभिमानी सेनापती आपल्याशी हाडवैर असणाऱ्या शत्रूच्या घरी आश्रयास जाईल, हे संभवनीय वाटत नाही. नागोजी त्यास आश्रय देतो व नंतर सुखरूपपणे निरोप देतो, या साकी मुस्तैदखानाच्या कानावर पडलेल्या आख्यायिकेत काही तथ्य नाही; पण साकी मुस्तैदखानाच्या लिखाणातही काही विचारात घेण्यासारखे मुद्दे आहेत-

१. खाफीखानाप्रमाणे साकी मुस्तैदखानही या प्रकरणात नागोजीच्या बायकोचे म्हणजे राधाबाईचे नाव घेतो.

२. साकी मुस्तैदखान संताजीस नागोजीने मारले असे न

२४. मराठे व औरंगजेब (मासिरे आलमगिरी), पृ. ७२

म्हणता दावेदारांनी मारले असे एक मत देतो. त्याच्या लिखाणावरून हे दावेदार म्हणजे राधाबाई व तिचा भाऊ हणमंतराव निंबाळकर असे ध्वनित होते.

३. संताजीचे डोके फिरोजजंगाकडून बादशाही छावणीत पोहोचते झाल्याचा साकी मुस्तैदखानाचा वृत्तांत खाफीखानाच्या वृत्तांताशी जुळणारा आहे.

औरंगजेबाच्या पदरी असणारा तिसरा मोगल इतिहासकार भीमसेन सक्सेना या घटनेबद्दल फारच त्रोटक माहिती देतो. यावेळी भीमसेन कर्नाटकात जुल्फिकारखानाच्या फौजेत होता. त्याच्या कानावर गेलेली हकिकत अशी - "(कर्नाटकात धनाजीस पराभूत केल्यावर) संताजीने आपल्या सहकाऱ्यांना आपापल्या घरी जाण्यासाठी निरोप दिला. त्याच्याबरोबर थोडी माणसे राहिली. त्यांना बरोबर घेऊन तो निघाला. जवळच अमृतराव निंबाळकर याचे गाव होते. अमृतराव हा संताजीच्या सैनिकांच्या हातून मारला गेला होता. नागोजी माने हा मोगलांचा पाच हजारी मन्सबदार होता. अमृतराव निंबाळकराची बहीण नागोजीला दिली होती. अमृतराव निंबाळकर आणि नागोजी माने यांची माणसे एक झाली आणि त्यांनी संताजीवर तुटून पडून त्याचे डोके धडापासून वेगळे केले. संताजीचे डोके बादशहाकडे पाठविण्यात आले."[२५]

भीमसेन सक्सेना म्हणतो की, संताजी हा निंबाळकरांच्या गावाजवळ (दहिगाव) मारला गेला; पण संताजी म्हसवडजवळ महादेव डोंगरात मारला गेला, हे अनेक पुराव्यांवरून सिद्ध होते. भीमसेन म्हणतो त्याप्रमाणे दहिगावजवळ नागोजीच्या व अमृतरावाच्या माणसांची संताजीशी चकमक झाली असणे व त्यात तो पराभूत होऊन म्हसवडच्या उत्तरेस महादेव डोंगराकडे पळाला असणे संभवनीय वाटते.

मोगलांप्रमाणे मराठ्यांच्या बाजूवर या कालात इतिहास लिहिले गेले नाहीत; पण नंतरच्या कालखंडात काही घराण्यांच्या हकिकती

२५. मोगल व मराठे (तारिखे दिल्कुशारपसव), पृ. ७२

लिहिल्या गेल्या. अशीच एक निंबाळकर घराण्याची हकिकत इतिहास-संग्रह मासिकात प्रसिद्ध झालेली आहे. ती अशी- "(घोरपडे) दहा-बारा रावतांनिशी म्हसवडास आले. घोरपड्यांचे व अमृतराव निंबाळकरांचे वाकडे. अमृतरावाची बहीण राधाबाई म्हसवडकर नागोजी मान्याची बायको. अमृतरावास संताजीने ठार मारले होते. भावाच्या मृत्यूचा सूड घेण्याच्या भावनेने तिने संताजीशी कारखाळ्याच्या[२६] रानात दबा ठेवून मारामार केली. त्यात घोरपडे मृत्यू पावले."[२७]

भावाच्या वधाच्या सुडाने पेटलेल्या राधाबाईने 'दबा ठेवून मारामार केली' आणि संताजीस ठार केले, हा या हकिकतीमधील मजकूर साकी मुस्तैदखानाच्या हकिकतीशी थोडा जुळणारा आहे. ही हकिकत संताजीस नागोजीने मारले असे म्हणत नाही. राधाबाईने त्यास ठार मारण्याची तजवीज केल्याचे म्हणते.

## मान्यवर इतिहासकारांची मत-मतांतरे

मराठ्यांच्या इतिहासातील या दुर्दैवी घटनेबद्दल अनेक इतिहासकारांनी आपापली मते प्रतिपादन केलेली आहेत. त्यातील काही मान्यवर इतिहासकारांच्या मतांची येथे दखल घेणे सयुक्तिक ठरावे.

रियासतकार गो. स. सरदेसाई यांनी या घटनेचा वृत्तांत देताना म्हटले आहे : "संताजीचा पाठलाग चालला असता थकून गेल्यामुळे जवळ कोणी शत्रू नाही, असे समजून तो एकटाच ओढ्यावर स्नान करू लागला. इतक्यात नागोजीने दबा धरून ठेवलेले लोक पुढे आले आणि त्याचे डोके कापून जवळच ब्रह्मपुरी येथे बादशहाकडे आणले. त्याबद्दल बादशहाने नागोजीची वाखाणणी करून त्यास मनसब दिली."[२८]

संताजी-धनाजी दरम्यान वितुष्ट येण्यास बादशहा कारण नसला, तरी संताजीचा खून बादशहाच्या कारवाईनेच नागोजी माने याने केला, असे सांगून रियासतकार म्हणतात : "नागोजी माने स. १६९० ला

२६. कारखाळे हे गाव संताजी जेथे मारला गेला त्या डोंगराच्या पायथ्याला आहे.
२७. स्थिरबुद्धि राजाराम, पृ. ८३-८४
२८. स्थिरबुद्धि राजाराम, पृ. ८४

बादशहास सोडून स्वराज्यात आला; परंतु त्याचे चित्त इकडे स्थिर झाले नाही. संताजी पळू लागल्यावर नागोजी लुत्फुल्लाखानास भेटला आणि त्याचेमार्फत पुनः बादशहाची कृपा संपादण्याकरिता त्याने संताजीचे शिर कापून ते बादशहास नजर केले. हे कृत्य केवळ त्याने बायकोच्या शिकवणीने केले, असे म्हणवत नाही. मराठशाहीपेक्षा बादशाहीची सेवा लोकास जास्त फायदेशीर वाटत होती."[२९] रियासतकार सरदेसाई यांच्याप्रमाणेच सेतु माधवराव पगडी, स. मा. गर्गे इत्यादी इतिहासकारांनी संताजीच्या खुनास नागोजीसच जबाबदार धरले आहे.[३०]

तथापि, औरंगजेबाचे आधुनिक काळातील सुप्रसिद्ध इतिहासकार सर जदुनाथ सरकार यांनी मात्र साकी मुस्तैदखानाची हकिकत ग्राह्य मानून आपल्या History of Aurangzib या ग्रंथात लिहिले आहे. : "Santa despoiled of all and deserted by his army, fled from the field with only a few followers to Mhaswad, the home of Nagoji Mane, whose wife's brother Amrit Rao he had killed. With Nagoji, however, the secred rights of hospitality to a refugee rose higher than the claims of blood-feud; he gave Santa shelter and food for some days, and then dismissed him in safety. But his wife Radha Bai followed her brother's slayer with a woman's unquenchable vindictiveness. She had urged her husband to slay their guest, but in vain. And now when she saw him escaping unscathed, she sent her serviving brother after him."

*(सर्वांकडून नागवला गेलेला आणि आपल्या सैन्याकडूनच त्याजला गेलेला संताजी आपल्या मोजक्या सोबत्यांनिशी रणांगणावरून नागोजी मान्याच्या म्हसवडकडे पळाला. संताजीने त्याच्या बायकोच्या*

२९. कित्ता, पृ. ८४

३०. हिंदवी स्वराज्य आणि मोगल, पृ. १७४,
कापशीकर सेनापती घोरपडे घराण्याचा इतिहास, पृ. ८१-८२

*भावाला-अमृतरावाला-ठार केले होते; आणि तोच संताजी आता मान्यांच्या आश्रयाला आला होता. तथापि मेहुण्याच्या हत्येचा सूड घेण्यापेक्षा आश्रयास आलेल्या संताजीचे आदरातिथ्य करणे हे आपले पवित्र कर्तव्य आहे, असे जाणून नागोजीने त्याला काही काळ अन्न व आश्रय दिला. त्यानंतर त्याने आपल्या मुलखातून सुखरूपपणे जाण्यास निरोपही दिला. यावेळी स्त्रीसुलभ सूडभावनेने पेटलेल्या राधाबाईने आपल्या नवऱ्यापाशी संताजीचा काटा काढण्याचा आग्रह धरला; पण नागोजी बधला नाही आणि जेव्हा संताजी सुखरूपपणे निसटून जातो आहे, हे तिने पाहिले, तेव्हा तिने आपला दुसरा भाऊ त्याच्या पाठलागावर धाडला.)*

प्रत्यक्षात संताजी कसा मारला गेला आणि त्याचे शिर बादशाही छावणीकडे कसे पाठविण्यात आले हे सांगण्यासाठी सरकारांनी यापुढे खाफीखानाचा वृत्तांत दिला आहे आणि तो देताना नागोजी मानेऐवजी निंबाळकर वाचावे, अशी वाचकास सूचना केली आहे. विशेष म्हणजे यासंदर्भातील जेधे शकावलीमधील नोंदही त्यांनी अग्राह्य ठरविली आहे.[३१]

सरकारांसारख्या नामवंत इतिहासकाराने संताजीसारखा स्वाभिमानी व करारी सेनापती असहाय होऊन नागोजीच्या घरी आश्रयास गेल्याची साकी मुस्तैदखानाची हकिकत ग्राह्य मानावी हे मोठे आश्चर्य आहे. साकी मुस्तैदखानाच्या कथेवर भाष्य करताना स. मा. गर्गे यांनी म्हटले आहे : "ऐवारकुटीच्या लढाईत खुद्द नागोजीचा मेव्हणा संताजीकडून मारला गेला. अशा स्थितीत संताजी नागोजीच्या आश्रयास जातो आणि नागोजी त्यास उदारमनाने निरोप देतो, असे समजणे म्हणजे मानवी स्वभावाविषयी अज्ञान व्यक्त करण्यासारखे आहे."[३२] गर्गे यांचे मत योग्य आहे, असे वाटते.

आणखी एक इतिहासाचे संशोधक डॉ. वि. गो. खोबरेकर

३१. History of Aurangzib, Vol. V, pp. 103-104

३२. कापशीकर सेनापती घोरपडे घराण्याचा इतिहास, पृ. ६०

(महाराष्ट्र सरकारच्या पुराभिलेख विभागाचे माजी संचालक) यांच्या विधानाची येथे दखल घेणे आवश्यक आहे. महाराष्ट्र सरकारच्या वतीने शिवराज्याभिषेक त्रिशत सांवत्सरिक महोत्सवानिमित्त शिवकालीन कागदपत्रांचा 'Records of Shivaji Period' हा एक साधन ग्रंथ प्रकाशित केला आहे. या ग्रंथात शिवकालासंबंधी महत्त्वाची पत्रे प्रकाशित झालेली आहेत. विशेषतः त्यामधील म्हसवडकर माने व पाटणकर या दोन घराण्यांची कागदपत्रे मराठ्यांच्या इतिहासात मोलाची भर टाकणारी आहेत. म्हसवडकर मान्यांच्या कागदपत्रांवर टीका-टिपणी करताना ग्रंथांच्या प्रस्तावनेत डॉ. खोबरेकरांनी नागोजी माने याच्यावर आलेला संताजीच्या खुनाचा ठपका दूर करण्याचा प्रयत्न केला आहे. ते लिहितात : "In 1696 he (Nagoji) had a quarrel with other Maratha generals. He therefore deserted Rajaram and went over to the Mughals. While serving the Mughals Nagoji Mane put to flight Maratha general Santaji Ghorpade in June 1697 and took with him Ghorpade's horses, camels, oxen etc. with the permission of the Emperor... These records... add to our knowledge that Nagoji Mane... did not kill Santaji Ghorpade. But he was only put to fight by Mane."[३३]

*(स. १६९६ मध्ये नागोजीचे अन्य मराठा सरदारांबरोबर भांडण झाले होते, म्हणून राजारामाची बाजू सोडून तो मोगलांना मिळाला होता. मोगलांची चाकरी करत असता स. १६९७ सालच्या जून महिन्यात (झालेल्या लढाईत) नागोजीने संताजी घोरपड्यास पळवून लावले आणि बादशहाच्या परवानगीने त्याने संताजीचे घोडे, उंट, बैल इत्यादी ताब्यात घेतले. या (मान्यांच्या) कागदपत्रांवरून हे स्पष्ट होते की नागोजीने संताजीस ठार केलेले नाही. त्याने संताजीस (फक्त) पळवून लावले.)*

डॉ. खोबरेकर म्हणतात त्याप्रमाणे काही मराठा सरदारांशी (संताजी नव्हे) वितुष्ट आल्याने नागोजीने राजाराम महाराजांची बाजू

३३. Records of Shivaji Period : Introduction, p. XV

सोडून मोगली चाकरी स्वीकारली हे खरे नाही. मोगलांना मिळण्याचे हे कारण नव्हते. याची चर्चा पुढे येईलच. दुसरे असे की, डॉ. खोबरेकरांच्या विधानावरून असा समज होतो की, मोगलांची चाकरी करण्याच्या कर्तव्यनिष्ठेने नागोजीने संताजीशी लढाई दिली व त्या लढाईत त्याने संताजीस नुसते पळवून लावले, मारले नाही; दुसऱ्या शब्दांत संताजीच्या खुनाचा ठपका नागोजीवर ठेवता येणार नाही.

## खरोखरच नागोजी निर्दोष आहे काय ?

अशा प्रकारची इतिहासकारांची मतांतरे पाहिल्यानंतर अभ्यासकाच्या मनात नेमके ऐतिहासिक सत्य काय असावे, याविषयी संभ्रम निर्माण होणे स्वाभाविक आहे. तथापि हा संभ्रम दूर करण्यास डॉ. खोबरेकरांनी संपादित केलेली खुद्द म्हसवडकर मान्यांचीच कागदपत्रे साहाय्यास येतात, ही या सर्व प्रकरणातील विशेष महत्त्वाची गोष्ट आहे.

पहिले पत्र आहे बादशहाचा नागोजी माने याच्या नावाने दिलेला कौलनामा. कौलनामा म्हणजे अभयपत्र. ते असे :

(बादशहाच्या उजव्या हाताचा ठसा.

त्याच्या उजव्या बाजूस सैफखानाचा शिक्का)

कौलनामा - नागोजी माने

तुम्ही दरबारची सेवा करण्यासाठी शत्रूकडून (मराठ्यांकडून) निघाला व संताजीच्या पळून जाण्याबाबत उत्कृष्ट कामगिरी केली. त्याबाबत तुमच्यासाठी फर्मान पाठवून व गुन्ह्याची क्षमा करून तुमच्या मागण्या हुजूर पाठविल्या. तेव्हा तुम्ही रणदुल्लाखानाच्या (म्हसवडचा ठाणेदार) फौजेत जाऊन मिळावे व नंतर तुम्हाला तुमचे गुन्हे माफ केल्याचे फर्मान व मागण्या व इनाम वगैरे लिहिल्याप्रमाणे दिले जाईल. यातच तुमचे कल्याण उत्कर्ष आहे व त्याप्रमाणे तुम्ही वागावे. तुमच्या प्राणापलीकडील निष्ठेबद्दल योग्य ते चीज होईल.

तेरीख २९ जिल्हेज जुलूस ४१"[३४]

३४. Records of Shivaji Period, p. 148

जेधे शकावलीप्रमाणे नागोजी माने याने संताजीस "आषाढ मासी" (म्हणजे ९ जून ते ८ जुलै, १६९७ च्या दरम्यान) मारले, अशी माहिती मिळते. हा कौलनामा ९ जुलै, १६९७ चा आहे. याचा अर्थ संताजीचा खून ९ जुलैपूर्वी बहुधा जुलैच्या पहिल्या आठवड्यात घडून आला असावा. या कौलनाम्यानुसार नागोजीने यापूर्वीच स्वराज्याची सेवा सोडली होती आणि मोगली चाकरीसाठी तो प्रयत्न करीत होता. प्रत्यक्षात त्याला अद्यापि मोगली मनसब मिळाली नव्हती, तरी तो मोगलांना मिळाल्यातच जमा होता.

या कौलनाम्यात "संताजीच्या पळून जाण्याबाबत उत्कृष्ट कामगिरी केली" हे एक महत्त्वपूर्ण वाक्य आहे. या वाक्यावर आधारूनच डॉ. खोबरेकरांनी पूर्वोक्त विधान केलेले आहे. केवळ या एकाच पत्रावर भिस्त ठेवून नागोजीसंबंधी निवाडा करायचे झाल्यास तो संताजीच्या खुनाच्या दोषातून सहीसलामत सुटतो, हे खरे. तथापि याच तारखेचा आणखी एक कौलनामा यापूर्वीच्या एका ग्रंथात प्रकाशित झाल्याने नागोजीची या दोषातून मुक्तता होणे कठीण होऊन बसले आहे.

पाऊणशे वर्षांपूर्वी मावजी व पारसनीस यांनी संपादित केलेल्या "सनदा पत्रांतील माहिती" या ग्रंथात बादशहाचा एक सरदार लुत्फुल्लाखान याचा ९ जुलै याच तारखेचा एक कौलनामा प्रसिद्ध झालेला आहे. लुत्फुल्लाखान हा फिरोजजंगाच्या आघाडीच्या पथकात असून, या सुमारास तो म्हसवड भागात फिरत होता, हे मागे सांगून झालेच आहे. मूळ फारसीत असणाऱ्या या कौलनाम्याचा मागाहून केलेला हा मराठी अनुवाद आहे :

"कौलनामा-लुत्फुल्लाखान अलमगीर पादशहा यांचे कारभारी यांचे नकसपंज्यासुद्धा[35] नागोजी माने यांचे नावाचा. तुम्ही निश्चयेकरून आमचे दौलतीचा आश्रय करून हुजूर रुजू जाहला व दुस्मानासही दूर केला व संता याचा रस्ता पळावयाचा तो तुम्ही बंद केला. त्यास पळून जाऊन दिल्हे नाही. तुम्ही सरकारची नोकरी एकनिष्ठेने बहुत चांगली

३५. लुत्फुल्लाखानाच्या शिक्क्यासह

केली. तुम्ही पेशजी (पूर्वी) विनंती केली ती व हल्ली विनंती केली ती कबूल झाली आहे. तुमचे नावे फर्मान यावयाकरिता व तुमचे अपराध क्षमा व्हावयाकरिता व आखणी तुमची विनंती असेल ती करून द्यावयाकरिता सरकारांत लिहिले आहे. तुम्ही स्वस्थ असावे व आमचे खताची (पत्राची) वाट पाहावी की, आमचे खत सरकारांत पोचल्यावर तुमचे नावचे फर्मान व तुमचे अपराध क्षमा व्हावयाकरिता व तुमचे मनसब व तुमचे इनामची सनद लिहून येईल. रणदुल्लाखान यांचे समागमे तुम्ही लष्करात यावे. तुमचा मोठेपणा व इतबार तुमचे उत्तम होणेबद्दल हल्ली व पुढे जरूर आहे ते होऊन येईल. तुम्ही चाकरी केली याबद्दल पादशहाची मेहरबानी व इनायत होऊन येईल. तारीख छ २९ जिल्हेज सन ४१ जुलूस"[३६]

सदर कौलनामा काळजीपूर्वक वाचला, तर हे स्पष्ट होते की, नागोजीने संताजीचा पळावयाचा रस्ता बंद करून (म्हणजे सर्व बाजूंनी कोंडी करून) त्या "दुस्मानासही दूर केला." नागोजीच्या या कामगिरीबद्दल लुत्फुल्लाखानाने "तुम्ही सरकारची नौकरी एकनिष्ठेने बहुत चांगली केली" असा त्याचा गौरव केला आहे. कौलनाम्यातील "तुम्ही पेशजी (पूर्वी) विनंती केली ती" या वाक्यावरून संताजीस ठार मारण्यापूर्वीच नागोजीचा लुत्फुल्लाखानाशी पत्रव्यवहार चालू होता हे उघड होते. उपरिनिर्दिष्ट कौलनाम्याने हे सिद्ध होते की, नागोजी मान्याने संताजीस नुसते पळवून लावले असे नाही, तर त्याचा पळावयाचा रस्ता बंद करून सर्व बाजूंनी कोंडी करून त्यास हल्ला करून ठार मारले.

लवकरच म्हणजे ३० जुलै, १६९७ रोजी नागोजी माने याने आपले गुन्हे माफ होऊन आपणास कशा प्रकारचा सरंजाम मिळावा, याविषयी एक अर्ज बादशहाच्या दरबारात पाठविला :

'नागो मान्या बादशहास अर्ज करितो व आशा करितो की खाली तपशिलाप्रमाणे मागण्या कबूल व्हाव्यात. २१ मोहरम. जुलुस ४१.

३६. सनदापत्रांतील माहिती, पृ. ८५-८६

माझ्या गुन्हाची माफी होऊन कौल व पंजाचे फर्मान मिळावे, हत्ती, पोशाख, सोन्याचा साज असलेला घोडा (सोन्याच्या साखळीसह), सांगोल्याच्या गढीत ठेवण्यासाठी सैन्य, तीस हजार रुपये इनाम, ७० हजार रुपये मदत (५० हजार माझ्यासाठी व वीस हजार रुपये भाऊबंदकीसाठी) देणेची कृपा व्हावी.

खाली दिलेल्या तपशीलाप्रमाणे त्या खालील ठाण्यांची ठाणेदारी : गढी पतंगा, गढी परगणे माजरा, गढी आटपाडी, गढी सांगोला, गढी नातेपोते, गढी तहबोर व या ठाण्यांमध्ये पूर्वीप्रमाणे जो दारुगोळा वगैरे सामान आहे ते बहाल व्हावे.

सात हजार स्वार सात हजार जात यांनी कृपा व्हावी. यापैकी चौथा हिस्सा घोड्यास डाग देणे व मोजदाद तसेच दो घोड्यांचा खुराक माफ व्हावा व नगारा द्यावा. जामीन माफ व्हावा.

तनख्यासाठी जागीर म्हणून महाल येथील फौजदारीसुद्धा द्यावेत.

| परगणे | परगणे |
|---|---|
| पा। सांगोला | चिंचोली |
| कासेगाव | माजरा |
| इस्लामपुरी | आयलापूर |
| आटपाडी | असदनगर |
| दहिगाव | मंगलगी |
| मंगळवेढा | कालगी |

सरकार परंड्यातून पाच परगणे
सरकार बिदर येथून दोन महाल.[३७]

नागोजी माने मराठ्यांची बाजू सोडून मोगली बाजूवर आला होता. याच्या मोबदल्यात तो बादशहाकडून कोणकोणत्या गोष्टींची मागणी करीत होता, याची कल्पना आपणास त्याचा वरील विनंती अर्ज पाहिल्यानंतर येते. नागोजीने हत्ती, सोन्याचा साजश्रृंगार केलेला घोडा, पोशाख याशिवाय सप्तहजारी मन्सबदारी, अनेक ठाण्यांची ठाणेदारी व अनेक महालांचा सरंजाम मागितला आहे.

बादशहाने नागोजीच्या या सर्व मागण्या लगेच मान्य केल्या असे नाही. दरम्यान असे दिसते की, बादशहाने त्यास ब्रह्मपुरी येथील आपल्या छावणीकडे भेटीसाठी बोलाविले. तेव्हा संताजीस मारल्यानंतर हाती लागलेली घोडी, उंट व बैल वगैरे घेऊन नागोजी बादशाही छावणीकडे निघाला. मार्गात कासेगाव (पंढरपूरजवळ) मुक्कामी असता

३७. Records of Shivaji Period, pp. 151-152

त्याने आपला वकील दरबारात पाठवून बादशहासमोर आपला अर्ज पेश केला-

"नागोजी मान्याच्या वकिलाचा विनंती अर्ज दरबारास आला की, नागोजी मान्या हुकुमाप्रमाणे कासेगावास पोहोचला. हुजूर जवळजवळ येऊन पोहोचला आहे. संत्या नर्कवासी (संताजी) यास मारल्यानंतर त्याच्या (नागोजीच्या) लोकांच्या हाती घोडे, उंट व बैल वगैरे आले आहेत. आशा करितो की, कोतवालीच्या मुत्सद्यांच्या (अधिकाऱ्यांच्या) नावे हुकूम व्हावा की, त्यांनी अडथळा आणू नये. हुकूम झाला की, अडथळा आणू नये. ता. १९ शाबान जु. ४१" - (२१ फेब्रुवारी, १६९८).[३८]

सदर पत्रातील "संत्या नर्कवासी यास मारल्यानंतर" हे शब्द प्रस्तुत चर्चेच्या दृष्टीने मोलाचे आहेत. संताजीस मारण्याचे कृत्य नागोजीकडूनच झाले हे स्पष्ट सांगणारे हे पत्र खुद्द म्हसवडकर मान्यांच्याच दप्तरातील आहे, हे पुन्हा एकदा येथे आवर्जून सांगावेसे वाटते.

पुढे दोनच दिवसांनी नागोजी ब्रह्मपुरीस बादशाही छावणीत पोहोचला. दरबारातील एक अधिकारी तरबियतखान याच्यामार्फत त्याने आपले गुन्हे माफ होऊन आपल्यावर बादशाही कृपा व्हावी म्हणून दरबारात अर्ज केला. यावेळी नागोजीही खुद्द बादशहास भेटला. बादशहाने कृपावंत होऊन त्यास पुढील फर्मान बहाल केले :

(औरंगजेबाचा वर्तुळाकार शिक्का)

"नागो मान्याने यावेळी तरबियतखानाच्या मार्फतीने अर्ज केला की, त्यास त्याच्या चुकीचा पश्चात्ताप होत असून, आता तो बादशाही सेवा इमानेइतबारे करण्याची प्रार्थना करीत आहे व त्यास त्याचे पूर्वीचे गुन्हे माफ व्हावेत, या कारणास्तव बादशाही कृपा होऊन त्यास क्षमा करण्यात आली असून, त्याबद्दल त्याने धन्यवाद देऊन उंबरठ्यास सलाम करण्यासाठी धावून यावे. म्हणजे त्याजवर कृपा होऊन उत्तम मनसबीच्या योगाने त्याचे डोके वर उचलले जाईल."[३९]

३८. Records of Shivaji Period, pp. 153

३९. कित्ता, pp. 150

औरंगजेबाच्या या फर्मानाची भाषा कितीही अलंकारिक असली, तरी ती जेत्याची जितासाठी वापरलेली भाषा होती. ती गुलामांसाठी वापरलेली भाषा आहे. तिची तुलना "स्वामीचे राज्य म्हणजे देवताभूमी. या राज्यास तांब्राचा उपद्रव न व्हावा, मराठधर्म राहावा, स्वामीच्या राज्याची अभिवृद्धि व्हावी या उद्देशे स्वामीच्या पायापासी... आलेती" या भाषेशी होणेच शक्य नाही. ही स्वराज्याच्या छत्रपतीची भाषा आहे. मोगली गुलामगिरी तोडणाऱ्या राजाचे ते हृदगत आहे.

बादशहाने नागोजीचे गुन्हे माफ करून त्यास आपल्या चाकरीत रुजू करून घेतले, तरी त्यास जहागिरीच्या रूपाने बक्षीस मिळाले ते पुढे १५ ऑगस्ट, १६९८ रोजी - "परगणे मांडोरा सरकार नर्नाला सुबे वराडपैकी ७ लक्ष ७८ हजार दामाची अलिखानाची जागीर तगीर (रद्द) करून नागोजी माने यास तनख्यासाठी दिल्याचा हुकूम झाला. उपर्युक्त महालांतील महसूल कराराप्रमाणे वसूल करून सुरक्षित ठेवावा. राजपत्रात लिहिल्या गेल्यानंतर तनखा म्हणून द्यावे. याप्रमाणे अमल करावा. ता. १८ सफर. जुलूस ४२"[४०]

पूर्वीचा जहागीरदार अलिखान याची जहागीर रद्द करून त्याच्या जागी नागोजीस वऱ्हाड सुभ्यात पावणेआठ लक्ष दामाची जहागीर बहाल केली गेली. लवकरच या जहागिरीत भर टाकून ती ११ लक्ष ४ हजार ४१० दामांची करण्यात आली.[४१]

पूर्वी मोगलांकडून स्वराज्यात आल्यावर नागोजीने मोगलांच्या चाकरीत असलेले अनेक मराठे सरदार स्वराज्यात आणले होते. नागोजी अशी माणसे वळविण्यात मोठा पटाईत होता. आता पुन्हा मोगलांना मिळाल्यानंतर साबाजी निंबाळकर या मराठा सरदारास त्याने मोगली चाकरीत आणले. काही कालाने माहादजी घाटगे व नागोजी घाटगे हे आणखी दोन सरदार त्याने मोगलांकडे आणले.[४२] खुद्द नागोजी माने यास ९ जाने., १७०० रोजी पाच हजारी मन्सब दिली गेली : बहमन

४०. Records of Shivaji Period, pp. 154
४१. कित्ता, पृ. १५५
४२. कित्ता, पृ. १५६, १६१-१६२"१२ शाबान जु. ४३. हि. ११११.

१५० बक्षी-उल-मुल्क बहरामंदखान व वाक्यानिगारीचा (वाकेनिवीस) नायब हिदायतुल्लाखान यांनी लिहून पाठवले की, बादशाही हुकूम झाला की, नागोजी माने यास पांच हजारी जात चार हजार स्वाराची मनसब दिली आहे. घोड्यास डाक देणे व निशाण करणेबद्दल माफी दिली आहे. हे जाणावे. ता. २८ रजब जु. ४३"[४३]

पण मोगली चाकरीतही नागोजी फार काळ राहिला असे दिसत नाही. महाराणी ताराबाईंच्या कारकिर्दीत तो पुन्हा स्वराज्यात आला. २५ डिसेंबर, १७०२ रोजी ताराबाईपुत्र छत्रपती शिवाजी राजे यांनी नागोजीस कसबे म्हसवडसहित बारा वाड्यांचे इनाम दिले आहे. त्यात शिवाजी राजे म्हणतात - "नागोजी माने यांणी कैलासवासी राजश्री स्वामीची (राजाराम महाराजांची) सेवा बहुतच निष्ठेने केली. याकरिता त्याणी कृपाळू होऊन मारनिल्हेस कसब म्हसवडदेखील बारा वाड्या इनाम दिल्हा आहे. तेणेप्रमाणे स्वामीसही चालविणे अगत्य. यास्तव हे आज्ञापत्र सादर केले असे..."[४४]

स. १६८५ सालापर्यंत वंशपरंपरेने आदिलशाहीच्या चाकरीत, त्याच साली मोगलांकडे रुजू, स. १६९० साली मोगलांना सोडून स्वराज्यात रुजू, स. १६९६ साली पुन्हा मोगलांकडे आणि शेवटी स. १७०२ साली पुन्हा स्वराज्यात ताराबाईकडे असा नागोजीचा राजकीय प्रवास आहे.

राजाराम महाराज व ताराबाई यांच्या कालखंडांत अशा प्रकारे अनेक मराठा सरदारांनी राजकीय प्रवास केलेला आहे. नागोजी हा काही अपवाद नाही.

असे मराठे सरदार जेव्हा स्वराज्यात येत तेव्हा स्वराज्य म्हणजे देवता भूमी मानली जाई. महाराष्ट्रधर्माचे आवर्जून स्मरण केले जाई; पण त्यांना मोगली मन्सबीचे मृगजल दिसले की, कुठली देवता भूमी आणि कुठला महाराष्ट्रधर्म! केव्हा एकदा बादशहाच्या दरबाराच्या उंबरठ्यास

४३. कित्ता, पृ. १५७
४४. कित्ता, पृ. १६३

सलाम करावयास जाईन, असे त्यांना होऊन जाई.

नागोजीच्या राजकीय चरित्राची व चारित्र्याची एवढ्या विस्ताराने जी आपण चर्चा केली ती अशासाठी की, ज्या नागोजीने संताजीची हत्या केली तो कशा प्रकारचा मराठा सरदार होता हे समजून घ्यावे. आतापर्यंत सादर केलेल्या कागदपत्रांच्या पुराव्यांवरून आपणास अशा निष्कर्षाप्रत येण्याशिवाय गत्यंतर राहत नाही की, संताजीचा खून नागोजी माने यानेच केला यात संशय नाही.

संताजीने ज्या महादेवाच्या डोंगरात आश्रय घेतला होता त्या डोंगराच्या जवळच नागोजीचे म्हसवड गाव आहे. संताजीचे आश्रयस्थान व त्याच्या हालचाली याची बितंबातमी नागोजी इतकी अन्य कोणास लागली असेल, असे वाटत नाही.

अशी बातमी हाती आल्यावर नागोजीने प्रथम आपली माणसे घेऊन संताजीच्या आश्रयस्थानावर सर्व बाजूंनी वेढा दिला व त्याचा पळावयाचा रस्ता बंद करून तो त्याचा शोध घेण्यासाठी पुढे सरसावला. ही वेळ सूर्योदयाची होती. नागोजीच्या माणसांनी असे कढे करून ती जवळ येईपर्यंत संताजीस अशा प्रकारच्या हल्ल्याची कल्पना नव्हती. ओढ्यात अंघोळ करून सूर्याला अर्घ्य देण्यासाठी संताजी डोळे मिटून नमस्कार करीत असतानाच नागोजीने आपल्या माणसांसह अचानक हल्ला करून संताजीचे शिर धडापासून वेगळे केले. धड तेथेच टाकून शिर घेऊन तो डोंगराच्या बाहेर पडला. गाजिउद्दीनखान फिरोजजंगाची माणसे त्या भागात संचार करीतच होती. त्यांपैकी आघाडीवर असणाऱ्या लुत्फुल्लाखानाच्या ताब्यात संताजीचे शिर नागोजीने दिले. लुत्फुल्लाखानाकडून फिरोजजंगाकडे व फिरोजजंगाकडून ब्रह्मपुरीस बादशहाकडे ते शिर पोहोचते झाले.

उपलब्ध कागदपत्रांच्या आधारे संताजीच्या खुनाचे जे चित्र आपल्यासमोर उभे राहते, ते असे आहे आणि मग जेव्हा जेधे शकावलीसारखे अस्सल ऐतिहासिक साधन "आषाढ मासी संताजी घोरपडे यांसी नागोजी माने याणी महादेवाजवळ दगा देऊन मारिले"

अशी साक्ष देते,[४५] तेव्हा या चित्रातील व्यक्तिरेखा अधिक ठळक होऊन ऐतिहासिक सत्याचे स्पष्ट दर्शन घडते.

***

४५. शिवचरित्र प्रदीप, पृ. ३९, संताजीचे शिर धडावेगळे करून व ते बरोबर घेऊन नागोजी दरीबाहेर पडल्यावर संताजीच्या मागे राहिलेल्या सोबत्यांनी त्याच्या धडाचे दहन डोंगराच्या पायथ्याशी असलेल्या उघड्या-बोडक्या माळावर केले असावे. कारण सध्या संताजीची म्हणून जी समाधी दाखविली जाते, ती अशाच जागी आहे. त्या जागेवर जिल्हा परीषदेने एक हॉल व त्याच्या शेजारी समाधी म्हणून एक बंदिस्त चौथरा उभारला आहे. या चौथऱ्यावर ५/६ अनघड दगड व त्याच्या शेजारी महादेवाची पिंड (तीही ओबडधोबड सिमेंटची) ठेवली आहे. संताजी म्हणजे शतकानुशतकात निर्माण होणारा महान सेनापती! खुद्द औरंगजेब बादशहास दहशत लावणारा ! त्याचे हे स्मारक केवढे भव्य-दिव्य असायला हवे ! सर्व महाराष्ट्रातून आमचे तरुण-तरुणी, शाळकरी मुले-मुली ह्या समाधीचे दर्शन घेण्यास यावेत. आम्ही सर्व जण मराठे संताजी-धनाजीच्या पराक्रमाचे वारसदार ! आम्हांस केव्हा जाग येईल बरे !



# ११. संताजीच्या शोकांतिकेस जबाबदार कोण?

## नागोजी व राधाबाई यांची भूमिका

संताजीचा खून नागोजी माने याने दग्याने केला, याविषयी उपलब्ध पुराव्यावरून फारशी शंका राहत नाही; पण नागोजीच्या या कृत्यात त्याची बायको राधाबाई हिचा कितपत हात असावा, याविषयीची वस्तुस्थिती फारशी उजेडात येत नाही. खाफीखान म्हणतो की, या कृत्यात "नागोजीच्या बायकोने त्यास साथ दिली."[१] मोगलांचा दुसरा इतिहासकार साकी मुस्तैदखान म्हणतो की, संताजीस जिवंत म्हणून सोडायचे नाही, असा नागोजीच्या बायकोने निर्धार केला होता.[२] निंबाळकर घराण्याच्या हकिकतीमध्ये तर राधाबाईनेच 'मारामार' करून संताजीस ठार केल्याचे सांगितले आहे.[३] तथापि नागोजी म्हसवडात असता राधाबाईस पुढे होऊन अशी 'मारामार' करण्याची आवश्यकता भासली असेल, असे वाटत नाही. तरीपण ही साधने संताजीच्या खुनाच्या प्रकरणात राधाबाईचे नाव आवर्जून घेतात. यावरून तिचा या प्रकरणी काही निश्चित हात असावा, असे वाटल्यावाचून राहत नाही.

राधाबाईचा भाऊ अमृतराव निंबाळकर हा संताजीच्या हातून आयेवारकुटीच्या लढाईत मारला गेला होता. खाफीखान सांगतो त्याच्यावर विश्वास ठेवायचा झाला, तर या लढाईत पराभूत होऊन हाती सापडल्यावर संताजीने त्यास हत्तीच्या पायी देऊन ठार केले होते! नागोजीने व राधाबाईने पुढे संताजीवर असा क्रूर पद्धतीने सूड का उगविला, याची कारणपरंपरा ज्या पद्धतीने संताजीने अमृतराव निंबाळकरास ठार मारले त्या पद्धतीत अथवा घटनेत शोधली पाहिजे.

---

१. मराठ्यांचे स्वातंत्र्ययुद्ध (तारिखे खाफीखान), पृ. ३८

२. मराठे व औरंगजेब (मासिरे आलमगिरी). पृ. ७२

३. स्थिरबुद्धि राजाराम, पृ. ८३-८४

अमृतराव संताजीशी लढत असताना मारला गेला असता, तर त्याविषयी फारसा विषाद कोणी मानला असता, असे नाही. कारण युद्धात कोण केव्हा कोणाकडून मारला जाईल, याचा काही नेम असत नाही; पण इथे तसे घडलेले दिसत नाही. वास्तविक शरणागतास जीवदान देणारा, एवढेच नव्हे तर त्यांना अन्नपाणी देऊन सुखरूपपणे जाऊ देणारा असा संताजी आपणास दोड्डेरीच्या लढाईत दिसतो; पण या लढाईत मात्र त्याचा संयम राहिलेला नाही. रागाच्या भरात त्याने हाती सापडलेल्या अमृतरावास हत्तीच्या पायी दिले. ही अत्यंत क्रूर शिक्षा दिली गेली, असेच म्हणावे लागेल.

ज्याने आपला भाऊ हत्तीच्या पायी दिला त्याला जिवंत म्हणून सोडायचे नाही, असा निर्धार राधाबाईने केला असेल, तर तिच्या दृष्टिकोनातून तिचा काही गुन्हा होता असे नाही. आज आपण संताजीस शिवकालातील महान सेनापती मानतो. तसे राधाबाईस मानण्याचे काही प्रयोजन नव्हते. तिच्या दृष्टीने संताजी म्हणजे तिच्या भावाची हालहाल करून हत्या करणारा दुष्ट माणूस होता. स्वाभाविक राधाबाईमधील बहीण अमृतरावाच्या वधाच्या सुडाच्या भावनेने पेटली असेल, तर ते चुकीचे होणार नाही. ते मनुष्य स्वभावास धरूनच होईल. राधाबाईइतकी नागोजीची सुडाची भावना तीव्र नसेल; पण ती त्याच्या ठायी थोडीही नव्हती, असे म्हणता येणार नाही. मेव्हण्याच्या वधाने तोही खात्रीने व्यथित व संतप्त झाला असेल. तोही मेव्हण्याच्या वधाचा बदला घेण्याची वाट पाहत असेल. संताजीशी समोरासमोर युद्धाचा प्रसंग आला असता, तर त्याने त्याच्याशी निश्चितपणे दोन हात केले असते. अशा परिस्थितीत संताजी असहाय होऊन महादेव डोंगरात आश्रयास आलेला आहे, हे समजताच त्यास आयती संधी चालून आली. या संधीचा फायदा उठविण्यात नागोजीस राधाबाईने साथ दिली असल्यास नवल नाही.

रियासतकार सरदेसाईंनी म्हटले आहे : "संताजीचे शिर कापून ते बादशहास नजर केले, हे कृत्य केवळ नागोजीने बायकोच्या शिकवणीने केले, असे म्हणवत नाही. मराठशाहीपेक्षा बादशाहीची सेवा

लोकांस जास्त फायदेशीर वाटत होती."[४] सरदेसाईंच्या म्हणण्याचा रोख असा दिसतो की, बादशाही मन्सबीच्या अथवा बक्षिसाच्या आशेने नागोजी हे कृत्य करावयास धजावला; पण केवळ बादशाही मन्सबीच्या अथवा बक्षिसाच्या आशेने नागोजीने हे कृत्य केले असेही म्हणवत नाही. कारण नागोजी हा मोठा प्रतिष्ठित व पराक्रमी सरदार होता. संताजीला न मारता तो तसाच मोगलांना मिळाला असता, तरी बादशहाने त्यास पंचहजारी मन्सब व मानसन्मान दिला असता. अशा प्रकारे अनेक मराठा सरदारांना बादशहाने मन्सबी व मानसन्मान दिलेले होते. त्यासाठी नागोजीने संताजीचा काटा दूर करण्याची आवश्यकता नव्हती; पण जेव्हा दोन्ही गोष्टींचा योगायोग जुळून आला, तेव्हा नागोजीसारखा चाणाक्ष व राजकारणी सरदार त्याचा फायदा घेतल्याशिवाय कसा राहील? संताजीस ठार करण्यात त्यास व राधाबाईस एका बाजूने सूड घेतल्याचे समाधान मिळणार होते, तर दुसऱ्या बाजूने बादशाहीचा एक भयानक शत्रू नाहीसा केल्याचे श्रेय मिळणार होते. परिणामी बादशहाची कृपा होणार होती. एका डावात दोन पक्षी पडणार होते. नागोजीने डाव योग्य वेळी साधला एवढेच.

## संताजीचे माने-निंबाळकरांशी जुने हाडवैर

नागोजी माने याने संताजीस महादेवाच्या डोंगरात दग्याने ठार करावे, अगर तत्पूर्वी संताजीने अमृतराव निंबाळकरास हत्तीच्या पायी द्यावे, यामागे काही तर्कसंगत घटनानुक्रम आहे, असे मानण्याइतपत काही पुरावा हाती येतो. या पुराव्यातील एक महत्त्वाचा भाग म्हणजे १२ जुलै, १६९५ रोजी राजाराम महाराजांनी जिंजीहून महाराष्ट्रात असलेल्या संताजीस पाठविलेले एक पत्र होय. संताजी या सुमारास साताऱ्याच्या प्रदेशात छावणी करून होता. सोबत मोठी फौज व मराठा सरदार होते. या फौजेतच नागोजीचा पुत्र सुभानजी आपली फौज घेऊन सामील झाला होता. या सुभानजीशी संताजीचे वितुष्ट आले तेव्हा संताजीने रागाच्या भरात त्यास निरोपाची पाने देऊन छावणीबाहेर

---

४. स्थिरबुद्धि राजाराम, पृ. ८४-८५

घालवून दिले. सुभानजी म्हणजे नागोजीसारख्या प्रतिष्ठित सरदाराचा पुत्र. फौजफाटा बाळगणारा पराक्रमी मराठा. अशा कामाच्या माणसास उपेक्षेने बोलून निरोपाची पाने देऊन बाहेर घालविले, ही गोष्ट जिंजीत राजाराम महाराजांच्या कानावर गेली. तेव्हा महाराजांनी या गोष्टीचा जाब विचारणारे पत्र संताजीस पाठविले. त्यात महाराज म्हणतात : "... येशास यांचे (नागोजीचे) पुत्र राजश्री सुभानजी माने त्या प्रांते (महाराष्ट्रात) जमावानसी आहेत. त्यास तुम्ही कित्येक उपेक्षेच्या गोष्टी बोलोन पाने पाठवून देऊन मनास येईल तिकडे जाणे म्हणून सांगोन पाठविले. हे वर्तमान स्वामीस (राजाराम महाराजांस) कलो आले. त्यावरून स्वामीस आश्चीर्य वाटले की, तुम्ही शाहाणे लोक राज्याचे हित जाणता व करिता. यैसे असता यैशा लोकांस पाने पाठवून द्यावी आणि मनास येईल तिकडे जा म्हणावे, हे उचित नव्हे व ते जमावही यैसा तैसा धरीत नाहीत. पोख्तच धरितात. एवढ्या जमावास तऱ्हा द्यावी हे कोण गोष्ट? या उपरी यैसे न करणे. रा। सुभानजी माने यांचे समाधान बहुतां प्रकारे करून आणशफत जे द्यावयाची ते देऊन फौजे समागमे त्यास जमावानसी घेऊन येणे. सर्वथा त्यास दिलगीर होऊ न देणे."[५]

भिन्नभिन्न प्रकृतींच्या मराठा सरदारांना सांभाळून घेऊन त्यांना स्वराज्य रक्षणाच्या कार्यास जुंपण्याचे राजाराम महाराजांचे धोरणच उपरिलिखित पत्रातून व्यक्त होते आहे, हे धोरण तत्कालीन असाधारण अशा संकटप्रसंगी अयोग्य होते, असे म्हणता येणार नाही. राजाराम महाराजांची भूमिका राज्यहितास जपणारीच होती, असे म्हणावे लागेल; पण मग संताजीने सुभानजीस उपेक्षेने बोलून का घालवून दिले असावे? राजाराम महाराजांना जे स्वराज्याचे हित दिसत होते, ते संताजीस उमजत नव्हते, असे मानावे का? असा प्रश्न साहजिकच उत्पन्न होतो.

या प्रश्नाचे उत्तर शोधण्यापूर्वी आपण एक महत्त्वाचा मुद्दा प्रथम ध्यानी घेतला पाहिजे. तो म्हणजे राजाराम महाराज हे सहिष्णू वृत्तीचे राज्यकर्ते होते व संताजी हा कडव्या लष्करी शिस्तीचा सेनापती होता.

---

५. शिवचरित्र साहित्य, खं. ५, ले. ८५१

संभाजी महाराजांच्या हत्येनंतर निर्माण झालेल्या असाधारण अशा आपत्ती कालात ज्यांनी स्वराज्यनिष्ठा सोडली नाही, अशा एकनिष्ठांपैकी तो एक सेनानी होता. अशा सेनानीस स्वार्थासाठी घटकेत स्वराज्यात घटकेत मोगलाईत जाणाऱ्या राजकारणी सरदारांविषयी मनस्वी चीड असावी. स्वराज्याची सरशी होत असल्याचे पाहून जे मोगलांकडून स्वराज्यात आले त्यांना राजाराम महाराजांनी स्वराज्याच्या सेवेत घ्यावयास नको, अथवा घेतले तरी त्यांचे एवढे कोडकौतुक करावयास नको; कारण अशांच्या निष्ठा या स्वार्थी व डळमळीत असतात, अशी संताजीची महाराजांविषयी एक तक्रार असावी. अशा सरदारांमुळे लष्कर एकदिल व एकनिष्ठ राहण्यात अडथळे निर्माण होतात, अशी संताजीने भूमिका घेतली असावी.

या पार्श्वभूमीवर संताजीचे सुभानजीशी का वितुष्ट आले असेल, याबद्दल काही तर्क बांधता येतो. ही वितुष्टाची घटना मे १६९५ च्या सुमारास घडली असावी. याच वेळी माने-निंबाळकर मंडळींचा मोगलांशी आतून संधान बांधण्याचा प्रयत्न चालू असावा. कारण लवकरच संताजीच्या फौजेत असणारा सुभानजीचा मामा अमृतराव निंबाळकर आपल्या ५०० स्वारांनिशी मोगलांशी मिळाल्याचे दिसून येते.[६] सुभानजीचाही तसा काही विचार असावा. माने-निंबाळकरांची ही स्वार्थी राजकारणे संताजीसारख्या कडव्या शिस्तीच्या व स्वराज्यनिष्ठ सेनापतीस चीड आणण्यास कारणीभूत झाली असावीत.

अमृतराव निंबाळकराविषयीची ही चिडीची भावना दिवसेंदिवस संताजीच्या मनात अधिकच बळावत गेल्याचे दिसून येते. अमृतराव हा पराक्रमी असला, तरी नागोजीप्रमाणेच तो संधिसाधू राजकारणी होता. संभाजी महाराजांच्या हत्येनंतर तो मोगलांना मिळाला होता. पुढे ऑक्टो. १६९३ मध्ये नागोजीनंतर तो स्वराज्यात आला.[७] पण स्वराज्यातही स्थिर न राहता दोन वर्षांनी सप्टें. १६९५ मध्ये मोगलांना मिळाला. गंमत अशी

६. मोगल दरबारची बातमीपत्रे, पृ. १२२

७. History of Aurangzib, Vol. V, p. 34

की, तो पुन्हा स्वराज्यात आलेला दिसतो. जून १६९६ च्या आयेवारकुटीच्या लढाईत तो धनाजीच्या बरोबरीने संताजीशी लढत होता. असा हा काही तत्त्वनिष्ठा नसणारा अमृतराव जेव्हा हाती सापडला तेव्हा त्याला पाहताच संताजी बेभान झाला असावा. त्याच्या मनावरील त्याचा ताबा सुटून त्याने अमृतरावास हत्तीच्या पायी देण्याची शिक्षा फर्माविली असावी!

## धन्याच्या योग्यतेस हे लांच्छन आहे काय ?

रियासतकार सरदेसाईंनी संताजीच्या दुःखान्त शेवटाविषयी राजाराम महाराजांना काही अंशी जबाबदार धरणारे विधान केलेले आहे- "संताजीने धनाजी व राजाराम या दोघांवरही मात केली, त्यामुळे त्या दोघांस या डोईजड सरदाराची अत्यंत भीती पडून पुढे जो त्याचा खून झाला तोही राजारामाच्या प्रोत्साहनाने झाला असावा, असे ध्वनित होते."[८] रियासतकार आणखी पुढे असे म्हणतात - "संताजीची समजूत काढून राजाराम त्याचा बचाव करू शकला नाही, ही गोष्ट धन्याच्या योग्यतेस लांच्छन आणते. असला धाडसी व कल्पक सेनानायक खुनास बळी पडावा, यापेक्षा दुसरी राष्ट्रहानी कोणती? रामचंद्रपंतासमुद्धा या प्रकरणात मध्यस्थी करता आली नाही, याचे आश्चर्य वाटते."[९]

रियासतकारांचे हे मत साकी मुस्तैदखान, भीमसेन सक्सेना इत्यादी फारसी इतिहासकारांच्या वृत्तांतावर आधारलेले आहे, असे वाटते; पण त्यांपैकी कोणी राजाराम महाराजांच्या प्रोत्साहनाने नागोजीने संताजीचा खून केला, असे लिहिलेले नाही. या उलट असे दिसते की, नागोजीस कोणाचे प्रोत्साहन मिळाले असेल, तर ते बादशहाचे अगर बादशहाच्या सरदारांचेच मिळाले असणे अधिक संभवनीय होते. नागोजीने संताजीचा शिरच्छेद केल्यानंतर त्यांचे शिर राजाराम महाराज अथवा धनाजी यांच्याकडे पोहोचते केले नाही, तर ते फिरोजजंगामार्फत बादशहाकडे पोहोचते केले, ही वस्तुस्थिती काय

८. स्थिरबुद्धि राजाराम, पृ. ८२

९. कित्ता, पृ. ८४

दर्शविते? खुद्द रियासतकारांनीही चर्चेच्या ओघात लुत्फुल्लाखानाच्या कौलनाम्यावर आधारित असे याच अर्थाचे विधान पुढे केले आहे. ते म्हणतात - "संताजी व धनाजी यांचे वाकडे पडण्यास जरी बादशहा कारण नसला तरी त्याचा खून मात्र बादशहाच्याच कारवाईने घडून आला."[१०] अशी उलटसुलट विधाने केल्यामुळे मुळातच गुंतागुंतीचे असलेले हे प्रकरण अधिकच गुंतागुंतीचे भासते.

आता रियासतकारांच्या "संताजीची समजूत काढून राजाराम त्याचा बचाव करू शकला नाही, ही गोष्ट धन्याच्या योग्यतेस लांच्छन आणते" या विधानाचा विचार करू. खुद्द रियासतकारांनीच राजाराम महाराजांचे वर्णन 'स्थिरबुद्धि' असे केलेले आहे. अशा 'स्थिरबुद्धि राजाराम'कडून संताजीची समजूत काढण्याचे यापूर्वी काही प्रयत्न निश्चितपणे झालेले आढळतात. स. १६९२ सालच्या अखेरीस संताजीचा सल्ला न मानता जुल्फिकारखानास वांदिवॉशपर्यंत सुखरूप माघार घेऊ दिली; याचा राग येऊन संताजी रुसून जिंजीबाहेर जाऊन बसला. त्यावेळी राजाराम महाराजांनी त्याची खास भेट घेऊन त्याची समजूत काढल्याचे पांदेचरीचा गव्हर्नर मार्टिन म्हणतो : "Santa in anger retired with his troops some leagues away from Jinji. We believe that Rajaram has acted thus out of gratitude as he knows well that Zulfiqar Khan could have easily taken Jinji if he had wished for it.... Rajaram explained his secret policy (of concert with zulfiqar) who was to become the lord of the Golkonda realm after Aurangzib's expected death, while Rajaram would get the Bijapur subah. The Raja pacified Santa by paying him a visit and giving some presents."[11]

*(संताजी रागाच्या भरात जिंजी सोडून काही लीग अंतरावर आपल्या सैन्यासह जाऊन राहिला (एक लीग म्हणजे सुमारे तीन मैल). आमचा असा तर्क आहे की राजाराम खानाच्या उपकाराची परतफेड*

१०. कित्ता, पृ. ८४

११. Martin's Memoirs, pp. 248-249

*म्हणून असा वागला. कारण त्याला हे चांगले माहीत होते की खानाने जर मनात आणले असते तर (यापूर्वीच) त्याने जिंजी सहजासहजी काबीज केली असती. तेव्हा राजारामाने संताजीची भेट घेऊन व त्यास भेटवस्तू देऊन शांत केले आणि त्याला त्याने खानाशी झालेल्या गुप्त कराराची कल्पना दिली. या करारानुसार औरंगजेबाच्या मृत्यूनंतर खानाने गोवळकोंड्याच्या प्रदेशाचे तर राजारामाने विजापूर सुभ्याचे स्वामी व्हायचे ठरविले होते.)*

अशा प्रकारे संताजीची समजूत काढून राजाराम महाराजांनी त्यास त्रिचनापल्लीच्या मोहिमेवर पाठविले व लवकरच आपण स्वतःही त्यास जाऊन मिळाले. मागे संताजीचा बंधू बहिर्जी व याचप्पा नायक यांनी बंडाळी केली. त्रिचनापल्ली मोहिमेवरून परत आल्यानंतर संताजीचे पुन्हा राजाराम महाराजांशी वितुष्ट आले व तो त्यांना सोडून तडक महाराष्ट्रात आला (मे १६९३). हा रुसण्याचा प्रकार नव्हता, तर संघर्षाचा प्रकार होता. दोघांमधील संबंध इतके ताणले गेले की, राजाराम महाराजांनी संताजीस सेनापतिपदावरून दूर करून धनाजीस त्या पदावर नेमले; पण मुळातच महाराजांची प्रकृती क्षमाशील असल्याने त्यांनी संताजीची समजूत काढण्यासाठी आपला खास दूत विठ्ठल नीळकंठ यास महाराष्ट्रात पाठविले आणि धनाजीशी त्याची दिलजमाई करून त्यास पूर्ववत सेनापतिपदावर कायम केले- (फेब्रु. - मार्च १६९४). पण अवघ्या दोन वर्षांच्या अंतराने मागच्याच प्रसंगाची पुनरावृत्ती झाली. मे-जून १६९६ च्या सुमारास संताजीचे राजाराम महाराजांशी तिसऱ्यांदा बिनसले. या सर्व वृत्तांताची चर्चा मागे आलेलीच आहे. इथे महत्त्वाचा मुद्दा असा आहे की, संताजीने रुसावे, भांडून राजधानीबाहेर पडावे आणि मग राजाराम महाराजांनी आपण स्वतः जाऊन अथवा आपल्या दूताकरवी त्याची समजूत घालावी, हे असे किती काल चालावे? राजाराम महाराज सौम्य प्रकृतीचे व क्षमाशील होते हे खरे; पण त्यांच्या सौम्यप्रकृतीस व क्षमाशील वृत्तीसही काही मर्यादा या असणारच. त्या मर्यादा जेव्हा ओलांडल्या गेल्या तेव्हा संताजीचे अधःपतन हे अपरिहार्य ठरले.

रियासतकारांनी राजाराम महाराजांवर आणखी एक आरोप केलेला आहे. ते म्हणतात- "कासीमखान व हिंमतखान या दोघांचा पाडाव करून संताजीने जो अपूर्व विजय संपादिला त्याबद्दल त्यास योग्य प्रोत्साहन राजारामाने दिले नाही आणि धनाजीचा गौरव केला. हा अपमान संताजीला सहन झाला नाही. उलट त्याच्या दांडगाईबद्दल त्याचे सेनापतिपद काढून त्याला शासन करण्याचा हुकूम राजारामाने दिला. इतका प्रकार स्पष्ट दिसतो."[१२]

कासिमखान, खानाजादखान, हिंमतखान अशा पाच-सहा मोगल सरदारांवर नेत्रदीपक विजय कमवून संताजी जिंजीत दाखल झाल्यावर त्याचा गौरव व मानसन्मान न करता राजाराम महाराजांनी धनाजीचा गौरव केला, हा रियासतकारांचा तर्क आहे. कोणीही सुबुद्ध राज्यकर्ता असे वागणार नाही. अगोदरच या दोन सेनानींत स्पर्धा व हेवेदावे असताना ते वाढविणारी अशी कृती राजाराम महाराजांनी केली असेल, असे वाटत नाही. संताजीच्या या वितुष्टास त्याची, इंग्रज म्हणतात त्याप्रमाणे 'Nondutiful Behaviour' हीच खरी कारणीभूत होती.

रियासतकार सरदेसाई व सर जदुनाथ सरकार यासारख्या मान्यवर इतिहासकारांनी राजाराम-संताजी यांच्यामधील संघर्षाच्या मुळाशी जाण्याचा प्रयत्न केलेला दिसतो; पण तसे करीत असता त्यांनी काही अनैतिहासिक विधाने करून काही पोकळ तर्क केले आहेत, ते पाहण्यासारखे आहेत. सरकार लिहितात, "Flushed with his far-resounding victories over two First-grade Mughal generals, Santaji went to Jinji to wait on Rajaram. He seems to have claimed the office of Senapati, contrasting his own brilliant performances with Dhana's poor record of victories. Hitherto Prahlad Niraji (the Pratinidhi or regent) had, with great tact and diplomacy, kept peace between the two rival generals and taken great pains to show in all the acts of government that the

१२. स्थिरबुद्धि राजाराम, पृ. ८१-८२

king treated the two as absolutely equal. But he was now dead and his successor in the King's council was less clear and could not keep the balance even."[13]

*(मोगलांच्या प्रथम दर्जाच्या दोन सेनानींवर मिळविलेल्या नेत्रदीपक विजयाने फुलून गेलेल्या संताजीने जिंजीकडे राजारामाच्या दर्शनासाठी कूच केले. धनाजी जाधवाच्या किरकोळ कामगिरीच्या मानाने संताजीची तेजस्वी कामगिरी फारच उठून दिसत होती. स्वाभाविकच या पार्श्वभूमीवर (आता तरी) आपणास सेनापतिपद द्यावे, असा आग्रह संताजीने धरला. आतापर्यंत राजारामाचा कारभारी प्रल्हाद निराजी प्रतिनिधी हा मोठ्या युक्तीने व राजनैतिक हुशारीने या दोन सेनानींत सख्य राखण्यात आणि राजा आपल्या कारभारात या दोघांनाही सारखेच लेखतो असे भासविण्यात यशस्वी झाला होता. पण आता प्रल्हाद निराजीचे निधन झाले होते आणि प्रधान मंडळातील त्याच्या वारसदाराजवळ तेवढी हुशारी नसल्याने तो या दोन सेनानींत संतुलन राखू शकला नव्हता.)*

कासीमखान-हिंमतखान आदी सरदारांवर विजय मिळवून संताजी जेव्हा राजाराम महाराजांना भेटण्यास जिंजीत गेला त्यावेळी तो सेनापतिपदावर होता, त्याने सेनापतिपद मागण्याचा यावेळी प्रश्नच उद्भवत नव्हता. मराठी कागदपत्रांची दखल न घेतल्याने सरकारांसारख्या थोर इतिहासकाराचे हे विधान पूर्ण अनैतिहासिक बनले आहे. सरकारांचे प्रल्हाद निराजी प्रतिनिधीच्या संदर्भातील दुसरे विधान रियासतकारांच्या विधानावर आधारित आहे.[१४]

---

१३. History of Aurangzeb, Vol. V, p. 102

१४. रियासतकार म्हणतात : "स. १६९६ त संताजी व धनाजी यांचा तंटा विकोपास गेला. ते त्यांचे भांडण राजारामास मिटविता आले नाही, हे दुर्भाग्य होय. प्रल्हाद निराजी जवळ असेपर्यंत राजारामाची व्यवस्था सुरळीत चालली होती; पण तो स. १६९४ त जिंजी येथे मरण पावला तेव्हापासून राजारामाचा कारभार बिघडत गेला." - स्थिरबुद्धि राजाराम, पृ. ७२

प्रल्हाद निराजी हा अत्यंत बुद्धिमान प्रशासक होता व जिंजीमधील राज्यकारभाराची पहिली घडी बसविताना त्याचे राजाराम महाराजांना फार मोलाचे साहाय्य झाले हे खरे; पण संताजी-धनाजी यांच्यामध्ये सौहार्द राखण्यास तो कसा काय यशस्वी होत होता; तसेच छत्रपती दोघांना सारखेच लेखतात, ही संताजी-धनाजी यांना समजून सांगण्याची कामगिरी त्याच्यावर केव्हा सोपविली गेली होती, हे समजणे कठीण आहे. कारण कागदोपत्री त्यास पुरावा नाही. सरदेसाई-सरकार यांचा हा तर्काचा डोलारा आहे. वास्तविक उभय इतिहासकारांनी प्रल्हाद निराजीस याबाबतीत मोठे कर्तव्य बहाल करण्याचे व राजाराम महाराजांच्या कामगिरीस कमी लेखण्याचे काही प्रयोजन नव्हते; पण राजाराम महाराजांजवळ काही मुत्सद्देगिरी नव्हतीच आणि मुत्सद्देगिरीची मक्तेदारी फक्त त्यांचे कारभारी रामचंद्रपंत अमात्य व प्रल्हाद निराजी प्रतिनिधी यांच्याकडेच होती, असे गृहीततत्त्व स्वीकारल्याने अशा प्रकारची विधाने करण्याचा या इतिहासकारांना मोह होणे स्वाभाविक आहे.

गमतीची गोष्ट अशी की, सरदेसाई-सरकार यांच्या तर्काचा हा उपरोक्त डोलारा अलीकडे उपलब्ध झालेल्या कागदपत्रांच्या धक्क्याने कोसळून पडतो. सरदेसाई-सरकार यांनी म्हटले आहे की, प्रल्हाद निराजी स. १६९४ मध्ये जिंजी येथे मरण पावला; पण ही कागदपत्रे सांगतात की, प्रल्हाद निराजी हा पुढे जुलै १६९६ पर्यंत तरी निश्चितपणे जिवंत होता.[१५] संताजीचे राजारामाशी मे-जून १६९६ मध्ये बिनसले. म्हणजे प्रल्हाद निराजी त्यावेळी जिंजीत हयात होता व त्याच्यासमोरच हे प्रकरण झाले; पण मग तो संताजीस का आवर घालू शकला नाही? त्याची सरकार म्हणतात तशी 'great tact and diplomacy' निष्प्रभ ठरली की

१५. दि. २ जुलै, १६९६ रोजी छत्रपती राजाराम महाराजांनी प्रसिद्ध मराठा सरदार चांदजीराव पाटणकर यास कसबा रहिमतपूर येथे काही जमीन इनाम दिली. त्या इनामपत्राच्या अस्सल सनदेवर एका बाजूवर निळकंठ मोरेश्वर मुख्य प्रधान व प्रल्हाद निराजी प्रतिनिधी यांचे शिक्के आहेत. निदान या तारखेपर्यंत तरी प्रल्हाद निराजी हयात होता, असे समजण्यास हरकत नसावी - Records of Shivaji Period, p. 192

काय?

संताजी व धनाजी या दोघांमधील संघर्ष राजाराम महाराजांव्यतिरिक्त फक्त एकच व्यक्ती शमवू शकली असती आणि ती म्हणजे रामचंद्रपंत अमात्य. प्रल्हाद निराजी राजाराम महाराजांबरोबर स. १६८९ मध्ये जो जिंजीला गेला तो तेथेच राहिला. त्याचा संताजी-धनाजीशी तसा फार कमी संबंध आला. संताजी-धनाजीवर जसा रामचंद्रपंतांचा प्रभाव होता, तसा अष्टप्रधानांपैकी कोणाचाही नव्हता; पण पंतही या प्रकरणी काही करू शकला नाही, हीच मोठी दुःखद गोष्ट होती.

कासिमखान, खानाजादखान, हिंमतखान इत्यादी सरदारांवर मिळविलेल्या अभूतपूर्व विजयानंतर संताजी मोठ्या दिमाखाने जिंजीस गेला व तिथे आपल्या गर्विष्ठ स्वभावाने व शिरजोर वागण्याने त्याने जिंजी दरबारास दुखविले, असे जे सरकारांनी म्हटले आहे,[१६] ते पुढे ज्या घटना घडून आल्या त्याच्याशी सुसंगतच आहे. इंग्रज वखारवाले संताजीच्या या वागणुकीचे 'Nondutiful Behaviour' असे वर्णन करतात.[१७] सेनापतीची अशी वागणूक कोणती असू शकते? साहजिकच छत्रपतींची अवज्ञा करणे अशा स्वरूपाचीच ती असणार, असा जर तर्क बांधला तर तो चुकीचा ठरणार नाही. मग प्रश्न असा निर्माण होतो की, अशा प्रकारची बेशिस्त वर्तन करणाऱ्या सेनापतीशी छत्रपतींनी राज्यकर्ता म्हणून कसे वागावयास हवे होते? अशा सेनापतीस त्याच्या पदावरून दूर करून त्यास शिक्षा करणे हे छत्रपतींचे कर्तव्य नव्हे काय? राजाराम महाराजांनी हेच केले. ते राज्यकर्त्यांच्या कर्तव्यानुरूपच झाले.

यापूर्वी स्वराज्याच्या इतिहासात छत्रपती-सेनापती यांचे संघर्षाचे अथवा हर्षामर्षाचे प्रसंग उदभवले होते. पन्हाळ्याच्या हल्ल्याच्या प्रसंगी सेनापती नेताजी पालकरने ऐन प्रसंगी कुचराई केली आणि वर उद्धटपणे वर्तणूक केली. त्याची शिक्षा शिवाजी महाराजांनी त्यास त्याच्या पदावरून दूर करून दिली होती. महाराज नेताजीची

१६. History of Aurangzib, Vol. V, p. 102

१७. Fort St. David & Consultations, 1696, p. 67

समजूत घालत बसले नाहीत. दुसरा सेनापती प्रतापराव गुजर याचीही महाराजांनी गय केली नाही. खासा बहलोलखान तावडीत सापडला असता त्यास सहिसलामत कसा जाऊ दिला याचा जाब त्यांनी सेनापतीस खडसावून विचारला. मानी प्रतापरावास एवढे खडसावणे म्हणजे मरणप्राय शिक्षाच होती. शिवाजी महाराजांप्रमाणे राजाराम महाराजांची प्रकृती कडव्या शिस्तीची नव्हती. म्हणून तर त्यांनी दोन वेळा संताजीची समजूत काढून त्यास सांभाळून घेतले; पण संताजीच्या वागण्याची तिसऱ्यांदा पुनरावृत्ती झाल्यावर त्यांनी त्याची समजूत घालण्याच्या भरीस न पडता त्यास पदावरून दूर केले. यात छत्रपतींच्या थोरवीस काही लांच्छन लागले, असे आम्हास वाटत नाही.

## संताजी, धनाजी आणि रामचंद्रपंत अमात्य

संताजी व धनाजी हे दोन्ही सेनानी आपल्या कर्तबगारीने पुढे आले ते राजाराम महाराजांच्या कारकिर्दीत. दोघेही मोठे पराक्रमी असल्याने त्यांनी मराठ्यांच्या स्वातंत्र्ययुद्धाच्या काळात लष्करी आघाडी मोठ्या समर्थपणे सांभाळली. दोघेही जवळजवळ सारखेच पराक्रमी असल्याने राजाराम महाराजांना आपल्या कारकिर्दीत राज्याचे सेनापतिपद कोणास द्यावे, याचा निर्णय लवकर घेता आला नाही. संभाजी महाराजांच्या हत्येच्या वेळी मराठ्यांचे सेनापतिपद रिकामेच होते. ते पुढे राजाराम महाराजांच्या कारकिर्दीच्या प्रारंभीच्या काळी कित्येक दिवस रिकामेच राहिले. महाराजांनी संताजी व धनाजी या दोघांनाही सारख्याच योग्यतेची लष्करी पदे व अधिकार दिलेले होते. १३ एप्रिल, १६९० च्या महाराजांच्या एका पत्रात "रा। संताजी घोरपडे व रा। धनाजी जाधव उभयता पंचसहस्री" असा एक उल्लेख आलेला आहे.[१८] यावरून महाराजांनी उभयतांना लष्करातील सेनापंचसहस्रीचा हुद्दा व अधिकार दिलेला होता, हे उघड आहे; पण सेनापतीविरहित लष्कर अथवा राज्य तसेच ठेवणे हे उचित नव्हे, याची जाणीव त्यांना होती. दोघांपैकी एकाची निवड त्या पदावर करणे गरजेचे होते आणि शेवटी त्यांनी संताजीची निवड सेनापती म्हणून केली - (सु. ऑगस्ट १६९१).

१८. Records of Shivaji Period, p. 179

संताजी-धनाजीपैकी एकाची निवड करणे, ही मोठी अवघड कामगिरी होती. दोघेही पराक्रमी. दोघेही सेनापतिपदासाठी तितकेच उत्सुक. शौर्य, पराक्रम, रणनीती आदी गुणांची उंचीच मोजायचे म्हटले, तर संताजीचे गुण धनाजीहून काकणभर चढ भरले असते; पण तरीही राजाराम महाराजांनी त्याची लगेच सेनापतिपदावर नियुक्ती केली नाही. याचे कारण ते त्याच्या स्वभावाबद्दल साशंक असावेत. तापट व कुणाच्याही रागलोभाची पर्वा न करणारा हा संताजी इतर सेनानींशी, प्रसंगी त्यांच्या चुका पोटात घालून, सांभाळून घेऊ शकेल का, हा प्रश्न त्यांना सतावत असावा. स्वराज्य एका भयानक आपत्तीमधून चालले होते. अशा वेळी राज्यातील नाना प्रवृत्तींच्या सेनानींशी स्नेहभावाने वागून त्यांच्याकडून गोडीने काम करून घेणारा सेनापती महाराजांना हवा होता आणि असे गुण त्यांना धनाजीमध्ये दृग्गोचर होत होते. स्वाभाविकच महाराजांना हे पद संताजीऐवजी धनाजीस द्यावे, असे मनातून वाटत होते; पण याच वेळी स्वराज्यातील ज्येष्ठ मुत्सद्दी रामचंद्रपंत याने संताजीच्या पारड्यात आपले वजन टाकल्याने व सेनापतिपदावर संताजीसच नेमावे, असा आग्रह धरल्याने शेवटी महाराजांना मनातील गोष्ट बाजूला ठेवून संताजीस सेनापती करावे लागले. रामचंद्रपंत म्हणजे मोठा कर्तबगार माणूस. संभाजी महाराजांच्या वधानंतरच्या पडत्या काळात महाराष्ट्रातील कारभाराची धुरा तो यशस्वीपणे सांभाळत होता. त्याचे मन दुखवून काही करावे, ही गोष्ट उचित ठरणार नाही, असा महाराजांनी सुज्ञ विचार केला असावा.

बखरकार मल्हार रामराव चिटणीस याने संताजीच्या सेनापतिपदावरील नेमणुकीची कथा सांगितली आहे. मल्हार रामरावाने दिलेला नेमणुकीचा काळ चुकला असला, तरी त्यावेळी कोणते राजकारण घडले होते, याची थोडी बहुत कल्पना आपणास येते. "आमचे मनात धनसिंग जाधवराव यास हे पद द्यावे असे होते, तुमची मर्जी यास देण्याची, तरी देतो.'[१९] असे एक वाक्य त्याने राजाराम महाराजांच्या तोंडी घातले आहे. हे वाक्य तत्कालीन राजकारणाचे बरेच स्पष्ट दर्शन

१९. चिटणीसकृत राजाराम महाराजांचे चरित्र, पृ. ९

आपणास घडविते.

संताजी-धनाजी यांच्यामधील वैयक्तिक स्पर्धेची (ज्याचे रूपांतर पुढे हेवेदाव्यात झाले) सुरुवात येथून झाली. सेनापतिपदावरील आपला हक्क डावलला गेला, असे वाटून धनाजी मनातून दुखावला गेला असणे अगदी स्वाभाविक होते.

पुढे काही वेळा संताजी-धनाजी ही जोडगोळी शत्रूच्या प्रदेशात संयुक्त मोहिमा काढताना दिसून येत असली, तरी त्यांची कार्यक्षेत्रे बव्हंशी एकमेकांपासून स्वतंत्र अशीच राहिली. या दोघांची कार्यक्षेत्रे एकमेकांपासून स्वतंत्र राहण्यास आणखी एक घटना कारणीभूत झाली. ती म्हणजे स. १६९० सालीच राजाराम महाराजांनी महाराष्ट्रातील कारभाराची केलेली विभागणी.

राज्यकारभाराच्या सोयीसाठी महाराजांनी द. कोकण व देशावरील साताऱ्याच्या दक्षिणेकडील प्रदेश रामचंद्रपंताकडे आणि उ. कोकण व देशावरील साताऱ्याच्या उत्तरेकडील प्रदेश शंकराजी नारायणकडे दिलेला होता. याच वेळी संताजीने रामचंद्रपंताच्या हाताखाली तर धनाजीने शंकराजी नारायणच्या हाताखाली कार्य करावे, अशी योजना केली होती.[२०] संताजी हा पंतांच्या मर्जीतील असल्यामुळे त्यास पंताकडे दिले गेले होते, असे वाटते. पंताची अशी खास मर्जी असल्यामुळेच त्याने संताजीसाठी राजाराम महाराजांकडे आग्रह धरला होता. पंतासारख्या ज्येष्ठ कारभाऱ्याने संताजीची बाजू घेतल्यामुळे धनाजीस स्वस्थ बसण्याशिवाय दुसरा पर्याय राहिला नव्हता.

पण रामचंद्रपंत व संताजी यांच्या दरम्यानचे हे सख्यत्वाचे संबंध फार काळ टिकू शकले नाहीत. स. १६९३ साली ते ताणले गेल्याचे दिसून येते. स. १६९३ च्या मे महिन्यात राजाराम महाराजांशी बिनसून संताजी महाराष्ट्रात आल्यावर प्रथेप्रमाणे पंताची भेट न घेता परस्पर आपल्या साताऱ्याच्या प्रदेशात छावणीसाठी निघून गेला. संताजीने आपली भेट घेण्याचेही सौजन्य दाखवले नाही याचे पंतास मोठे वैषम्य वाटले व त्याने

२०. भा. इ. सं. मं. त्रैमासिक, वर्ष ९, अं. ४, पृ. ६६-६७

त्यास बोल लावला. या पार्श्वभूमीवर संताजीने जे एक पत्र पंतास लिहिले आहे, ते त्याच्या पंताशी असणाऱ्या संबंधांवर बराच प्रकाश टाकते. हे पत्र तत्कालीन राजकारणाच्या अभ्यासास उपयुक्त आहेच, शिवाय भाषेच्या दृष्टीने पाहिल्यास शिवकालीन मराठी साहित्यात ललामभूत ठरू शकेल असे आहे. मूळ पत्र असे आहे -[२१]

"श्री

राजश्री पंत अमात्य स्वामीचे शेवेसी

सकल गुणालंकरण अखंडितलक्ष्मी आलंकृत राजमान्ये स्नो। संताजी घोरपडे सेनापती जप्तन मुलुक दंडवत विनंती. येथील कुशल तो प्रताप स्वामीचा जाणऊन स्वानंद वैभव लेखन केले पाहिजे. विशेष स्वामीनी राजश्री सेखोजी बरगे व बाजी शिंदे याजबरोबरी कितेक बुधीवाद सांगोन पाठविला की आपली भेट घेतली नाही, परस्पर निघोन गेलेत, म्हणऊन शब्द लाविला. यैसायास स्वामीची आमची क्रिया यैसी नाही जे स्वामीसी द्वैतभाव धरावा. आम्ही त्या प्रांती (जिंजी) असता दाहा विसाचे साक्षीनसी ऐकिले की संताजी घोरपडीयास त्या प्रांते (जिंजी) ठेऊन रा। धनाजी जाधवरायास पाठऊन देणे म्हणऊन पत्रे राजश्रीस (राजाराम महाराजांस) लिहिली. त्यावरूनच द्वैतभाव दिसून आला. स्वामीचे आज्ञेव्यतिरिक्त आम्ही काहीच नव्हतो. विश्वासाची जाती म्हणावी तरी स्वामीचे आमचे शफथ तुलसी बेलाचे श्रीवरील आहेत. स्वामीचे मांडीवरी आम्ही उसे ठेऊन निजावे आमचे मांडिवरी स्वामीनी उसे ठेवावे; शरीर मात्र भिंन आत्मा एक. यैसे असतां हे गोष्टी द्वैताची होऊन आली. म्हणऊनच वीतरागे येणे जाहले. गतवर्षापासून श्रमाची जाती म्हणावी, तर कागदी लिहिता पुरवीत नाही. बरे जे गोष्टी जाहली ते जाहली.

---

२१. सदर पत्र पंत अमात्य बावडा दप्तर भाग १ मध्ये प्रसिद्ध झालेले असून त्यावर तारीख नाही. संपादकांनी अंदाजे काल इ. स. १६९४ असा दिलेला आहे; पण पत्रातील मजकुरावरून त्याचा काल स. १६९३ चा असावा, असे वाटते. पत्रांतर्गत "अलिमर्दानखान घेतला म्हणऊन आइकिले" असे एक वाक्य आहे. अलिमर्दानखान संताजीने १४ डिसें., १६९२ रोजी घेतला. स. १६९३ च्या मे-जूनच्या सुमारास संताजी महाराष्ट्रात आला. त्यानंतर त्याने हे पत्र लिहिले आहे.

याउपरी तरी तऱ्ही राज्यात डोहणा न होये तो पदार्थ केला पाहिजे. द्वैतभाव दिसोन आला होता. म्हणऊनच येणे जाहले होते. त्यास राजश्री सेखोजी बरगे व बाजी सिंदे याजपासी (पंतानी) स्वमुखे सांगितले की आपण काही संताजीस ठेऊन घेऊन धनाजी जाधवरायास पाठविणे यैसे लिहिले नाही, म्हणऊन शफतपूर्वक सांगितले. त्यावरून बाजी सिंदे यसाचे साक्षीनसी माईनिलेनी आम्हास सांगितले. वरकडही कितेक भावार्थ व मानाजी मोऱ्याचे वर्तमान व आणिखी श्नेहाची उत्तरे सांगोन पाठविली. त्यावरून द्वैतची गोष्टी होती ते स्वामीचेच (पंताच्या) वचनावरून दूर केली; आम्ही लोकाचे बले द्वैत धरले होते ते आम्हापासून अंतर पडिले. आपणही त्या गोष्टीचे काही मनात विकल्प धरिला न पाहिजे. आणिखी स्वामिनी (पंतानी) येक शब्द लाविला की राजश्री छेत्रपती स्वामीची भेटी जाहली ते समई बहुमान जाहला. तेव्हा आमचा मान काढिला नाही, म्हणऊन शब्द लाविला, येसीयास + + + + छेत्रपती स्वामीची व आमची + + वचने सीफारसीची जाहली, काय काय चाकरी केली असेल ते एक श्री जाणे. कोणे गोष्टीस अंतर पडिले नाही. आम्ही यैसे सेवक नव्हे जे स्वामीचे स्मरण न करिता आधी आपला बहुमान घेऊन. याचा परीणाम कागदी काय म्हणऊन लिहावा. भेटी अंती कळी येईल तुम्ही आपले स्मरण राजश्रीपासी केले नाही; परंतु अलिमर्दानखान घेतला म्हणऊन आइकिले, (छत्रपतींनी) विजयी वस्त्रे पाठविली. म्हणऊन लिहिले. त्यावरून अपूर्व वाटले. स्वामी वडील. हे येश येते ते स्वामीचेच पुण्य +++ येते. आमचा अभिमान सर्व गोष्टीचा स्वामीस. पूर्वीपासूनही आम्हास स्वामीनी गौरविले. तेथे वस्त्राचेच काय म्हणऊन आम्ही लियाहावे. पूर्वीपासून अंगिकार आमचा स्वामीनी केला आणि बंधू म्हणविले, तोच सिधी पाविला पाहिजे. वरकड विस्तार ल्याहावे तरी लिहिजेसा पदार्थ नाही. राजश्री सेखोजी बरगे व बाजी सिंदे मुखवचने सांगतील. ती वचने आमचीच यैसी मानून श्री सिवनाथदेव[२२] कृष्णेपासी आहे, तेथे आपण आले पाहिजेत. आम्ही येऊन स्वामीची आमची भेटी

---

२२. याचा शोध लागत नाही. हे साताऱ्याच्या प्रदेशातील कृष्णेकाठचे एखादे गुप्त ठिकाण असावे.

होऊन श्रीचे व कृष्णेचे साक्षिनसी बेलतुलसी होतील. मग जो विचार करणे तो केला जाईल. स्वामीवितरिक्त आम्ही काही नाही. जैसी पूर्वी आज्ञेप्रमाणेच (वर्त)णूक केली तैसीच करून. कलले पाहिजे."

विलसति लेखनावधि :[२३]

संताजीचे हे पत्र रामचंद्रपंताशी त्याचे असलेल्या संबंधाच्या दृष्टीने अत्यंत महत्त्वाचे आहे. संताजीस जिंजी प्रांते ठेवून घ्यावे व धनाजीस इकडे महराष्ट्रात पाठवावे, अशी पंताने छत्रपतीस पत्र लिहिल्याचे दहा-वीस लोकांच्या साक्षीने आपण ऐकल्याचे संताजी लिहितो. पंताने असा द्वैतभाव का धरावा, याचा संताजीस राग आला. पंताशी आपले संबंध असे की, एकमेकांनी एकमेकांच्या मांडीवर उसे ठेवून निजावे. 'शरीर मात्र भिंन आत्मा एक', असे असूनही पंताने द्वैतभावाने वागावे, याबद्दल संताजीस खेद वाटून त्याचे परस्पर वीतरागे येणे झाले.

लिहिण्याच्या ओघात संताजी एक वाक्य लिहून जातो : 'याउपरी तऱ्ही राज्यात डोहणा न होये तो पदार्थ केला पाहिजे.' याचा अर्थ राज्यातील डोहण्याची जबाबदारी संताजी हा राजाराम महाराज व रामचंद्रपंत यांच्यावर टाकतो. एका दृष्टीने ते योग्यच होते. कारण राज्याचे प्रमुख म्हणून ती त्यांची जबाबदारी होती.

पण जेव्हा आपण छत्रपतींना तशी पत्रे लिहिलीच नाहीत, असा शपथपूर्वक निरोप पंताने संताजीकडे सेखोजी बरगे व बाजी शिंदे यांच्यामार्फत पाठविला, त्यावेळी पंताच्या शब्दांवर विश्वास ठेवून संताजीने आपल्या मनातील किल्मिश काढून टाकले व पंतासही विनंती केली की : 'आपणही त्या गोष्टीचे काही मनात विकल्प धरिला न पाहिजे.'

पत्रात आणखी एक महत्त्वाची बाब आलेली आहे. डिसें. १६९२ मध्ये संताजीने जिंजीकडे जात असता मार्गात प्रसिद्ध मोगल सरदार अलिमर्दानखान घेतला. त्यास कैद करून जिंजी किल्ल्यात नेले. मोठा विजय प्राप्त केला. या वेळी राजाराम महाराजांनी संताजीचा मोठा

२३. पंत अमात्य बावडा दप्तर, भाग १, पृ. ५३-५५

मानसन्मान केला. या बहुमानाच्या प्रसंगी संताजीने महाराजांपाशी 'आमचा मान काढला नाही' असा शब्द पंताने त्यास लावला. पंताच्या या तक्रारीवर संताजीने मोठे मार्मिक उत्तर दिले आहे. तो म्हणतो : "छत्रपतींच्या भेटीच्या प्रसंगी त्यांच्याशी स्वामींच्या (पंताच्या) शिफारशीविषयी काय काय बोलणी झाली आणि अशा प्रकारे आपण स्वामींची कशी चाकरी केली ही एक श्रीच जाणे; कोणत्याही गोष्टीचे आपणाकडून अंतर पडले नाही; आम्ही असे सेवक नाही की, जे स्वामींचे स्मरण न करता आधी आपला बहुमान करून घेऊ; छत्रपतींशी जी बोलणी झाली ती कागदावर लिहून कळवावी अशी नाहीत; भेटी अंती सर्व कळो येईल."

संताजीने अलिमर्दानखान जिंकला. या कामगिरीवर खूश होऊन छत्रपतींनी त्यास विजयी वस्त्रे बहाल केल्याचे आपण परस्पर ऐकले; पण आपणास संताजीने काही हा समाचार कळविला नाही, अशी दुसरी एक पंताची तक्रार होती. पंताच्या या तक्रारीचे निरसन करताना संताजीने म्हटले आहे की : 'स्वामी वडील आहेत; जे यश आपणाशी मिळते ते त्यांच्याच पुण्याईने मिळते; स्वामींनी पूर्वीपासून आमचा अभिमान धरला आहे; आम्हास गौरविले आहे; अशा स्थितीत आमच्यासारख्यांनी विजयीवस्त्रासारख्या गोष्टीसंबंधी काय म्हणून लिहावे? पूर्वीपासून आपला बंधू म्हणून स्वामींनी आपला अंगीकार केला आहे; हेच बंधुत्वाचे नाते अखेरपर्यंत सिद्धीस जावो!'

रामचंद्रपंत व संताजी यांची ही जुगलबंदी पाहिल्यावर असे वाटते की, लहानसहान गोष्टींनीसुद्धा या बड्या मंडळींत गैरसमज निर्माण होत होते. महाराष्ट्रातील कारभाराची सर्वेसर्वा: सत्ता हाती असूनसुद्धा पंतासारख्या प्रौढ मुत्सद्याने 'छत्रपतींजवळ तुम्ही आमचा मान काढला नाही' असा बोल संताजीस लावावा, ही मोठी विलक्षण गोष्ट मानावी लागेल. अलिमर्दानखान घेतला संताजीने; पण त्याचा बहुमान होताच त्याचे अभिनंदन करणे बाजूला राहोच; पण आपल्याच मानपानाच्या गोष्टी काढीत बसणाऱ्या पंतास पाहून मोठे आश्चर्य वाटते! यास पंताची ही क्षुद्र व स्वार्थी भावना याशिवाय काय म्हणता येईल?

वतने, इनामे, बक्षिसे, मानसन्मान यांविषयी पंताचा लोभ अनावर होता, यास बावडा दप्तरातील अनेक कागदपत्रे साक्षी आहेत. त्यास पंताचे असे हे वागणे पूरक ठरते हे मात्र खरे.

या पार्श्वभूमीवर संताजीच्या मनाचा सरळपणा उठून दिसतो. पंताविषयी त्याची मोठी आदराची भावना आहे. पंतास तो 'स्वामी' म्हणूनच संबोधितो व आपणास जे यश येते ते 'स्वामींच्या पुण्याईनेच' अशी श्रद्धा तो बाळगतो. अशा परिस्थितीत पंताने क्षुल्लक गोष्टीकडे लक्ष न देता संताजीचा गौरव करून त्यास प्रोत्साहन दिले असते, तर त्याच्यासारखा भावनावश माणूस दूर गेला नसता. पत्रात निर्देश केल्याप्रमाणे कृष्णेकाठी शिवनाथाच्या मंदिरात पंताची भेट झाली असेलही; पण त्यामुळे उभयतांची मने पूर्ण निवळली असतील, असे वाटत नाही. कारण इतिहास दर्शवितो की, येथून पुढे संताजी रामचंद्रपंतापासून दूर दूर होत गेला व काहीसा शंकराजी नारायणाच्या प्रभावाखाली आला, तर शंकराजी नारायणाच्या हाताखाली असणारा धनाजी रामचंद्रपंताच्या प्रभावाखाली गेला. स. १६९४ साली राजाराम महाराजांनी विठ्ठल नीळकंठ हा आपला खास दूत महाराष्ट्रात पाठवून संताजीची समजूत घातली. विठ्ठल नीळकंठ याने प्रथम रामचंद्रपंताकडे जाऊन त्यास त्याने आपली कामगिरी सांगितली. पंताने आपला प्रतिनिधी म्हणून परशुराम त्र्यंबकास विठ्ठल नीळकंठाबरोबर पाठविले. ते दोघेजण साताऱ्यास संताजी-धनाजीच्या भेटीस गेले. तेथे बोलणी होऊन उभय सेनानींत दिलजमाई केली गेली. संताजीकडे पूर्ववत सेनापतिपद राखले गेले. इथे एक महत्त्वाची गोष्ट खटकते. ती म्हणजे रामचंद्रपंतासारखा ज्येष्ठ मुत्सद्दी व कारभारी महाराष्ट्रात असता संताजी-धनाजीची दिलजमाई करण्यासाठी राजाराम महाराजांना जिंजीहून खास दूत का पाठवावा लागला? पंतासारख्या वडील राजकारण्यास या दोन्ही सेनानींत ऐक्य घडवून आणणे का अशक्य व्हावे? आपला प्रतिनिधी म्हणून विठ्ठल नीळकंठबरोबर परशुराम त्र्यंबकास पाठविण्यापेक्षा पंताने संताजी-धनाजीसच समक्ष बोलावून त्यांची दिलजमाई करणे इष्ट नव्हते काय? पंताचा तेवढा अधिकार होता. पंताचा शब्द उभय सेनानींनी मोडला

असता, असे वाटत नाही.

पण रामचंद्रपंताकडून हे शक्य झाले नाही, हे सत्य आहे. कारणे समजू शकत नाहीत; पण जे काम पंताकडून अपेक्षित होते ते महाराष्ट्रातील दुसऱ्या क्रमांकाचा मुत्सद्दी व कारभारी शंकराजी नारायण याने केले, हे विशेष आहे. संताजीच्या उद्दाम वाटणाऱ्या वर्तणुकीबद्दल शंकराजी नारायणने खडसावून हितोपदेश केला - "फौजेनसी जाऊन साहेब काम करावे. राजश्री स्वामीजवळ मुद्दे घालू नयेती. मर्यादेने वेढा उठवावा. बेमानी करू नये."[२४]

जिंजीत राजाराम महाराजांशी वितुष्ट येताच संताजीचे सेनापतिपद काढून घेतले गेले व ते धनाजीस दिले गेले; पण महाराजांना या उभय सेनानींत दिलजमाई करून पुन्हा संताजीस ते पद द्यावे लागले. या घटनेतून दोन गोष्टी ध्वनित होतात. पहिली अशी की, स्वराज्याचा सेनापती म्हणून संताजी असणे अपरिहार्य होते आणि दुसरी अशी की, राजाराम महाराजांशी ज्या अनेक कारणांवरून संताजीचे वितुष्ट झाले त्यामध्ये उभय सेनानींमधील हर्षामर्ष हे मुख्य कारण असावे. अन्यथा महाराजांना उभय सेनानींत दिलजमाई करण्याची निकड भासली नसावी. आणखी एक गोष्ट नमूद केली पाहिजे, ती म्हणजे महाराजांच्या केवळ निरोपावरून धनाजीने काही खळबळ न करता आपले सेनापतिपद संताजीकडे सुपुर्द केले. हा त्याच्या मनाचा मोठेपणा होता हे खरे; पण या प्रसंगी त्यास काहीच वैषम्य वाटले नसावे असे कसे म्हणावे?

## संताजीची स्वभावप्रकृती

शरीरप्रकृतीप्रमाणेच माणसाची स्वभावप्रकृती त्याच्या जीवितकार्यावर परिणाम घडवून आणते. विशेषतः राज्यकर्त्यांची प्रकृती तर सर्व राज्यावरच परिणाम घडवून आणत असते. राजाराम महाराज, नानासाहेब पेशवा, माधवराव पेशवा (पहिला) या राज्यकर्त्यांच्या शरीरप्रकृतीने अकालीच दगा दिल्याने तत्कालीन इतिहास वेळोवेळी बदलत गेला, तर संभाजी महाराज, शाहू महाराज, राघोबा, नाना

२४. शिवचरित्र साहित्य, पृ. ३७

फडणविस यांच्या स्वभावप्रकृतींनी तत्कालीन इतिहासास वेळोवेळी बरेवाईट वळण लावले. राज्याच्या संरक्षणाची मदार ज्या सेनापतीवर असते त्याच्याही बाबतीत थोडाफार याचा प्रत्यय आल्याशिवाय राहत नाही. संताजीच्या अंगी असणाऱ्या शौर्यपराक्रमादी गुणांमुळे तो मराठ्यांच्या इतिहासातील महान सेनापती बनला खरा; पण आकाशातील उल्केप्रमाणे त्याचा जो अस्त घडून यावा, त्यास त्याची स्वभावप्रकृतीच मुख्यत्वेकरून कारणीभूत होती.

संताजीची स्वभावप्रकृती म्हणजे अनेक प्रखर गुणदोषांचे विस्मयजनक रसायनच होते. सातव्या शतकात हिंदुस्थानात येऊन गेलेला युआन श्वान या चिनी प्रवाशाने लिहून ठेवले आहे की, मराठे हे शरणागतास जीवनदान देणे हा युद्धधर्म मानतात. संताजी हा युद्धधर्म मानणारा होता. दोड्डेरीच्या महान विजयानंतर शरण आलेल्या मोगल सरदारांना व सैनिकांना त्याने अभय दिलेच; पण किल्ल्याबाहेर पडल्यावर एका बाजूने भाकरी, तर दुसऱ्या बाजूने पाणी अशी त्यांची अन्नपाण्याची व्यवस्था करून त्यांच्या गलितगात्र शरीरात त्याने तवानेपणा आणला. कित्येक दिवस उपासमारीने तडफडणाऱ्या मोगल सैनिकांना संताजीच्या या औदार्याचे आयुष्यभर स्मरण राहिले असेल. संताजी एवढ्यावरच थांबला नाही, तर त्याने खानाजादखानादी सरदारांना आपले खास लष्करी पथक सोबत देऊन दोड्डेरीहून सुखरूपपणे रवाना केले.

लष्करी जीवनामधील संताजीचा हा मनाचा मोठेपणा त्याच्या खाजगी जीवनातही दिसून येतो. पोट भरण्यासाठी कोकणातून देशावर आलेल्या गरीब; पण कर्तबगार अशा नारो महादेव या ब्राह्मण भिक्षुकाच्या मुलास संताजीने आपल्या पदरी ठेवून घेतले, इतकेच नव्हे तर त्यास आपला पुत्र मानले. संताजीने त्याच्यावर मायेची पखरण घातली. तेव्हा आपल्या धन्याचे उतराई होण्यासाठी नारो महादेव याने आपले जोशी हे आडनाव टाकून देऊन धन्याचे घोरपडे हे आडनाव स्वीकारले.[२५] हा नारो

२५. इचलकरंजी संस्थानचा इतिहास, पृ. १३

महादेव म्हणजे कोल्हापूरजवळच्या इचलकरंजी या संस्थानचा संस्थापक होय. संताजीने एका ब्राह्मणपुत्रास आपला पुत्र मानावे व त्या ब्राह्मणपुत्राने धन्याचे आडनाव आपल्या कुलास जोडावे, ही घटना संताजीच्या व्यक्तिमत्त्वाचे एक आगळे दर्शन घडविते.

संताजीची प्रकृती ही राजकारण्याची अथवा मुत्सद्द्याची नाही. ती आहे सच्च्या सेनानीची प्रकृती. त्याच्या ठिकाणी छक्केपंजे नाहीत. सगळा उघड मामला आहे. कर्नाटकातून महाराष्ट्रात आल्यावर आपली भेट घेतली नाही, असा बोल रामचंद्रपंताने त्यास लावला तेव्हा संताजी आपली तक्रार काही आडपडदा न ठेवता बोलून दाखवितो आणि पंताकडूनच द्वैतभावाची वर्तणूक झाल्याचे निदर्शनास आणतो; पण पुढे पंताने स्नेहभावाचा निरोप पाठविल्यावर आपल्या मनातील विकल्प दूर झाल्याचेही प्रांजलपणे कबूल करतो. खुद्द छत्रपतींशीही वागण्याची त्याची हीच तऱ्हा दिसते. आयेवारकुटीच्या लढाईत छत्रपती व धनाजी या दोघांचाही पराभव केल्यावर दुसरे दिवशी संताजी आपले हात बांधून छत्रपतीसमोर उभा राहतो व क्षमायाचना करतो : "तुम्ही धनाजीला माझ्या बरोबरीचा दर्जा देऊ इच्छित होता, म्हणून मला, असे उद्धटपणे वागणे भाग पडले;"[२६] अशी स्पष्ट कबुली देतो.

संताजी हा छत्रपती शिवाजी महाराजांच्या तालमीत वाढलेला म्हणजे राजकीय तत्त्वज्ञानाच्या मुशीतून तयार झालेला सेनानी होता. शिवाजी महाराजांच्या राजकीय तत्त्वज्ञानात स्वराज्यनिर्मिती, स्वराज्यसंरक्षण व स्वराज्यनिष्ठा या तत्त्वत्रयींना पायाभूत महत्त्व होते. शिवाजी महाराजांच्या तालमीत तयार झालेल्या व नंतर संभाजी-राजाराम-ताराबाई या राज्यकर्त्यांच्या कारकिर्दीतील स्वातंत्र्ययुद्धाच्या आणीबाणीच्या कालखंडात स्वराज्यसंरक्षणासाठी आपले जीवन समर्पित करणाऱ्या रामचंद्रपंत, प्रल्हाद निराजी, खंडो बल्लाळ, संताजी, धनाजी, शंकराजी नारायण इत्यादी व्यक्तींवर या राजकीय तत्त्वज्ञानाचा फार मोठा प्रभाव होता. हे राजकीय तत्त्वज्ञान, म्हणजे शिवाजी

२६. मराठे व औरंगजेब (मासिरे आलमगिरी), पृ. ७१

महाराजांची शिकवणूक, ही मंडळी विसरली नव्हती. म्हणूनच स्वराज्याच्या पडत्या काळात त्यांनी स्वराज्यास पारखे होऊन मोगलांची बाजू धरली नाही. निराशेच्या घोर अंधकारातही ते स्वराज्याचाच विचार करीत राहिले. या मंडळींत संताजी घोरपडे याचे स्थान प्रथम दर्जाचे मानले पाहिजे. कारण २०/२५ हजारांची जंगी फौज बाळगणारा हा मराठ्यांचा सेनापती प्रत्यक्ष छत्रपतीशी रुसला, भांडला एवढेच नव्हे तर लढलाही; पण शत्रूस जाऊन मिळाला नाही! स. १६९३ व स. १६९६ अशा दोन्ही वितुष्टांच्या प्रसंगी तो राजाराम महाराजांपासून दूर झाला असताही मोगलांशी लढत राहिला; ही मोठी विस्मयजनक स्वराज्यनिष्ठा म्हटली पाहिजे! खुद्द शिवाजी महाराजांच्या कारकिर्दीत मोगलांना मिळून त्यांच्याकडून आपल्या आयुष्याचे भले करून घेण्याचा मोह प्रतिशिवाजी मानला गेलेल्या नेताजी पालकरसारख्या खंद्या सेनापतीसही टाळता आला नाही! एवढेच कशाला, खुद्द शिवाजी महाराजांच्या पुत्रास - संभाजी राजास - या मोगली वैभवाची व मन्सबीच्या मानमरातबाची भुरळ पडून त्याच्याही हातून शत्रूस मिळण्याचा प्रमाद घडून आला होता! या सर्व पार्श्वभूमीवर खुद्द छत्रपतींशी वितुष्ट येऊनसुद्धा मोगलांना न मिळता त्यांच्याशी लढत राहणे, ही बाब अतुलनीय स्वराज्यनिष्ठेची निदर्शक होती, असे म्हटल्यास वावगे होणार नाही.

येथे आणखी एक मुद्दा विचारात घेतला पाहिजे. तो म्हणजे नेताजी पालकर शिवाजी महाराजांवर रुसून शत्रूस मिळाला तेव्हा स्वराज्याचे फार मोठे नुकसान झाले नाही. कारण एक तर त्याच्याबरोबर स्वराज्याचे लष्कर गेले नाही आणि दुसरे असे की, स्वराज्याचा शकट शिवाजी महाराजांसारख्या धुरंधर राज्यकर्त्याच्या हाती होता; पण राजाराम महाराजांच्या काळात परिस्थिती बदललेली होती. संताजीसारखा असामान्य सेनापती आपल्या २०/२५ हजार फौजेनिशी मोगलांना मिळाला असता, तर दक्षिणेतील मोगल-मराठा युद्धातील लष्करी संतुलनच बिघडले असते व त्याची फळे स्वराज्याला भोगावी लागली असती.

स्वराज्यनिर्मितीबरोबरच शिवाजी महाराजांनी नव्या राज्याचे

काही नवे दंडक निर्माण केले होते. या नव्या दंडनीतीचा प्रभाव थोडाबहुत का होईना; पण स्वातंत्र्ययुद्धातील मराठी नेत्यांवर होता. पुढे शाहू महाराजांच्या कारकिर्दीत हा प्रभाव पूर्णपणे पुसला गेला, ही गोष्ट अलाहिदा; पण राजाराम महाराजांच्या कारकिर्दीत संताजीसारखी काही मंडळी शिवाजी महाराजांच्या दंडनीतीच्या ढासळणाऱ्या बुरुजांचे संरक्षण करण्यासाठी धडपडत होती, असे दिसते. स. १६९१ सालचे एका वतनाच्या खटल्यासंबंधीचे संताजीचे एक पत्र उपलब्ध आहे. त्यात वतनपद्धतीसंबंधी एक वाक्य संताजी जाता जाता लिहून जातो : "यैसीयासी आमच्या राज्यात नवी वृत्ती दुमाला करावी यैसा दंडक नाही."[२७] हे एक वाक्य संताजीवर पडलेल्या शिवाजी महाराजांच्या शिकवणुकीच्या प्रभावाविषयी खूप काही सांगून जाते. संताजीने योजलेला 'आमच्या राज्यात' हा शब्दप्रयोग त्याची स्वराज्याबद्दलची आपुलकी, प्रेम व निष्ठा या गुणांचा निदर्शक आहे, तर "नवी वृत्ती दुमाला करावी यैसा दंडक नाही" हा उत्तरार्ध शिवाजी महाराजांची दंडनीती संताजीच्या ठिकाणी कशी बाणली होती, याचा तो दाखला आहे.

असा हा शिवाजीच्या तालमीत वाढलेला संताजी जेव्हा राजारामकालात वतनदारांना सरसहा वतने परत करण्याची लाट उसळली तेव्हा अस्वस्थ झाला असणे स्वाभाविक होते. महाराष्ट्रातील वतनदारांची वतनासक्ती इतिहास प्रसिद्ध आहे. वतन मिळविण्यासाठी कोणताही विधिनिषेध न बाळगता ही वतनदार मंडळी हजार खटपटी, लटपटी, खटले व प्रसंगी खून-मारामाऱ्या करीत असत. मराठ्यांच्या इतिहासातील हा एक स्वतंत्र अभ्यासाचाच विषय आहे. असाच एक कराड प्रांतातील देशमुखीचा खटला स्वातंत्र्ययुद्धाच्या कालखंडात खेळला गेला. जिंजीत राजाराम महाराजांच्या पदरी जनानखानाच्या सरहवालदारीवर असणाऱ्या गिरजोजी यादव या महाखटपट्या माणसाने महाराष्ट्रातील मसूरच्या जगदाळ्यांची कराड प्रांतामधील मसूर परगण्याची देशमुखी खोटेनाटे सांगून बळकावली. तशी

२७. पेशवा दप्तर, खंड ३१, पृ. ४८

कागदपत्रेही राजाराम महाराजांकडून घेतली.[२८] पुढे मूळ मालक मसूरचा देशमुख महादजी जगदाळे हा राजाराम महाराजांना जिंजीत भेटल्यावर व त्याने वस्तुस्थिती नजरेस आणून दिल्यावर त्यांनी त्यास त्याची देशमुखी परत केली; पण यादव मंडळी स्वस्थ राहिली नाहीत. ते देशमुखीच्या वतनासाठी खटपटी करीतच राहिले. सदर खटल्यात संताजीने जगदाळ्यांची न्यायाची बाजू उचलून धरली. यासंदर्भात १५ ऑक्टो., १६९४ रोजी साताऱ्याच्या मुक्कामाहून संताजीने राजाराम महाराजांना लिहिलेले पत्र पाहण्यासारखे आहे. त्यात तो लिहितो : "आज्ञेप्रमाणे राजश्री रामचंद्रपंत अमात्य व आम्ही पुन्हा मागती कागदपत्र मनास आणून ता। मजकुरची देशमुखी मशारनिलेच्या (महादजीच्या) दुमाला केली आहे. स्वामीच्या आज्ञेप्रमाणे चालऊन हक्कजवार हमशाई गावीच्या मोकदमांनी गोतपत्र करून दिल्हे आहे. माहादजीचे वतन पुरातन आहे. हे आम्ही हक्कजवारीच्या गुंतीमुळे व कागदपत्रांमुळे चौकस मनास आणून दुमाला केले असे. तरी स्वामीने याचा पुत्रपौत्री यांची देशमुखी तर्फ मजकुरची चालवावया स्वामी धणी आहेत. माहादजीने स्वामीच्या पायाशी बहुतच एकनिष्ठेने वर्तणूक केली आहे. पुढेही यापासून अंतर पडणार नाही. यासी कितेक लोक सुष्ट दुष्ट आहेत. स्वामीपासी काही विपरित करून सांगतील. त्यावरून स्वामीस प्रमाण वाटेल. याच्या वृत्तीच्या मामलियात दुष्ट बहुतच आहेत. हर कोणी सांगतील ते स्वामीने मनावर न घेतले पाहिजे."[२९]

या पत्रातून सच्च्या वतनदाराची न्यायाची बाजू धन्यासमोर परखडपणे मांडणारा संताजी दिसून येतो. जिंजीच्या दरबारात राजाराम महाराजांना सल्ला देणारे जे अनेक 'सुष्ट दुष्ट' लोक होते त्यांच्यावर संताजीचा राग दिसतो. कदाचित अशा सुष्ट दुष्ट मंडळींच्या वर्तणुकीची संताजीसही प्रचिती आलेली असावी.

शिवाजी महाराजांच्या राजनीतीप्रमाणेच त्यांच्या लष्करी

---

२८. ताराबाईकालीन कागदपत्रे, खंड १, पृ. ६७-६८, ७५-७६, ९७-९९
२९. मराठ्यांच्या इतिहासाची साधने, खं. १५, पृ. ८०-८१

शिस्तीच्या मुशीतून संताजीचे सेनानी म्हणून व्यक्तिमत्त्व तयार झालेले होते. गनिमी काव्याच्या युद्धाचे आद्य धडे त्यास शिवाजी महाराजांच्या कारकिर्दीतच मिळाले. लढाईच्या कामी शिस्तीचे अपार महत्त्व असते, हा धडा त्याने याच कालात घेतला होता. ९१ कलमी बखरीत यासंदर्भात एक महत्त्वपूर्ण उल्लेख आल्याचे आपण पाहिलेच आहे. जालन्याच्या स्वारीत रणमस्तखानाशी लढत असता मानाजी मोरे व संताजी घोरपडे यांनी "उतावेली" केली आणि म्हणून शिवाजी महाराजांनी त्यांना "मजुरियास येऊ दिधले नाही" असा तो उल्लेख आहे.[३०] शत्रूशी लढत असता मानाजी व संताजी यांनी डावपेचाची तांत्रिक चूक केली व त्यामुळे शिवाजी महाराज संतप्त झाले. आपली गैरमर्जी झाल्याचे दाखवणारी शिक्षा त्यांनी उभय सेनानींना दिली. अशा प्रकारे आपल्या चुकांतून संताजी शिकत गेला. तो शिवाजी महाराजांच्या तालमीत वाढला, याचा अर्थ हा आहे. पुढे राजारामकालात संताजीची कडव्या लष्करी शिस्तीचा सेनानी म्हणून जी प्रतिमा उदयास आली तिचा उगम या तालमीत आहे.

मनाचा सरळपणा, स्पष्टवक्तेपणा, शिस्तप्रियता इत्यादी गोष्टी मनुष्य प्राण्याचे गुणच होत; पण जिथे त्यांचा अतिरेक होतो तिथे त्यांचे रूपांतर दोषांत होणे स्वाभाविक ठरते आणि असा अतिरेक हा अंती अहितकारकच असतो. संताजीच्या बाबतीत हेच घडले असे वाटते. शिवाजी महाराजांच्या तालमीत वाढलेल्या या सेनानीस राजाराम कालातील बदलत्या राजकीय परिस्थितीत स्वतःस जमवून घेणे अवघड गेले असावे. वतनदारांची परक्या सत्तेसमोरची लाचारी, मराठा सरदारांची स्वार्थी वृत्ती, मन्सब व बक्षीस यांच्या आशेने केव्हाही शत्रूस मिळण्याची त्यांची तयारी या समाजातील प्रवृत्तींनी संताजी अनेकदा संतप्त होत असावा. जिंजीच्या दरबारात त्याने या गोष्टींसंबंधी व्यक्त केलेली परखड मते अनेकांना दुखावणारी व प्रसंगी खुद्द छत्रपतींनाही अडचणीत टाकणारी ठरली असावीत. त्याच्या या सात्त्विक स्पष्टवक्तेपणात त्याच्या अंगभूत आग्रही वृत्तीची भर पडलेली होती. हाताखालच्या अधिकारी लोकांबरोबर वागताना सेनापती आग्रही वृत्तीने

३०. श्री शिवछत्रपतींची ९१ कलमी बखर, पृ. ५५

वागला तर त्यास शोभून दिसते; पण खुद्द राज्यकर्त्यांशी त्याने तसे वागणे हे केव्हाही शोभादायक ठरत नाही, नव्हे ते शेवटी अनर्थकारक ठरण्याचीच शक्यता असते.

जिंजीपुढे कचाट्यात सापडलेले मोगली लष्कर बुडवा अथवा शहाजादा कामबक्षास ओलीस ठेवून घ्या, असा सल्ला संताजी सेनापती या नात्याने छत्रपतीस देऊ शकत होता; पण त्यासाठी तो आग्रह धरू शकत नव्हता. जिंजीपुढून मोगली लष्करास सुखरूप माघार घेऊ द्यायची की नाही, हा राजनैतिक डावपेचाचा भाग होता आणि तो पूर्ण छत्रपतीच्या अखत्यारीतील होता. राजाराम महाराज हे राज्यकर्ते आहेत व आपण राज्याचे व त्यांचे सेवक आहोत हे नाते संताजी काही का होईना; पण विसरत होता. सेनापतीचा सल्ला राजाने मानलाच पाहिजे, असा आग्रह धरणे म्हणजे शुद्ध हटवादीपणा म्हटला पाहिजे. संताजीच्या या हटवादी स्वभावामुळेच छत्रपतींशी त्याचे वारंवार बिनसत गेले. संताजीचा हा हट्टी स्वभाव माहीत असल्यामुळेच शंकराजी नारायणाने त्यास उपदेश केला होता : "फौजेनसी जाऊन साहेब काम करावे. राजश्री स्वामीजवळ मुदे घालू नयेती."

संताजीचा प्रतिस्पर्धी धनाजी जाधव याची बरोबर उलटी स्वभावप्रकृती होती. धनाजी हा मृदुभाषी, हाताखालच्या लोकांना सांभाळून घेणारा, मराठा सरदारांशीच नव्हे, तर मोगल सरदारांशी शिष्टाचाराने वागणारा, राजकारणाच्या वाऱ्याची दिशा पाहून आपले धोरण ठरविणारा मुत्सद्दी सेनानी होता. संताजीचा शेवट कसा झाला, याची कथा सांगताना खाफीखानाने सहज जाता जाता संताजी-धनाजीची तुलना करणारी चार वाक्ये लिहिली आहेत. तो लिहितो - "संताजी आणि धनाजी यांच्यात मतभेद निर्माण झाले होते. ते दोघे आपल्याला सेनापती म्हणवीत. धनाजी जाधव याला खानदानीच्या मराठे सरदारात प्रमुख समजत. संताजी व इतर मराठे सरदार पाहता धनाजी जाधव हा बादशाही सरदारांशी चांगले संबंध ठेवी. त्याची वागणूक योग्य व शिष्टपणाची असे. संताजीला धनाजीवर वरचढपणा हवा होता. हे दोघे एकमेकांचा नाश करण्यास टपलेले असत. इतरांच्या मानाने संताजी हा

शिक्षा करण्यात अत्यंत कडक समजला जात असे. लहानसहान अपराधाबद्दल तो हत्तीच्या पायाखाली देण्याची शिक्षा देई. अनेक सरदार त्याच्याविरुद्ध होते. त्याचा मोड करण्यासाठी त्यांनी धनाजीबरोबर गुप्त पत्रव्यवहार केला आणि ते त्याला मिळाले.[३१]

संभाजी राजांच्या हत्येनंतर निर्माण झालेल्या अत्यंत अस्थिर राजकीय परिस्थितीत मराठे लोक औरंगजेब बादशहाचा रोष पत्करून संताजीच्या लष्करात राहून लढत होते, हीच मोठी कौतुकाची बाब होती. अशा स्थितीत लष्करात शिस्त नांदली पाहिजे म्हणून संताजी कठोर शिक्षा देऊ लागला, तर तो जदुनाथ सरकारांनी म्हटल्याप्रमाणे "The man who insists on efficiency and discipline in a tropical country marks himself universally unpopular"[32] असा अप्रिय झाल्यास नवल नव्हते. आता शिवाजी महाराजांची दंडनीती उपयोगाची नाही, बदलत्या कालाप्रमाणे दंडनीतीचे स्वरूपही बदलत जाते, हे संताजी उमजू शकला नाही, बदलत्या परिस्थितीशी जुळवून घेण्याची त्याची मनःप्रवृत्तीच नव्हती. रणांगणावर अमृतराव निंबाळकर हाती सापडल्यावर संताजीने आपल्या मनावर संयम ठेवावयास हवा होता; पण तो ठेवू शकला नाही. हे कृत्य या मनःप्रवृत्तीचेच द्योतक होते.

राजाराम महाराजांच्या कारकिर्दीकडे पाहिले तर आपणास असे दिसून येते की, त्यांना बदलत्या परिस्थितीशी जुळवून घेण्यासाठी आपल्या पित्याच्या दंडनीतीची अनेक तत्त्वे वाऱ्यावर सोडून द्यावी लागली, अनेकांशी नमते घ्यावे लागले, अनेकांशी तडजोड करून पुढे जावे लागले. स्वराज्याच्या संकटकाळात त्यास पारखे होणाऱ्या व स्वराज्यास चांगले दिवस येताच परत येणाऱ्या मराठे सरदारांना राजाराम महाराजांनी हिणविले नाही. उलट तुम्ही महाराष्ट्र राज्य व महाराष्ट्र धर्म यांच्या रक्षणासाठी येत आहात, ही फार उचित गोष्ट आहे, असे प्रशस्तिपत्र त्यांनी त्यांना देऊन स्वराज्याच्या सेवेत सामावून घेतले.

---

३१. मराठ्यांचे स्वातंत्र्ययुद्ध (तारिखे खाफीखान), पृ. ३७

३२. History of Aurangzib, Vol. V, p. 105

कालाची ती एक गरज होती; पण संताजीच्या नीतीत अशा गोष्टी बसत नव्हत्या आणि म्हणूनच छत्रपती व संताजी यांच्यातील अंतर वाढत गेले. राजाराम महाराजांच्या संपूर्ण कारकिर्दीत संताजीस छत्रपतींचा दीर्घ सहवास स. १६९२-९३ व स. १६९५-९६ अशा दोन वेळी घडला आणि दोन्ही सहवासांची परिणती वितुष्टात झाली. यावरून संताजीचे धन्याशी फार काळ पटलेच नाही, हाच निष्कर्ष काढावा लागतो.

स्वभावातील आग्रही वृत्तीमधून हटवादीपणा तयार होतो आणि त्याचा अतिरेक झाला की, उद्दामपणा अंगी येतो. स. १६९५-९६ सालच्या संताजीच्या छत्रपतींबरोबरच्या दुसऱ्या भेटीत अशी उद्दामपणाची वर्तणूक झाली असावी, असा तर्क करण्यास जागा आहे. स्वाभिमान व गर्व यांच्या सीमारेषाही अशा अस्पष्ट असतात. स्वाभिमानाचा अतिरेक झाला की, त्याचे गर्वात केव्हा रूपांतर होते, हे त्या व्यक्तीसही समजू शकत नाही. संताजीच्या बाबतीत हेच घडून आले असावे. एकामागून एक मिळालेल्या नेत्रदीपक विजयांनी संताजीच्या ठिकाणी स्वाभिमानाची जागा गर्वाने केव्हा घेतली असावी, हे त्याचे त्यालाही समजले नसेल. संताजीचे पराक्रम धनाजीपेक्षा नेत्रदीपक खरे; पण याचा अर्थ धनाजी कमी प्रतीचा अथवा कमी पराक्रमाचा सेनानी होता, असे नाही; पण संताजीस मात्र आपण धनाजीहून अधिक पराक्रमी आहोत, असे सातत्याने वाटत राहिले.

याचबरोबर संताजीची आणखी एक गैरसमजूत होती. ती म्हणजे धनाजीहून आपला पराक्रम मोठा असूनही छत्रपतींच्या दरबारात आपली उपेक्षा होते आहे. वास्तविक राजाराम महाराज हे अतिशय संतुलित वितार करणारे व सर्वांशी गोडीने वागून कार्यभाग साधणारे राज्यकर्ते होते. त्यांची वृती पापभिरू होती. राज्याचा खरा मालक शाहू राजे असून, आपण भरताप्रमाणे राज्याचे विश्वस्त आहोत, अशी त्यांची भावना होती. सेवकावर विश्वास टाकण्याची त्यांची रीती अशी होती की, रामचंद्रपंतास आपले सर्व अधिकार सुपुर्द करून त्यास महाराष्ट्रातील स्वराज्यावर आपल्या अनुपस्थितीत प्रमुख कारभारी म्हणून त्यांनी नेमले होते. खुद्द संताजी रुसून जिंजीबाहेर पडल्यावर त्यांनी स्वतःची प्रतिष्ठा बाजूला

ठेवून स्वतःहून संताजीची भेट घेतली व त्याची समजूत घातली होती. अशा धन्याशी संताजीचे वितुष्ट यावे व त्याची परिणती त्याच्या पदच्युतीमध्ये व्हावी आणि पुढे त्याचा शेवट दुःखान्त व्हावा, या घटनानुक्रमास खुद्द संताजीच जबाबदार होता. अन्य कोणी नाही. महान बादशहा नेपोलियनच्या पतनास इतर कोणापेक्षा स्वतः तोच अधिक जबाबदार होता. या ऐतिहासिक सत्याची प्रचिती संताजीच्या चरित्रातही आल्याशिवाय राहत नाही.

मराठ्यांच्या स्वातंत्र्ययुद्धाच्या कालखंडात तीन वर्षात मोठ्या दुर्दैवी घटना घडल्या. छत्रपती संभाजी महाराजांची हत्या, रायगडचा पाडाव व महाराणी येसुबाई व शाहू राजे यांची कैद आणि सेनापती संताजी घोरपडे यांचा खून अशा त्या तीन घटना होत. शत्रू पक्षीयांच्या भल्या भल्या नामांकित सेनानींची हृदये कंपायमान करणाऱ्या मराठ्यांच्या या महान सेनानीचा शेवट असा दुःखान्त व्हावा, यापरी दुर्दैव ते कोणते? शत्रुने घेतलेले पन्नास किल्ले परत जिंकून घेऊन लष्करी आघाडी सावरता येते, झालेली हानी भरून काढता येते. पुढचा इतिहास असे सांगतो की, संताजीसारखा प्रतिसंताजी मराठ्यांना निर्माण करता आला नाही. पुढे औरंगजेबाच्या मृत्युपर्यंत मराठे मोगलांशी गनिमी युद्ध करीत राहिले; पण संताजीप्रमाणे एकामागून एक असे नेत्रदीपक विजय कोणाही मराठा सेनानीस कमविता आले नाहीत. संताजीची महती यातच आहे.

***



# १२.
# संताजीची गनिमी युद्धनिती व कामगिरी

महाराष्ट्राच्या इतिहासात संताजी घोरपडे यांचे नाव घेतल्याबरोबर त्यांचा गनिमी कावा डोळ्यांसमोर उभा राहतो. संताजी म्हणजे गनिमी कावा व गनिमी कावा म्हणजे संताजी असे जणू समीकरण मानले जाते. असे असूनही संताजीच्या गनिमी युद्धनीतीचे युद्धशास्त्रीय दृष्टीने विवेचन होऊ शकलेले नाही, ही मोठी खेदाची गोष्ट आहे.

रियासतकार सरदेसाई यांनी संताजीच्या पराक्रमाचे वर्णन करताना त्यास "गनिमी काव्याचा आद्यजनक" अशी पदवी बहाल केलेली आहे.[१] पण संताजीस ही पदवी सर्वार्थाने लागू पडते असे नाही. कारण महाराष्ट्रापुरता विचार करावयाचा झाल्यास संताजीपूर्वी छत्रपती शिवाजी महाराजांनी शत्रूंशी अनेक गनिमी लढाया दिल्या होत्या. प्रतापगडाच्या आसमंतातील कोयना खोऱ्यात अफजलखानाच्या फौजेशी दिलेली लढाई, शाहिस्तेखानाच्या मोहिमेतील एक सेनानी कारतलबखान याच्या फौजेशी उंबरखिंडीत दिलेली लढाई, खुद्द शाहिस्तेखानावर पुण्यात घातलेला मध्यरात्रीचा छापा, अशी शिवाजी महाराजांच्या गनिमी काव्याच्या लढायांची अनेक उदाहरणे देता येतील. गनिमी काव्याचा आश्रय घेऊन महाराजांनी अनेक नामांकित सेनानींना पराभूत केल्याचे त्यांचे चरित्र सांगते.

शिवाजी महाराजांच्या पूर्वीही त्यांचे पिते शहाजीराजे व निजामशाही वजीर मलिक अंबर यांनी निजामशाहीच्या संरक्षणार्थ गनिमी युद्धपद्धतीचाच अवलंब केलेला होता, याचीही आपण दखल घेतली पाहिजे. तसे पाहिले तर मलिक अंबर व शहाजीराजे यांनाच आपण दक्षिणेतील 'गनिमी काव्याचे आद्यजनक' मानले पाहिजे; पण असे असूनही रियासतकार देसाई यांना संताजीसच "गनिमी काव्याचा

१. स्थिरबुद्धि राजाराम, पृ. ८५

आद्यजनक" असे म्हणण्याचा मोह व्हावा, याचे कारण संताजीपूर्वी गनिमी युद्धपद्धती अस्तित्वात असली, तरी तिचा यापूर्वी इतक्या व्यापक प्रदेशावर, इतक्या व्यापक प्रमाणावर व इतक्या तंत्रशुद्ध पद्धतीने कोणीच अवलंब केलेला नव्हता. दुसऱ्या शब्दांत संताजीपूर्वी गनिमी युद्धपद्धती अस्तित्वात असली, तरी तिच्या तंत्राची शास्त्रशुद्ध वाढ केली ती संताजीनेच. संताजीची संपूर्ण लष्करी कारकीर्दच गनिमी युद्धे खेळण्यामध्ये गेली.

## माओ त्से तुंग व मल्हार रामराव

विसाव्या शतकात पृथ्वीतलावरील अनेक परतंत्र समाजांनी आपल्या मायभूमीच्या मुक्तीसाठी शत्रूंशी गनिमी पद्धतीचे संग्राम खेळल्याचे दिसून येते. त्यात प्रामुख्याने चीनमधील माओ त्से तुंगच्या नेतृत्वाखालील साम्यवादी मुक्तिसंग्राम व व्हिएतनाममधील स्वातंत्र्यवाद्यांचा पाश्चात्त्य साम्राज्यवादी सत्तांविरुद्ध हो-ची-मिन्ह यांच्या नेतृत्वाखालील खेळला गेलेला स्वातंत्र्यसंग्राम हे प्रमुख होत. माओला चँग-काय-शेकसारख्या अंतर्गत व जपानसारख्या बाह्य शत्रूंशी संघर्ष करावा लागला आणि तो करीत असता त्याने आपले गनिमी युद्धतंत्र इतके विकसित केले की, तो चालू शतकातील गनिमी युद्धतंत्राचा महर्षीच मानला गेला. गनिमी युद्धनीतीचा शास्त्रशुद्ध विचार व त्या युद्धनीतीचा प्रत्यक्षात अवलंब करून बलाढ्य शत्रूस पराभूत करणारा माओ हा आधुनिक कालातील महान सेनानी मानला जातो.

आपल्या गनिमी युद्धतंत्राचे माओने केलेले वर्णन किती यथार्थ आहे पहा - "Seem to come from the east and attack from the west; avoid the solid attack...; attack; withdraw; deliver a lightning blow, seek a lightning decision. When guerrillas engage a stronger enemy, they withdarw when he advances; harass him, when he stops, strike him when he is weary, pursue him when he withdraws... The enemy, must be harassed, attacked, dispersed, exhausted and annihilated."[2]

२. Shivaji - The Great Guerrilla, p. 18

*(पूर्वेकडून चाल करून येत आहे असे भासवून पश्चिमेकडून शत्रूवर हल्ला करा. शक्यतो निकराचा हल्ला टाळा. लढताना हल्ल्याइतकीच माघार, तसेच विद्युत चपळाईने दणका तसेच त्याच वेगाने निर्णय या फार मोलाच्या गोष्टी आहेत. गमिनी काव्याने लढणाऱ्यांना आपल्यापेक्षा सामर्थ्यवान शत्रूशी लढा द्यायचा असतो. म्हणून शत्रू चाल करून आला की गनीम माघार घेतात, शत्रू थांबला की त्यांची लांडगेतोड करतात, शत्रू दमला की त्याच्यावर हल्ले करतात आणि शत्रू माघार घेऊ लागला की त्याचा पाठलाग करतात. शत्रूस सतावणे, त्याच्यावर हल्ले चढविणे, त्याला उधळून लावणे, त्याला हतवीर्य करून टाकणे आणि शेवटी त्यास नष्ट करणे, हे गनिमी युद्धाचे महत्त्वाचे तंत्र आहे.)*

विसाव्या शतकातील गनिमी युद्धनीतीच्या या महर्षीने केलेल्या वर्णनाशी त्याच्यापूर्वी सव्वाशे वर्षे होऊन गेलेल्या आमच्या मल्हार रामराव चिटणीस या बखरकाराने केलेले वर्णन बरेच मिळतेजुळते आहे. विशेष म्हणजे मल्हार रामरावाचे वर्णन त्याच्याही पूर्वी सव्वाशे वर्षे महाराष्ट्रात घडून गेलेल्या गनिमी युद्धाचे आहे. राजारामकालीन संताजी-धनाजीच्या गनिमी काव्याचे वर्णन करताना आमचा बखरकार मल्हार रामराव लिहितो- "औरंगजेब पादशाहासारखा शत्रू (ज्याची) लाखौ फौज (व) खजिना बेमुबलक. छकड्यास छकडे द्रव्याचे भरोन कोटिशा (ज्याचे) बरोबर चालत आहेत (अशाशी लढणे) आणि आपले सैन्य (तर) थोडे. यास्तव मनुष्य राखून, जाया होऊ न देता, मसलतीने त्यांच्यासभोवते हिंडोन, फिरोन त्यास (मोगली सैन्याची) लांडगेतोड करावी. रयतेची मात्र वैरण राखून रानांतील वैरण जाळून टाकावी. रसद चालू देऊ नये. आपल्या फौजेत मणाची धारण, त्यांच्या (मोगलांच्या) लष्करात शेराची धारण. अशा तऱ्हेने करीत मराठी फौज किती आहे, हा अदमास ध्यानात येऊ देऊ नये. त्यांचे फौजेस चैन पडू देऊ नये. त्यांची ठाणी (व) त्यांजकडे प्रांत मुलूख वहिवाटात होते. तेथील लोकांनी इकडे लक्ष ठेवून वागावे. आपली फौज ज्या प्रांती जाईल त्या प्रांतातील लोकांनी, जमेदारांनी (वतनदारांनी) खंडणी देऊन त्याचा बचाव

करावा. मोगलांची फौज असेल तेथे तेथे पंचवीस तिसा कोसांचे छट्यांनी राहून त्या फौजेस चैन पडू देऊ नये, असे महाराज (राजाराम) करिते झाले. लोभ करीतच असत."

"मोगलांचे घोडे पाण्यावर आले असता पाणी न पीत. त्यांस मोगली लोकांनी म्हणावे जे, पाण्यामध्ये धनाजी व संताजी दिसतो की काय? रात्री दिवसा कोणीकडून येतील, काय करतील, असे केले. मोंगलाई फौजेत आठही प्रहर भय बाळगीत. पादशाहासि बहूत आश्चर्य जाहले की, 'मराठी फौज ही बळावत आहे, अकस्मात यावे, बक मच्छ उचलून नेतो तसा घाला घालावा, शिपाईगिरीची शर्त करावी, प्रसंग पडल्यास माघारे पळून जावे (अशी ही मराठ्यांची लढण्याची रीत). (मराठे) खाण्यापिण्याचा दरकार बाळगीत नाहीत. पाऊस, ऊन, थंडी व अंधारी काही न पहाता घोड्यावरच हरभरे व भाकरी, चटणी, कांदे खाऊन धावतात. त्यास कसे जिंकावे? एक्या मुलकात फौज आली म्हणोन त्याजवर (फौजेची) रवानगी करावी, तो दुसरीकडे जाऊन ठाणी घेतात, मुलूख मारितात. हे (मराठे म्हणजे) आदमी नव्हत, भूतखाना आहे!"[३] माओने जे आपल्या तांत्रिक भाषेत "The enemy must be harassed, attacked, dispersed, exhausted and annihilated" जे सांगितले आहे, तेच आमच्या मल्हार रामरावाने साहित्यिक भाषेत मांडले आहे.

मराठ्यांच्या गनिमी काव्याने मोगलांच्या मनात जबर धास्ती निर्माण केली होती. इतकी की, मोगली घोडे पाणी पीत नसत तेव्हा मोगल सैनिक त्यांना विचारत : 'पाण्यामध्ये धनाजी व संताजी दिसतो की काय?' मल्हार रामरावाचे हे लिखाण अतिशयोक्त वाटत नाही; तात्कालिक मोगल इतिहासकार खाफीखान याची या संताजी-धनाजीच्या जबरदस्त धास्तीबद्दल साक्ष आहे. स. १६९६ साली संताजी कर्नाटकातून महाराष्ट्रात येत असता विजापूरजवळ छावणी करून असलेल्या गाजिउद्दीन फिरोजगंज या नामांकित मोगल सरदारास

३. थोरले राजाराम महाराज यांचे चरित्र, पृ. ३४-३५

त्याच्या आगमनाची बातमी समजली. तेव्हा त्याची पाचावर धारण कशी बसली, याचे खाफीखानाने केलेले वर्णन पुन्हा एकदा या ठिकाणी पाहणे अगत्याचे होईल. खाफीखान म्हणतो - "या सुमारास बातमी आली की, नालायक संताजी घोरपडे हा पंचवीस हजार फौजेनिशी आठ-नऊ कोसांवर आला आहे. भलेभले नामांकित वीर संताजीचे नाव ऐकताच घाबरून जात. त्यांचे अवसान गळून जाई. गाजिउद्दीन याचा चेहरा पांढराफटक पडला! त्याच्यापाशी फौज थोडी होती. त्याने आपण संताजीवर चालून जातो असा पुकारा केला. पुढील मजल नीट करून आपला गोट तिकडे हलविण्यासही त्याने एका अधिकाऱ्याची नेमणूक केली आणि त्याने स्वतः आडवाटेने विजापूरचा रस्ता धरला!"[४]

जिथे गाजिउद्दीनखान फिरोजजंगासारख्या अनुभवी व पराक्रमी बादशाही सेनानीचा चेहरा संताजी घोरपड्याचे नाव ऐकताच पांढराफटक पडला आणि जिथे त्याने आपल्या सैनिकांसमोर राणा भीमदेवी थाटाचा पवित्रा घेऊन हळूच आडवाटेने विजापूरचा रस्ता धरला व संताजीकडून होणारी आपली फजिती चुकविली, तिथे मोगली लष्करातील सामान्य सैनिकांच्या बिचाऱ्या घोड्यांना संताजी-धनाजीचे चेहरे पाण्यामध्ये दिसत असल्यास नवल ते काय? घोड्यावरच बसून चटणी, भाकर, हरभरे-कांदा खाऊन आज या प्रांतात तर उद्या त्या प्रांतात धाडी घालणाऱ्या मराठ्यांना पाहून 'हे आदमी नव्हेत, भूतखाना आहेत' असे उद्‌गार काढण्याची पाळी अखिल हिंदुस्थानच्या महान मोगल सम्राटावर यावी, हेच मराठ्यांच्या-संताजीच्या-गनिमी युद्धनीतीचे रहस्य होते.

## औरंगजेब बादशहा व नेपोलियन बोनापार्ट

गनिमी काव्याने लढणाऱ्या या मराठ्यांशी कसे लढावे, हेच बादशहास समजत नव्हते. तसे ते प्रत्येक साम्राज्यवादी सत्तेस समजत नाही, उमजत नाही आणि मग प्रत्येक वेळी साम्राज्यसत्ता अधिकाधिक मनुष्यबळ व साधनसामग्री युद्धक्षेत्रात ओतत जाते आणि आश्चर्य असे

४. मराठ्यांचे स्वातंत्र्ययुद्ध (तारिखे खाफीखान), पृ. ३७

असते की, प्रत्येक वेळा या साम्राज्यसत्तेचे पाऊल अपयशाच्या गाळात अधिकाधिक रुतत जाते. नेपोलियन बोनापार्टच्या साम्राज्यसत्तेस स्पॅनिश देशात आलेले अपयश हे या ऐतिहासिक सत्यास साक्ष आहे. नेपोलियनची जशी स्पेनमध्ये अवस्था झालेली होती, तशी औरंगजेबाची दक्षिणेत झाली होती. तसे पाहिले तर औरंगजेब व नेपोलियन या दोन्ही सत्ताधीशांच्या मनोरचनेत फरक नव्हता. दोघांनाही लष्करी सत्तेचा कैफ असा चढला होता की, जगातील कोणतीही सत्ता आपण लष्करी बळावर नमवू शकू, जगातील कोणतीही सत्ता आपण नष्ट करू शकू, असा त्यांना आत्मविश्वास वाटत असे. दुसऱ्या देशांची स्वातंत्र्ये हिरावून घेणे, हा आपला जन्मसिद्ध हक्कच आहे, अशा थाटात हे दोघेही शेवटपर्यंत वावरत राहिले.

आणि मग एखाद्या स्पॅनिश समाजाने किंवा एखाद्या मराठा समाजाने अशा सत्ताधीशांच्या फौजांचा धुव्वा उडविल्याची घटना घडून येताच, त्यांचा त्या गोष्टीवर विश्वासच बसत नाही. आपला पराभव, आपल्या फौजेचा पराभव होणेच शक्य नाही, अशी त्यांनी आपली समजूत करून घेतलेली असते. अशा प्रसंगी आपल्या प्रतिष्ठेला उद्ध्वस्त करणाऱ्या या पराभवाचे खापर ते आपल्या हाताखालच्या सेनानींच्या डोक्यावर फोडतात. त्यांना शिव्याशाप देतात. नेपोलियनच्या जनरल ड्युपाँ या सेनानीस त्याच्या वीस हजार फौजेनिशी स्पॅनिशांनी बिलेन या ठिकाणी घेरले व दाती तृण धरून शरण यावयास लावले! स्पॅनिशांसारख्या दरिद्री व दुबळ्या लोकांनी फ्रेंचांसारख्या पराक्रमी व सामर्थ्यशाली सैनिकांचा असा दयनीय पराभव करावा, हे पाहून नेपोलियन खवळून गेला. अत्यंत संतापाने त्याने आपल्या सेनानीची निर्भर्त्सना केली : "जगाच्या सुरुवातीपासूनच्या इतिहासात इतकी मूर्खपणाची, नादान व भित्रेपणाची घटना झाली नसेल!" आपल्या धन्याच्या आज्ञेप्रमाणे प्रामाणिकपणे लढणाऱ्या व त्याची साम्राज्यवादी महत्त्वाकांक्षा सफल करण्यासाठी धडपडणाऱ्या हाताखालच्या सेनानींनी प्राप्त केलेला विजय धन्याच्या नावे नोंदला जातो; पण ड्यूपाँसारख्या सेनानीस आलेले अपयश मात्र त्याच्या माथ्यावर मारले जाते! यास

औरंगजेब बादशहाची राजनीती अपवाद नव्हती. संताजीने आपल्या फौजेसह बुऱ्हाणपुरावर हल्ला चढविला, तेव्हा बुऱ्हाणपुरचा सुभेदार आपले सैन्य घेऊन त्याच्याशी सामना करावयास नगराबाहेर आला व त्याने संताजीशी लढण्याची शर्थ केली; पण त्याच्या दुर्दैवाने त्यास पराभव पत्करावा लागला आणि बुऱ्हाणपूर नगर संताजीच्या हाती पडले. संताजीने मोगलांचे हे प्रसिद्ध नगर जाळून-लुटून फस्त केले. यावर बादशहाची काय प्रतिक्रिया असावी? बुऱ्हाणपूरच्या संरक्षणार्थ आपल्या सुभेदाराने दिलेली लढत तो विसरला; या उलट त्याची निर्भर्त्सना करणारा व त्याची फजिती करणारा "बांगड्याचा आहेर" त्याने दरबारातून त्याच्याकडे पाठवून दिला! अशा प्रकारे आपल्या हाताखालच्या अधिकाऱ्यांची निर्भर्त्सना करून आपल्याला आलेल्या अपयशाची जबाबदारी साम्राज्यवादी सत्ताधीश टाळू शकत नाहीत. साम्राज्यवाद्यांचे युद्ध व लोकांचे युद्ध यात काही फरक असतो, हेच ते समजू शकत नाहीत.

## गनिमी युद्धपद्धतीमधील लोकांचे सहकार्य

गनिमी युद्धात लोकांच्या (स्वजनांच्या) सहकार्यास मोठे महत्त्व आहे. गनीम सैनिक देशाच्या उदात्त ध्येयासाठी-मुक्तीसाठी-लढत असतात हे खरे; पण त्यांच्या या लढ्यात त्यांना जर लोकांची सहानुभूती व सहकार्य मिळाले नाही, तर ते यशस्वी होऊ शकत नाहीत. यासाठी शत्रूशी लढत असता आपल्या रयतेस आपल्याकडून काडीचीही तसनस लागता कामा नये, याकडे गनिमी सैन्याच्या सेनापतीला व सैनिकांना डोळ्यांत तेल घालून नजर ठेवावी लागते. संताजी अशा प्रकारची नजर ठेवणारा व परिणामी लोकांचे सहकार्य मिळविण्यात यशस्वी झालेला सेनापती होता. महाराष्ट्रातील मराठी जनतेचे सहकार्य व साहाय्य त्यास मिळत होतेच; पण याशिवाय महाराष्ट्राबाहेरच्या लोकांचे सहकार्य व साहाय्य मिळविण्यात तो यशस्वी झाला होता, हे विशेष मानावे लागेल. त्यासंदर्भात एक महत्त्वाचा पुरावा आपल्या हाती येतो.

स. १६९५ च्या नोव्हेंबरात संताजीने कासिमखान, खानाजादखान इत्यादी मोगल सरदारांवर जो महान विजय मिळविला

त्यावेळी चित्रदुर्गचा नायक बरमाप्पा हा संताजीस मिळाला होता. संताजीस बरमाप्पाचे दोड्डेरीच्या मोहिमेत फार मोलाचे साहाय्य झाले होते. दोड्डेरीचा परिसर हा चित्रदुर्गच्या प्रदेशातच मोडतो. दोड्डेरीच्या मोहिमेचा बारकाईने विचार केला, तर एक गोष्ट सहज लक्षात येते, ती म्हणजे कासिमखानाच्या व बादशाही छावणीतून आलेल्या खानाजादखानाच्या हालचाली अगदी अचूकपणे संताजीस समजत होत्या. कासिमखान व खानाजादखान यांच्या भेटी केव्हा होणार, त्यांच्या फौजांचा मुक्काम कुठे पडणार, त्यांचा पेशखाना कुठे व केव्हा रवाना होणार, इत्यादी शत्रूच्या हालचालींची माहिती संताजीस त्याच्या कार्यक्षम हेरखात्याकडून जशी समजली असेल तशी बरमाप्पा नायकासारख्या स्थानिक नायकाकडूनही ती समजली असणे अगदी स्वाभाविक आहे. विशेषतः मोगली फौजा एकत्रित येत असता संताजी त्यांच्या आसमंतातच वावरत होता. तो फार लांबवर नव्हता. अशा वेळी आपल्या फौजा शत्रूच्या नजरेत येणार नाहीत, अशा ठिकाणी त्यांची छावणी करून त्या गुप्तपणे राखणे, हे स्थानिक नायकाच्या व लोकांच्या सहकार्याशिवाय संताजीस शक्य नव्हते.

## गनिमी युद्धपद्धतीमधील शिस्तीचे महत्त्व

व्हिएतनाममधील अमेरिकन फौजांविरुद्ध यशस्वीपणे संघर्ष करणाऱ्या व्हिएतनामी गनिमी फौजांचा सेनापती जनरल हो न्यूएन जॅप याने गनिमी युद्धपद्धतीमधील शिस्तीचे महत्त्व सांगत असता म्हटले आहे - 'He who speaks of army speaks of strict discipline.' इतके लष्करात शिस्तीचे महत्त्व मानले जाते. संताजी अशा लष्करी शिस्तीस आपल्या यशाचा कणा मानणाऱ्यांपैकी एक सेनानी होता. आपण हे पाहिलेच आहे की, तत्कालीन इतिहासकार खाफीखान याने संताजीच्या लष्करामधील शिस्तीबद्दल आवर्जून लिहिले आहे. लहानसहान गुन्ह्याबद्दलसुद्धा संताजी आपल्या सैनिकांना हत्तीच्या पायी देण्याची शिक्षा देई, असे त्याने थोडे अतिशयोक्तीने लिहिले असले, तरी त्याचा अर्थ संताजी हा अत्यंत शिस्तप्रिय सेनानी होता, असाच काढला पाहिजे.

गनिमी हल्ल्यात अचूक हालचालींना फार महत्त्व असते. अशा

अचूक हालचाली कडव्या शिस्तीच्या संयोजनाशिवाय पार पडणे अशक्य असते. छत्रपती शिवाजी महाराजांचा लाल महालातील शाहिस्तेखानावरील हल्ला एखाद्या कथा-कादंबरीत शोभण्यासारखा कितीही रंजक वाटत असला, तरी त्याच्या मुळाशी शिस्तबद्ध संयोजन व कडवी शिस्त या गोष्टी होत्या, हे विसरता कामा नये. अशा प्रसंगी गनिमी लष्करातील एखाद्या सैनिकाची साधी चूकही सर्व योजना उद्ध्वस्त करून टाकणारी ठरू शकते. संताजी हा शिवाजी महाराजांच्या लष्करी शिस्तीत वाढलेला सेनानी असल्यामुळे त्यास गनिमी युद्धपद्धतीतील शिस्तीचे बाळकडू परंपरेनेच प्राप्त झालेले होते. तसे नसते तर शाहिस्तेखानावरील हल्ल्याची बरोबरी करणारा संताजीचा औरंगजेब बादशहाच्या छावणीवरील हल्ला हा यशस्वी होऊ शकला नसता. दुर्दैवाने आपल्याकडे संताजीच्या या महान पराक्रमाची माहिती देणारी फारशी साधने उपलब्ध नाहीत; पण जी काही साधने उपलब्ध आहेत, त्यातील त्रोटक माहितीवरूनसुद्धा आपणास संताजीच्या पराक्रमी कृत्यांचा व त्यामागील लष्करी शिस्तीचा अंदाज बांधता येतो.

संताजीच्या लष्करातील शिस्तबद्ध हालचालींचा प्रत्यय आपणास त्याच्या कासिमखान व खानाजादखान यांच्यावरील मोहिमेतून येतो. दोन्ही खान एकमेकांस भेटल्यानंतर दुसऱ्या दिवशीच्या मुक्कामी कासिमखान शाही पाहुण्यांना शाही इतमामाने मेजवानी देणार होता. त्यासाठी त्याने अदल्या दिवशीच पुढे पेशखाना रवाना केला होता. दुसऱ्या दिवशी मोगलांची संयुक्त फौज पेशखान्याच्या दिशेने रवाना होणार होती. संताजीस मोगली सरदारांच्या योजनांची व हालचालींची बित्तंबातमी मिळत होती. त्यानुसार त्याने आपल्या फौजेच्या तीन तुकड्या केल्या. एका तुकडीने पेशखान्यावर भल्या पहाटे हल्ला करायचा, या पेशखान्याच्या बचावासाठी येणाऱ्या मोगली सैन्याचा दुसऱ्या तुकडीने मुकाबला करायचा आणि तिसऱ्या तुकडीने राखीव म्हणून राहायचे. ही तिसरी तुकडी लढाई ऐन रंगात येताच मोगलांच्या लष्करी तळावर हल्ला करून तेथील सामानसुमान लुटून घेणार होती. आपण पाहिलेच आहे की, संताजीच्या फौजेतील या तुकड्यांनी त्यांना नेमून दिलेली कामगिरी

अचूकपणे पार पाडली आणि अशा प्रकारे मोगली फौजेचा प्रचंड पराभव करण्यात संताजी पूर्ण यशस्वी झाला. संताजीचे हे यश कडव्या लष्करी शिस्तीशिवाय मिळणे कठीण होते. संताजीने असे अनेक गनिमी विजय संपादन केले; पण या प्रत्येक विजयाच्या मुळाशी त्याच्या फौजेतील कडवी शिस्त उभी होती, हे विसरता कामा नये.

## खासा शत्रुसेनेच्या नायकावरच हल्ला

आपणाहून अनेक पटींनी बलाढ्य असणाऱ्या शत्रुसेनेशी संघर्ष करीत असता तिच्या प्रमुखपदी असणाऱ्या सेनानायकावरच हल्ला करण्याचे व परिणामी शत्रुसेनेचे नीतिधैर्यच खच्ची करण्याचे तंत्र संताजीने आपल्या गनिमी युद्धात वापरल्याचे दिसून येते. अशा प्रकारच्या अचानक हल्ल्याने शत्रू किंचित काल का होईना; पण किंकर्तव्यमूढ होतो आणि पुढे रणक्षेत्रात वावरत असता सदैव गनिमांच्या अचानक हल्ल्याची धास्ती बाळगतो. तसेच शत्रुपक्षीयाच्या सैनिकांवर याचा विपरीत परिणाम होऊन सेनेच्या मनोबलाचे खच्चीकरण होते.

संताजीसमोर छत्रपती शिवाजी महाराजांसारख्या महान गनिमी सेनानीचा आदर्श होता. पुण्याच्या लाल महालात मुक्काम ठोकून संपूर्ण स्वराज्यास गुदमरून टाकणाऱ्या शाहिस्तेखानाच्या जनानखान्यावरच छापा टाकून त्यास धडा शिकवण्याची अचाट कल्पना महाराजांनी आपल्या बुद्धिमतेच्या कौशल्यावर व गनिमी युद्धनीतीमधील प्रावीण्यावर साकार करून दाखविली होती. या छाप्याच्या प्रसंगानंतर खानाची मोठी बेइज्जत होऊन त्यास स्वराज्यातून तोंड काळे करून निघून जावे लागले होते. लष्करी परंपरेत संताजी हा महाराजांचा शिष्यच होता. संभाजी महाराजांच्या हत्येनंतर निर्माण झालेल्या विषण्ण अवस्थेत मरगळलेल्या मराठी समाजात चैतन्य भरण्यासाठी महाराजांच्या पराक्रमासारखा एखादा अद्‌भुत पराक्रम आवश्यक होता. म्हणून संताजीने खासा औरंगजेब बादशहाच्या छावणीवरच हल्ला करून आणि त्याच्या छावणीचे सोन्याचे कळस कापून पूर्वसुरींच्या पराक्रमाची पुनरावृत्ती केली. बादशहास दाखवून दिले की, त्याने मराठ्यांचा राजा मारला तरी

मराठ्यांचा पराक्रम, शौर्य व धाडस तो मारू शकलेला नाही!

गनिमी युद्ध पद्धतीच्या दृष्टीने विचार केल्यास संताजीच्या या गनिमी हल्ल्याचे विशेष मानावे लागले. बादशाही छावणीच्या परिसरात प्रवेश मिळविणे म्हणजे सुलभ गोष्ट नव्हती, तरीही संताजीने अनेक युक्ती-प्रयुक्तीने छावणीजवळ जाण्यात आणि खुद्द बादशाही निवासस्थानावर हल्ला करण्यात यश मिळविले. विशेष म्हणजे असा हल्ला करून राहुटींचे कळस कापून संताजी आपल्या सहकाऱ्यांनिशी सहीसलामत परत आला. हल्ल्यातील अशा प्रकारच्या शेवटच्या टप्प्यास फार महत्त्व असते. शिवाजी महाराजांच्या शाहिस्तेखानावरील हल्ल्यात एक वेळ जनानखान्यात शिरणे ही सोपी गोष्ट होती. कारण हल्ला करण्यापूर्वी शत्रू बेसावध असतो; पण हल्ला झाल्यावर अल्पकाळातच तो सावध बनतो. तो पूर्ण सावध होण्यापूर्वीच गनिमास आपले उद्दिष्ट साधून घेऊन पळ काढायचा असतो. यासाठी धाडस, कल्पकता, बुद्धिचातुर्य या गुणांबरोबरच गनिमाच्या सेनापतीकडे कार्यक्षम हेरयंत्रणा, अभ्यासपूर्ण संयोजन, हुकमांची अचूक अंमलबजावणी आणि कमालीची शिस्तबद्धता या गोष्टी असाव्या लागतात. संताजीकडे या होत्या हे निर्विवाद होय.

## संताजीचे गनिमी युद्धातील डावपेच

गनिमी युद्धातच नव्हे तर कोणत्याही प्रकारच्या युद्धात जो सेनापती शत्रूस चकवितो व त्याच्यावर मात करतो तोच शेवटी यशस्वी होतो. शत्रूस चकविण्याचे ज्याचे डावपेच बिनतोड असतात तोच श्रेष्ठ सेनापती मानला जातो. गनिमी युद्धात तर आपल्यापेक्षा सामर्थ्यशाली शत्रूशी गनिमास टक्कर द्यायची असते. अशा स्थितीत शत्रू बेसावध असता त्यावर अचानक हल्ला करून अथवा त्यास फसवून गोत्यात आणणे हे गनीम सेनेचे नेहमीचेच तंत्र असते.

मोगल सेनानी सर्जाखान, लुत्फुल्लाखान, अलिमर्दानखान, कासिमखान, खानाजादखान, हिंमतखान, हमीदुद्दीनखान इत्यादींशी संताजीने दिलेल्या लढाया या गनिमी लढायांची उत्कृष्ट उदाहरणे आहेत. साताऱ्याच्या पायथ्याशी सर्जाखानाशी झालेली लढाई विचारात

घेतली, तर असे दिसून येते की, संताजी आपल्या प्रतिस्पर्ध्यास आपल्या सैन्यबलाची कधीच कल्पना येऊ देत नसे. मल्हार रामरावाने म्हटल्याप्रमाणे "मराठी फौज किती आहे हा अदमास ध्यानात येऊ देऊ नये" या सूत्रानुसार तो आपल्या फौजेची अनेक तुकड्यांत विभागणी करीत असे. प्रत्येक तुकडीस त्याने लढाईचा कार्यभाग नेमून दिलेला असे. त्याची अचूक अंमलबजावणी होई. पहिल्या तुकडीने लढाईस प्रारंभ करून थोड्या वेळाने आपल्या पराभवाचा आभास निर्माण करून पळ काढायचा, दुसऱ्या तुकडीने शत्रूच्या असुरक्षित गोटावरच हल्ला करायचा; पुढे शत्रू कैचीत सापडला की, आसमंतात लपून बसलेल्या सर्व तुकड्यांनी त्याच्यावर निकराचा हल्ला चढवायचा, हे युद्धतंत्र सर्जाखानाच्या लढाईत आपणास दिसते. आपण हे पाहिलेच आहे की, या लढाईच्या ऐन धुमश्चक्रीत खानाच्या अंगावरील कपड्यांनी पेट घेतला व तो जखमी होऊन खाली पडला. त्यास मराठ्यांनी त्याच्या बायका-मुलांसहित कैद केले. मराठ्यांनी मोठाच विजय संपादित केला. संभाजी महाराजांच्या हत्येनंतर राजाराम महाराजांच्या कारकिर्दीतील मराठ्यांचा हा महाराष्ट्रातील पहिला मोठा लष्करी विजय होता. त्यादृष्टीने या विजयाचे महत्त्व मोठे होते.

शत्रूच्या सेनानीस चकविण्याचा संताजीचा एक हुकमी डावपेच होता. तो असा की, आपली मुख्य फौज तो आडवळणी प्रदेशात अथवा डोंगराळ प्रदेशात लपवून ठेवी आणि फौजेची एक छोटी तुकडी घेऊन शत्रूच्या समोर लढाईसाठी येई. संताजीसारखा मशहूर सेनापती एवढ्या छोट्या लष्करानिशी आपल्यासमोर आल्याचे पाहून शत्रुसेनानीस मोठा चेव उत्पन्न होई व तो मोठ्या इरेने त्याच्याशी लढण्यास सिद्ध होई. लढाईस तोंड फुटताच अल्पावकाशात संताजी आपला पराभव झाला, असे दाखवून रणांगणावरून पळ काढी. शत्रुसेनानीस आधीच चेव उत्पन्न झाल्याने त्याच्या अंगात आता विजयश्रीचा संचार होत असे. संताजीचा पुरा मोड करून त्यास जिवंत पकडण्याची सुवर्णसंधी आपणास मिळते आहे, या आनंदात तो संताजीचा पाठलाग करी. पुढे संताजी व त्याच्या पाठीवर शत्रुसेनानी अशी घोडदौड होत होत संताजी अशा ठिकाणी

येऊन थांबे की, जिथे त्याची मुख्य फौज दरीखोऱ्या व झाडीत लपून बसलेली असे. सावज जवळ येताच लपून बसलेली संताजीची फौज अचानक प्रकट होई आणि शत्रूच्या फौजेस सर्व बाजूंनी घेरी. अशा प्रसंगी शत्रूस आपण पुरते चुकलो आहोत व संताजीच्या तावडीत सापडलो आहोत, या वस्तुस्थितीची जाणीव होत असे. शत्रू पूर्ण हतबल बनत असे. अशा परिस्थितीत जीवावर उदार होऊन 'जिहाद' चे पुण्य प्राप्त करणे अथवा संताजीस पूर्णपणे शरण जाणे, याशिवाय शत्रूस अन्य पर्याय राहत नसे. संताजीचे अलिमर्दानखान व हिंमतखान या मोगल सेनानींवरील विजय हे अशा लष्करी डावपेचाचे विजय आहेत. हे दोन्ही सेनानी चांगले अनुभवी व पराक्रमी होते; पण संताजीच्या डावपेचासमोर त्यांचा अनुभव व पराक्रम कुचकामी ठरला.

संताजीच्या या डावपेचास त्याच्या फौजेचे एक महत्त्वाचे वैशिष्ट्य मोठे साहाय्यभूत होते. ते म्हणजे त्याच्या फौजेत बर्कंदाजांचा (म्हणजे बंदुकी चालविणाऱ्यांचा) मोठा भरणा असे. लढाईच्या ऐन धुमश्चक्रीत हे बर्कंदाज शत्रूवर गोळ्यांचा वर्षाव करीत व त्याची दाणादाण उडवीत. सर्जाखानाशी झालेल्या लढाईत या बर्कंदाजांच्या माऱ्यांनीच शत्रूच्या आघाडीवरील हत्ती जखमी झाले व सैरभैर होऊन आपल्या सैनिकांना तुडवीत मागे पळाले! एवढेच नव्हे तर याच बर्कंदाजांच्या गोळ्यांच्या वर्षावात सर्जाखानाच्या अंगावरील कपड्यांनी पेट घेतला. स्वतः खान जखमी होऊन मराठ्यांच्या हाती सापडला. हिंमतखानाशी झालेल्या लढाईत संताजीच्या फौजेतील बर्कंदाजांनी अशीच महत्त्वाची कामगिरी बजावली होती. ज्या ठिकाणी संताजीने हिंमतखानास चकवून आणले होते त्या ठिकाणच्या झाडांवर हे बर्कंदाज दबा धरून बसले होते. त्यांनी झाडांवरूनच कैचीत सापडलेल्या मोगली फौजेवर गोळ्यांचा पाऊस पाडला आणि अनेकांना ठार केले. अशीच त्यांची एक गोळी हिंमतखानाच्या कपाळास लागली व तो बेशुद्ध होऊन आपल्या हत्तीच्या हौद्यात कोसळला. त्याच क्षणी मोगली फौजेचा पूर्ण पाडाव निश्चित झाला.

संताजीचे गनिमी युद्धाचे डावपेच इतके बिनतोड असत की, त्यांच्या साहाय्याने त्याने अनेक नामांकित मोगल सरदारांना हतबल करून टाकले. पुढे पुढे संताजीबद्दल शत्रूच्या गोटात अशी धास्ती निर्माण झाली की, संताजीचे नाव ऐकताच भल्या भल्या सेनानींची गाळण उडू लागली. संताजीपुढे मोगली फौजा हतवीर्य व असहाय बनू लागल्या. शत्रूचा इतिहासकार खाफीखान याने मोगलांच्या या असहायतेचे अत्यंत मार्मिक वर्णन केलेले आहे. तो लिहितो -

"मराठे सरदारांत प्रमुख म्हणजे संताजी घोरपडे आणि धनाजी जाधव हे होते. त्यांच्यापाशी पंधरा-वीस हजारांच्या जंगी फौजा होत्या. इतर फौजबंद मराठे त्यांच्या हाताखाली काम करीत. या दोघा सरदारांच्यामुळे बादशाही सेनापतींवर कमालीचे आणि भयंकर आघात झाले. यात तो नालायक (नाबकार) संताजी प्रमुख होता. समृद्ध शहरांवर हल्ला करून त्यांचा नाश करणे आणि नामांकित सेनापतींच्यावर तुटून पडणे यात त्याची खूपच प्रसिद्धी झाली होती.

"ज्याला ज्याला म्हणून संताजीशी मुकाबला करण्याचा आणि लढण्याचा प्रसंग आला, त्याच्या नशिबी खालील तीनपैकी एक परिणाम ठरलेला असे - एक तर तो मारला जाई किंवा जखमी होऊन संताजीच्या कैदेत सापडे किंवा त्याचा पराजय होई आणि त्याचे सैन्य संताजीच्या कैदेत सापडे किंवा त्याचा पराजय होई आणि त्याचे सैन्य व बाजारबुणगे गारद होत. आपण जीवानिशी सुटलो हाच आपला पुनर्जन्म झाला, असे त्यास वाटे.

"याचा उपाय कुणालाच सुचेना. युद्ध करण्यासाठी जिकडे जिकडे तो नालायक आणि हलकट कुत्रा (संताजी) तयार होऊन जाई तिकडे तिकडे त्याचा मुकाबला करण्यास बादशहाच्या प्रतिष्ठित सरदारांपैकी एकही तयार होत नसे. जगात धडकी भरून सोडणारी फौज घेऊन तो कोठेही पोहोचला की नरव्याघ्राप्रमाणे असलेल्या अनुभवी योद्ध्यांची हृदये कंपायमान होत."[५]

---

५. मराठ्यांचे स्वातंत्र्ययुद्ध (तारिखे खाफीखान) पृ. २५-२६

संताजीच्या लष्करी पराक्रमाचे उपर्युक्त वर्णन हे कोणी स्वकीय इतिहासकाराने केलेले नाही. ते केलेले आहे संताजीस "नालायक... हलकट... कुत्रा" अशा शिव्या देणाऱ्या शत्रूच्या इतिहासकाराने. म्हणूनच संताजीची स्वातंत्र्ययुद्धातील, मराठ्यांच्या इतिहासातील, कामगिरी महत्तम ठरते. आमच्या एखाद्या मल्हार रामरावासारख्या बखरकाराने केलेले वर्णन हे एखादे वेळी ते स्वजातीच्या अभिमानापोटी केलेले आहे असे आपणास मानता येईल; पण खाफीखानासारख्या शत्रूनेसुद्धा संताजीच्या पराक्रमाची अशी महती गावी यातच त्याच्या असामान्य युद्धनीतिप्रावीण्याची पावती मिळते, हे कोणालाही कबूल करावे लागेल.

## शेवटच्या विजयी हास्याची प्रतीक्षा

गनिमी युद्धात गनीम सैनिक आपल्याहून बलाढ्य अशा साम्राज्यवादी सत्तेशी लढत असतात. साम्राज्यवादी शत्रूकडे मोठमोठ्या फौजा, प्रचंड शस्त्रास्त्रांचे साठे व मुबलक साधनसामग्री असते. गनिमांकडे यांचा अभाव असतो. कालौघात गनिमांनी मोठमोठ्या फौजा उभारल्या तरी ते शत्रूच्या मोठ्या फौजेशी आमनेसामने लढाई (Pitched Battle) देण्याचे टाळतात. कारण अशा एखाद्या लढाईत गनिमांचा पराभव झाला, तर तो गनीम फौजेस फार धोकादायक ठरण्याचा संभव असतो. तेव्हा गनीम सेनापती आपल्या फौजांच्या लहान लहान तुकड्या करून शत्रूशी सातत्याने संघर्ष करीत राहतो.

शत्रूच्या ठाण्यांवर हल्ला करणे, तेथील शत्रूची साधनसामग्री लुटून घेणे, शत्रूच्या फौजेच्या छावणीकडे जाणारी रसद मधल्या मध्येच लुटून घेणे, शत्रूचा प्रदेश जाळून, लुटून बेचिराख करणे, असा गनिमांचा अखंडित संघर्ष चालू असतो. म्हणूनच "मोगलांची फौज असेल तेथे पंचवीस तीस कोसांच्या छट्यांनी राहून त्या फौजेस चैन पडू देऊ नये" असे मराठ्यांच्या गनिमी पद्धतीचे वर्णन करताना मल्हार रामराव म्हणतो. अशा पद्धतीच्या लढाईने शत्रूच्या सैनिकांच्या मनात एक प्रकारची असुरक्षिततेची भावना निर्माण होते आणि त्यातून त्यांच्या नीतिधैर्याचे

खच्चीकरण होते. मराठे गनिमांनी मोगलांच्या फौजेच्या नीतिधैर्याचे खच्चीकरण कसे केले होते, याचे वर्णन करताना मल्हार रामराव म्हणतो, "रात्री दिवसा कोणीकडून येतील, काय करतील असे (मराठ्यांनी) केले. मोंगलाई फौजेत आठही प्रहर भय बाळगीत."

मराठ्यांची गनिमी युद्धपद्धती मोगल सेनानींना बराच काळ उमजू शकली नव्हती. धावपळीच्या लढाया करण्यात त्या काळी सर्व दक्षिणेत मराठ्यांचा हात कोणी धरू शकत नव्हते. मराठ्यांचे संताजी-धनाजी हे सेनापती तर धावपळीच्या गनिमी लढाया करण्यात मोठे निष्णात मानले जात होते. शत्रूशी उत्तम प्रकारे गाठ पडल्यास सामना द्यावा, नाही तर पळून जावे, हे धावपळीच्या लढाईचे तंत्र मोगल सेनानींच्या ध्यानात येत नव्हते आणि म्हणून जेव्हा त्यांच्याशी लढणारे मराठे रणांगणातून पळून जात तेव्हा त्यांना वाटे की, आपणास घाबरून गनीम पळून गेला, आपला विजय झाला!! मोगलांच्या अशा विजयांची वर्णने मोगल दरबारच्या बातमीपत्रांत पानोपानी आढळतात. वानगी दाखल एक पाहा -

"हिंमतखान बहादूर याने पुढीलप्रमाणे अर्ज पाठविला - मी संताजीच्या पाठलागावर तालुके कालकुर्ती मौजे भरमच्या जवळ सात कोसांवर होतो. मराठे चालून आले. युद्ध झाले. मराठ्यांचा आम्ही पराभव केला."[६]

दरबारी बातमीपत्रांप्रमाणेच मोगल सेनानींच्या पत्रांतूनही अशा प्रकारच्या मराठ्यांवरील विजयाची रसभरीत वर्णने वाचावयास मिळतात. स. १६९० साली खटावच्या परिसरात आलेल्या लुत्फुल्लाखान या मोगल सेनानीवर संताजीने हल्ल्यांवर हल्ले चढवून त्याला बेजार केले होते. अशाच एका हल्ल्यातील संताजीच्या गनिमी माघारीचे वर्णन लुत्फुल्लाखान हा बादशहास पाठविलेल्या पत्रात कसे करतो पाहा -

६. मोगल दरबारची बातमीपत्रे, पृ. ३४

"तो गर्विष्ठ संताजी आपल्या सैन्यासहित आमच्या सैन्यावर घसरला. त्यावेळी हाणामारी आणि वीरांच्या आरोळ्या यांमुळे कल्पांताचा भास झाला. आमचे वीर शौर्याने लढत होते. त्यांनी शत्रुसैनिकांपैकी अनेकांचा संहार केला; पण त्याची तमा न बाळगता मराठे पुन्हा पुन्हा चालून येत."

"हे युद्ध एक प्रहरपर्यंत निकराने चालले होते. यानंतर मराठे मागे हटले. माझा मुलगा महंमद खलील आणि इतर सरदार यांनी वर्धनगडच्या पायथ्यापर्यंत मराठ्यांचा पाठलाग केला. संताजीने वर्धनगडचा आश्रय घेतला. त्याचे अनेक सैनिक डोंगरदऱ्यांतून पांगले. आमचे सैनिकही छावणीला परत आले. आमचा फारच मोठा विजय झाला."[७]

हिंमतखान अथवा लुत्फुल्लाखान बादशहाला आपल्या विजयाची खोटी बातमी कळवीत होते असे नाही. सकृतदर्शनी उपर्युक्त लढायांत मोगलांचा विजय आणि मराठ्यांचा पराजय झालाही असावा; पण जयपराजयाचा गुमान मराठे धरीत नव्हते. "अकस्मात यावे, बक मच्छ उचलून नेतो तसा घाला घालावा, शिपाईगिरीची शर्त करावी, प्रसंग पडल्यास माघारे पळून जावे" या युद्धतंत्राप्रमाणे मराठे लढाई देत असत. विजय मिळाला म्हणून ते जल्लोष करीत नव्हते, अथवा पराजय झाला म्हणून ते खंत करीत नव्हते. कारण मराठे पुरते उमजून होते की, मोगलांवरील एखाद्या जयाने अथवा मोगलांकडून झालेल्या आपल्या एखाद्या पराजयाने हे युद्ध जिंकले जाणार नाही. असे अनेक जयपराजय गनिमी फौजेस पचवावे लागतात. मराठ्यांची त्यासाठी पूर्ण मानसिक तयारी झालेली होती.

जगाच्या इतिहासातील अन्य गनिमी सेनापतींप्रमाणे मराठ्यांचा सेनापती संताजी घोरपडे हे पूर्ण जाणून होता की, या दक्षिणेच्या युद्धात अखेर मोगली साम्राज्यवादी शक्तीचाच पराभव होणार आहे आणि मायभूमीच्या स्वातंत्र्यासाठी लढणारे मराठे गनीमच अंती विजयी होणार

---

७. मोगल-मराठा संघर्ष (लुत्फुल्लाची पत्रे), पृ. ११४-११५

आहेत. तोपर्यंत दररोजच्या संघर्षातील लढाया जिंकणे, हरणे यांस फारसे महत्त्व नव्हते, तर या लढाया खेळून युद्ध जिंकणे महत्त्वाचे होते. मराठ्यांच्या स्वातंत्र्ययुद्धात मराठ्यांच्या पराजयाचे असे अनेक प्रसंग आले की, त्या त्या वेळी औरंगजेब बादशहाने आनंदोत्सव साजरे केले; पण संताजीसारखा गनिमांचा सेनापती शेवटच्या आनंदोत्सवाची वाट पाहत असतो. He laughs best who laughs last या उक्तीप्रमाणे मराठ्यांचा हा महान सेनानी शेवटच्या विजयी हास्याची प्रतीक्षा करीत होता.

## संताजीची मराठ्यांच्या इतिहासातील कामगिरी

राष्ट्राच्या जीवनामध्ये केव्हा तरी असा एखादा क्षण येतो की, त्या राष्ट्राचे अस्तित्वच शिल्लक राहते की नाही, अशी परिस्थिती निर्माण होते; पण अशा आणीबाणीच्या परिस्थितीत त्या राष्ट्रात अशी एक अद्‌भुत शक्ती संचारते की, तिच्या योगे सर्व समाज तारला जातो. संभाजी महाराजांच्या हत्येनंतर मराठी समाजात अशीच अत्यंत बिकट परिस्थिती निर्माण झाली होती; पण अल्पावकाशात सर्व मराठी समाज अशा काही अद्‌भुत शक्तीने भारावून गेला की, तिच्या योगे बलाढ्य मोगल सत्तेसही त्याने नमविले. जिथे आदिलशाही व कुतुबशाहीसारख्या पुराण्या सत्ता मोगली सत्तेच्या आक्रमणाच्या प्रचंड दबावाखाली पाचोळ्याप्रमाणे धुळीस मिळाल्या, तिथे ही मराठशाही मात्र फिनिक्स पक्षाप्रमाणे राखेतून उठून पूर्वीपेक्षाही जोमाने वाढत गेली. ही घटना अखिल हिंदुस्थानच्या इतिहासात विलक्षण मानावी लागेल!

सेनापती संताजी घोरपडे याची कामगिरी या अशा अत्यंत बिकट कालखंडातील आहे आणि म्हणूनच ती अत्यंत महनीय आहे. मराठ्यांचा राजा मारला गेला; त्याच्यामागून गादीवर आलेला दुसरा राजा दूर परागंदा झाला; राज्य चोहोबाजूंनी शत्रूने आक्रमिले; गडकोट शत्रूच्या स्वाधीन झाले; राजधानी पडली; राणी व राजपुत्र कैदी बनले; खजिना लुटला गेला; फौज मोडली आणि शेवटी राज्यातील वतनदार मंडळी शत्रूस शरण गेली... याहून मोठे अरिष्ट ते कोणते असू शकते? शिवाजी महाराजांनी अत्यंत दूरदृष्टीने, जिद्दीने व मेहनतीने उभे केलेले मराठ्यांचे

स्वराज्य नष्ट झाले की काय, असा समस्त मराठी समाजास भास पैदा झाला.

यासंदर्भात स. १६९२ साली रामचंद्रपंत अमात्य याने संभाजी राजांच्या हत्येनंतर निर्माण झालेल्या असाधारण परिस्थितीचे व या परिस्थितीत संताजी घोरपडे याने राज्य वाचविण्यासाठी केलेल्या महान कामगिरीचे सात-आठ ओळींत फार मार्मिकपणे वर्णन केलेले आहे. मिरज प्रांताचा देशाधिकारी खंडोबा देव यास संताजीच्या देशमुखी वतनासंबंधी लिहिलेल्या पत्रात पंताने म्हटले आहे -

"राजेश्री संताजी बिन म्हाळोजी घोरपडे सेनापती लष्कर यासी राजश्री छत्रपती स्वामी कर्नाटकात जाते समई या प्रांते (महाराष्ट्रात) ठेऊन गेले. त्या समई इकडे गनिमाची (मोगलांची) धामधूम होऊन कुल देश व दुर्गे हस्तगत केली होती. राज्यामध्ये काही अर्थ उरला नव्हता. कुल मऱ्हाटे याही इमानास खता करून (पारखे होऊन) गनिमाकडे गेले. याही (संताजीने) राजश्रीच्या पायासी बहुतच एकनिष्ठा धरून इमानास खता न करिता जमाव करून सेख निजाम व सर्जाखान व रणमस्तखान व जाननिसारखान येसे उमदे वजीर बुडविले. जागाजागा गनिमास कोटगा घालून नेस्तनाबूद केला आणि देश सोडविला. राज्य रक्षणतेच्या प्रसंगास असाधारण श्रम केले. औरंगजेबास दहशत लाविली. पुढे कित्येक स्वामी कार्याचे ठायी हिंमत धरिताती...."[८]

रामचंद्रपंत अमात्यासारख्या जाणत्या पुरुषाने संताजीच्या कार्याचे केलेले हे मूल्यमापन आहे. संभाजी राजांच्या हत्येनंतर शत्रूने

---

८. कापशीकर सेनापती घोरपडे घराण्याची कागदपत्रे, पृ. २१

सदरचे पत्र स. १६९२ साली राजाराम महाराजांनी संताजीस मामले मिरजेची बावीस कार्यातीची देशमुखी बहाल केली त्यासंदर्भात आहे. या वतनास कोणी वारसदार राहिलेला नव्हता. तसेच देशमुखीचे जे मुतालिक होते त्यांनीच ही देशमुखी बळकाविली होती. एवढेच नव्हे तर ते मोगलांना मिळून होते.

शिवकालीन वतनाविषयक कागदपत्रांत एखाद्या व्यक्तीच्या राज्यातील कार्यासंबंधी फार तर एखादी ओळ लिहिलेली आढळते; पण संताजीची राज्यातील कामगिरीच एवढी महान होती की, तिची दखल राज्यकर्त्यांना आपल्या वतनपत्रात एवढ्या विस्ताराने व गौरवाने घ्यावी लागली. वतनी कागदपत्रांत अशी बाब अपवादात्मक आढळते.

राज्यातील सर्व देशदुर्ग हस्तगत केले; राज्यातील प्रतिष्ठित मराठा घराणी स्वराज्याचे इमान वाऱ्यावर सोडून मोगल बादशहाच्या पायाशी रुजू झाली. अशा असाधारण परिस्थितीचे वर्णन अमात्यासारख्या शिवकालीन मुत्सद्याने "राज्यामध्ये काही अर्थ उरला नव्हता" अशा मोजक्या शब्दांत; पण अचूकपणे केले आहे. अमात्य म्हणतो की, अशा आपत्काली संताजी घोरपडे याने मात्र स्वराज्याचे इमान सोडले नाही! उलट शत्रूच्या उमद्या वजीरांशी जागोजागी कोटगा घालून त्यांना बुडविले! नेस्तनाबूद केले! स्वराज्यास मोगलांच्या मगरमिठीतून सोडविले! आपल्या पराक्रमाने खासा औरंगजेब बादशहास दहशत लाविली! संताजीची मराठ्यांच्या इतिहासातील हीच सर्वांत मोठी कामगिरी होय!

राजधानी, गडकोट, खजिना, फौज इत्यादी गोष्टी राज्यास आवश्यक असतात हे खरे; पण या सर्व राज्याच्या बाह्यात्कारी गोष्टी असतात. याशिवाय राज्य टिकायचे असेल, तर एक अत्यंत महत्त्वाची गोष्ट अस्तित्वात असावी लागते. ती म्हणजे राज्याची कल्पना लोकांच्या हृदयात विराजमान असावी लागते; ती तशी असेल तर राज्याची बाह्यात्कारी अंगे नष्ट झाली तरी ती पुन्हा पैदा करता येतात. मराठ्यांचा स्वराज्याचा इतिहास यास साक्ष आहे. स्वराज्याची राजधानी, गडकोट अशी बाह्यात्कारी अंगे लुप्त झाली तरी शिवाजी महाराजांनी मराठी लोकांच्या हृदयांत निर्माण केलेली स्वराज्याची कल्पना लयास गेलेली नव्हती. या कल्पनेच्या अस्तित्वामुळेच सुरुवातीस उल्लेखलेल्या अद्‌भुत शक्तीचा मराठी समाजात संचार होऊ शकला. या अद्‌भुत शक्तीनेच तरुण छत्रपती राजाराम महाराज व त्यांचे रामचंद्रपंत, संताजी-धनाजीसारखे सहकारी यांना भारावून टाकले. इतके की, हिंदुस्थानातील बलाढ्य साम्राज्यसत्तेशी ते समर्थपणे तोंड देऊ शकले.

शत्रूपासून राज्याचे संरक्षण करीत असता राज्यकर्ता दोन गोष्टींबाबत दक्ष असावा लागतो. पहिली गोष्ट म्हणजे राज्याची राजनैतिक आघाडी आणि दुसरी म्हणजे राज्याची लष्करी आघाडी. मोगल सत्तेशी संघर्ष करू इच्छिणाऱ्या व शकणाऱ्या हिंदवी सत्तांची

संघटना बांधणे हे राजनैतिक आघाडीवर मराठ्यांचे प्रमुख कर्तव्य होते; पण मोगली सत्तेच्या विरोधात जाऊन मराठ्यांशी हातमिळवणी करू शकणाऱ्या अशा कोणी सत्ताच दक्षिणेत अस्तित्वात नव्हत्या. मोगलांना दक्षिणेत थोडाफार अटकाव करू शकणाऱ्या आदिलशाही व कुतुबशाही या दोन्ही सत्ता केव्हाच अस्तमान झाल्या होत्या. त्यांच्या अस्तानंतर मागे राहिले ते कर्नाटकाच्या विस्तीर्ण भूभागावरील छोटेमोठे नायक व पाळेगार; पण यांपैकी कुणी मोगली सतेशी सामना करू शकत नव्हते. राजाराम महाराजांनी जिंजीस पोहोचल्यावर कर्नाटकातील या हिंदू नायकांची व पाळेगारांची एक संयुक्त लष्करी आघाडी उभारण्याचा प्रयत्न केला; पण तो प्रयत्न यशस्वी झाला नाही. यानंतर उरल्या इंग्रज, पोर्तुगीज, फ्रेंच इत्यादी किनाऱ्यावरील परकीय युरोपियन सत्ता; पण त्या मराठ्यांना साहाय्य करून मोगल सम्राटाचा रोष काय म्हणून ओढवून घेतील? शिवाय या युरोपियनांपैकी कोणी मोगल सम्राटास आव्हान देऊ शकेल, अशी सत्ता नव्हती. सम्राटाच्या कृपेवरच ते हिंदुस्थानात व्यापार करीत होते. अशा परिस्थितीत आपला बचाव करण्यासाठी मराठ्यांनी शत्रूशी काही तडजोड करावी, तर बादशहा अशा तडजोडीस थोडाही तयार नव्हता. मराठ्यांचे सर्व गडकोट ताब्यात घेऊन, राजाराम छत्रपतीस कैद करून मराठी सत्तेचे अस्तित्वच त्याला संपवायचे होते. अशा परिस्थितीत राजनैतिक आघाडीवर फारशी हालचाल करण्यास मराठ्यांना वाव नव्हता.

स्वाभाविकच मराठ्यांची सर्व शक्ती लष्करी आघाडीवर केंद्रित होणे अपरिहार्य होते. ही एकच आघाडी प्राणपणाने लढविणे व शेवटच्या विजयापर्यंत शत्रूशी झुंजत राहणे एवढेच या कालातील मराठ्यांचे ध्येयधोरण होते. मराठ्यांच्या लष्करी आघाडीची धुरा छत्रपतींनी सेनापती संताजी घोरपडे याच्यावर सोपविली होती आणि इतिहास अशी साक्ष देतो की, मराठ्यांच्या या सेनापतीने ही आघाडी विलक्षण कौशल्याने व जिद्दीने सांभाळली. संताजीच्या लष्करी नेतृत्वाने व कर्तृत्वाने स्वराज्य या भयानक अरिष्टातूनही तरून गेले. संताजीची ही कामगिरी इतकी मोलाची होती की, त्याच्यानंतरच्या महाराष्ट्रातील

अनेक पिढ्यांनी त्याचे कृतज्ञतेने स्मरण करावे.

## नवी लष्करनीती

मराठ्यांच्या स्वातंत्र्य युद्धकालातील नेता म्हणून संताजीची आणखी एक महत्त्वाची कामगिरी आहे. ती म्हणजे मराठी राज्याची नवी लष्करनीती त्याने अस्तित्वात आणली. 'सैन्य पोटावर चालते' हे लष्करी सूत्र बऱ्याच अंशी सत्य आहे. राज्याचे संरक्षण करणारे लष्कर सुसज्ज व ताजेतवाने राहण्यासाठी राज्याचा खजिना रिक्त राहून चालत नाही. तो सदैव समृद्ध असावा लागतो; पण राजारामकालात राज्य नावाची चीजच फारशी अस्तित्वात नसल्याने खजिन्याचा प्रश्न व त्यावर आपले पोट भरणाऱ्या लष्कराचा प्रश्नच निर्माण होऊ शकत नव्हता. अशा परिस्थितीत मराठ्यांचा हा सेनापती २५/२५ हजारांच्या व काही प्रसंगी ३५/४० हजारांच्या फौजा घेऊन दक्षिणेत संचार करताना दिसतो, या मागचे रहस्य काय? रहस्य उघड आहे. सर्व दक्षिण संताजीच्या लष्करास व पराक्रमास मोकळी होती. संताजी आपली "जगात धडकी भरून सोडणारी फौज घेऊन" जिथे जाई तिथे त्याचा प्रतिकार करण्याची हिंमत कुणा बादशाही अंमलदारास होत नसे. संताजीशी संघर्ष म्हणजे पराभूत होऊन त्याचे कैद बनणे, लढता लढता मरणे अथवा खंडणी देऊन आपली सुटका करून घेणे, अशा प्रकारचे तीनच पर्याय बादशाही अंमलदारांपुढे असत आणि त्याला शेवटचाच पर्याय अधिक सुरक्षित वाटत असे. संताजीस खंडणी पोहोचती करून नगराची अथवा ठाण्याची लूट टाळणे, हे त्याला अधिक हिताचे वाटत असे. संताजीचा खजिना या पद्धतीने तो जिथे जाई तिथे तो निर्माण करीत असे. याशिवाय दक्षिणेतील मोगली फौजांना उत्तरेतून येणाऱ्या रसदी त्याच्या भक्षस्थानी पडत त्या वेगळ्याच. अशा प्रकारे संताजीच्या लष्कराचे पोट शत्रूच्या खजिन्यावर चालत असे. संताजीच्या पूर्वी शिवाजी महाराजांनी आपल्या लष्कर खर्चासाठी शत्रूचे प्रदेश व नगरे लुटली हे खरे; पण शिवप्रभूंची फौज बारमास शत्रूच्या प्रदेशातील लुटीवर अथवा खंडणीवर पोसत होती, असे नाही. लुटीत मिळालेली संपत्ती रीतसर खजिन्यात जमा होई व खजिन्याकडूनच फौजेस नियमित वेतन दिले जाई. राजारामकालात ही

सर्वच परिस्थिती बदलून गेली. आपल्या फौजा बारमास शत्रूच्या प्रदेशावर पोसण्याची नवी लष्करनीती संताजीसारख्या सेनापतीस स्वीकारावी लागली आणि ती अपेक्षेपेक्षा यशस्वी ठरली. नव्या नीतीपुढे लष्कराचा खर्च परस्पर निघत होता. त्याचबरोबर मराठ्यांच्या लष्करी धामधुमीमुळे शत्रूची शासन यंत्रणा खिळखिळीत होत होती. एकाच वेळी दोन हेतू साध्य होत होते. याच नीतीचा अवलंब संताजीनंतर ताराबाईकालातही मराठा सेनानींनी चालू ठेवला. प्रचंड फौजा उभारून त्यांनी बादशहाच्या गुजरात, माळवा, गोवळकोंडा इत्यादी अनेक सुभ्यांत लष्करी मोहिमा काढल्या आणि मोगली बादशाहीच्या भव्य इमारतीस खिंडारे पाडण्यास प्रारंभ केला. बादशहा जेव्हा मराठ्यांच्या सातारा, पन्हाळा, विशाळगड हे किल्ले जिंकून घेण्यासाठी सह्याद्रीच्या दऱ्याखोऱ्यांतून मोहिमा काढीत होता, तेव्हा मराठे सेनानी त्याच्या माळवा, गुजरातसारख्या संपन्न सुभ्यांत धुमाकूळ घालीत होते.

इतिहासात 'जर तर' यांना फारसे स्थान नसते, हे खरे; पण अशा 'जर तर' मुळेच इतिहासातील महान व्यक्तींच्या कार्याचा अंदाज बांधता येतो. छत्रपती शिवाजी महाराजांना वयाच्या पन्नासाव्या वर्षी मृत्यू आला नसता तर? संभाजी महाराज संगमेश्वराहून शत्रूच्या छाप्यातून सहीसलामत सुटले असते तर? औरंगजेबऐवजी दारा शुकोव्ह यास हिंदुस्थानची बादशाही मिळाली असती तर? या सर्व प्रश्नांची उत्तरे 'तर मग इतिहासच बदलता असता' हेच द्यावे लागेल; पण तो कशा प्रकारे बदलला असता, त्याने कसे वळण घेतले असते, याचा शोध घेताना आपण न कळत त्या ऐतिहासिक व्यक्तीच्या कामगिरीच्या प्रभावाचाच शोध घेत असतो. तिच्या हातून घडलेल्या कार्यावरून तिच्याकडून घडू शकणाऱ्या कार्याचा अंदाज आपण बांधत असतो.

यासंदर्भात मराठ्यांच्या इतिहासाचे परिशीलन करीत असता मनात असा प्रश्न सहज येऊन जातो की, संभाजी राजाच्या हत्येनंतर राजाराम छत्रपतींना संताजी-धनाजी यांच्यासारखे पराक्रमी सेनानी मिळाले नसते तर? ज्यांनी आपल्या महान पराक्रमी कृत्यांनी मराठी सत्ता समूळ नष्ट करण्यासाठी धावून आलेल्या महाबलाढ्य मोगल सम्राटासही

हतवीर्य करून टाकले, ते सेनानीच मराठ्यांत निर्माण झाले नसते तर? या प्रश्नांच्या उत्तरातच या सेनानींचे मराठ्यांच्या इतिहासातील स्थान परिलुप्त झालेले आहे. संताजी-धनाजीसारखे सेनानी मराठ्यांना लाभले नसते तर मराठ्यांचा इतिहास संभाजी राजाच्या वधाबरोबरच बादशाही छावणीत संपुष्टात आला असता! शिवाजी महाराजांच्या स्वराज्याची थोर परंपरा व त्याबरोबर वाढणारी मराठ्यांची अस्मिता त्याच वेळी समाप्त झाली असती! आणि त्यानंतरचा मराठ्यांचा इतिहास हा मोगली साम्राज्य सत्तेखालच्या एका गुलाम समाजाचा इतिहास बनला असता! पण असे काही घडून आले नाही. संभाजी राजाच्या हत्येनंतर मराठी सत्ता नष्ट तर होऊ शकलीच नाही, उलट ती जोमाने वाढत राहिली. मराठ्यांचा शत्रूशी संघर्ष दिवसेंदिवस तीव्रतर बनत गेला आणि शेवटी या संघर्षात मराठे विजयी झाले.

## शिवछत्रपतीप्रणीत क्षात्रतेजाचा पाईक

मराठ्यांच्या इतिहासात छत्रपती शिवाजी महाराज हे असामान्य सेनानी मानले जातात. त्यांचे पराक्रम, त्यांची रणनीती व त्यांची गनिमी युद्धपद्धती यांच्या कक्षा आजही आपणास थक्क करून सोडतात. अशा प्रकारे थक्क करून सोडणारा अन्य कोणी सेनानी मराठ्यांच्या इतिहासात झाला असेल, तर तो संताजी घोरपडे हाच होय. १७ व्या शतकात लष्करी क्षेत्रात शिवाजी महाराजांच्या खालोखाल योग्यता असणारा तो श्रेष्ठ सेनानी होता. हिंदुस्थानात बावीस सुभ्यांच्या विशाल मोगल साम्राज्यांचा धनी औरंगजेब बादशहा याच्या दक्षिणेच्या मोहिमेचा संताजीने बोजवारा उडविला आणि मराठ्यांच्या हिंदवी स्वराज्याचे रक्षण करून महाराष्ट्रातील क्षात्र धर्माची परंपरा उज्ज्वल केली. अशा या मराठ्यांच्या महान सेनापतीच्या स्मृतीस आमचे विनम्र अभिवादन!

***

## परिशिष्ट-१

## घोरपडे घराण्याची वंशावळ




मुधोळ संस्थानच्या घोरपडे घराण्याचा इतिहास, परिशिष्ट पृ. १७०, १७१, १७४

# परिशिष्ट-२

मिरज प्रांताचा मराठा सुभेदार खंडोबा येदेव (यादव?) यास रामचंद्रपंत अमात्याने संताजी घोरपडे याच्या देशमुखीसंबंधी पाठविलेले पत्र - (दि. ९ जुलै, १६९२). संभाजी महाराजांच्या वधानंतरच्या संकटकालात संताजीने स्वराज्याचे रक्षण करून औरंगजेबास दहशत कशी लावली, याचे वर्णन पंताने या पत्रात केले आहे. यासोबत या पत्राचे मराठी लिप्यंतर दिलेले आहे.

राजश्री खंडोबा येदेव (यादव?)
देशाधिकारी व देशलेखक वर्तमान व भावी
पा।स माहाल मिरज प्रांत गोसावी यासी -

अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य सेवक रामचंद्र निळकंठ अमात्य नमस्कार सु॥ सलास तीनसेन आलफ. राजश्री संताजी बिन म्हाळोजी घोरपडे सेनापती लष्कर यासी राजश्री छत्रपती स्वामी कर्नाटकात जाते समई या प्रांते ठेऊन गेले. त्या समई ईकडे गनिमाची धामधूम बहुत होऊन कुल देश व दुर्गे हस्तगत केली होती. राज्यामध्ये काही अर्थ उरला नव्हता. कुल मऱ्हाटे याही इमानास खता करून गनिमाकडे गेले. याही राजश्रीच्या पायासी बहुतच एकनिष्ठा धरून इमानास खता न करता जमाव करून सेख निजाम व सर्जाखान व रणमस्तखान व जानसारखान येसे उमदे वजीर बुडविले. जागा जागा गनिमास कोटगा घालून नेस्तनाबूद केला आणि देश सोडविला. राज्य रक्षणतेच्या प्रसंगास असाधारण श्रम केले. औरंगजेबास दहशत लाविली. पुढे कितेक स्वामी कार्याचे ठायी हिंमत धरिताती. याकरिता यावरी संतोषी होऊन मामले मिरज कार्यात सत्तावीस येथील देशमुख होते ते नेस्तनाबूद झाले. त्यांचे वंशी कोणी नाही. याचे मुतालिक होते ते बळाऊन देशमुखी वतन खात होते. (ते) तेहडी बुद्धी धरून गनिमास मिलोन फिसात केली. एकनिष्ठा धरून इकडे येऊन भेटले नाहीत. म्हणून त्याची देशमुखी दूर करून मशार जिल्हेस राजारामला देशमुखी आपले मजकुराचे आवलाद व अफलाद पुत्रपौत्रा दिल्ही असे. तरी मामले मजकुरीची देशमुखी यांचे दुमाला करणे.

.......................
..........................जाणिजे. निदेश समक्ष. (शिक्का)

***

## परिशिष्ट - ३

## संताजी घोरपडे सेनापती याच्या चार मुद्रा

१. सातारा किल्ल्याच्या मुक्कामी दि. ४ ऑक्टोबर, १६९१ रोजी झालेल्या हजीर मजालसी पत्रावरील मुद्रा -

**०श्री ~**

**राजाराम भूपाल-**

**भक्तसेनापतेः शुभा।।**

**संताजी घोरपडे तस्य**

**मुद्रा भाति जय**

**प्रदा।।**[१]

२. रामचंद्र अमात्य यास संताजी घोरपडे याने गैरसमजाचे निराकरण करण्यासाठी लिहिलेल्या सुप्रसिद्ध पत्रावरील मुद्रा - इ. स. १६९३

**श्रीराजारामचरणी**

**तत्पर। संताजी घोर-**

**पडे निरंतर।**[२]

३. छत्रपती राजाराम महाराज यांना महादजी जगदाळ्याच्या मसूरच्या देशमुखीविषयीची संताजी घोरपडे याने लिहिलेल्या पत्राच्या शेवटी उमटविलेली मुद्रा - दि.१५ ऑक्टोबर, १६९४.

**+ + + + + +**

**+ + + + + +**

**+ प्रभा।। संताजी घोर-**

**पडे तस्य मुद्रा भा**

**ति जयप्रदा।**[३]

४. जयराम स्वामीच्या गावास त्रास देऊ नये म्हणून लष्करातील पागा व शिलेदार यांना उद्देशून लिहिलेल्या पत्रावरील मुद्रा - दि. १ एप्रिल, १६९७

**श्रीराजाराम भक्तस्य**

**जफतन्मुलुकस्यच**

**संताजी + + + +**[४]

---

१. मराठ्यांच्या इतिहासाची साधने, खं. ८, पृ. ३९ २. बावडा दप्तर, खं. १, पृ. ५४

३. मराठ्यांच्या इतिहासाची साधने, खं. १५, पृ. ८१

४. भा. इ. सं. मं., वार्षिक इतिवृत्त, शके १८३७, पृ. ३१४

# परिशिष्ट - ४

## संताजी - चरित्र : कालपट

| | |
|---|---|
| इ. स. १२९४ | : अल्लाउद्दीन खिलजीची दक्षिणेत स्वारी. इस्लामी सत्तेचा दक्षिणेत प्रवेश. |
| इ. स. १३१७ | : अल्लाउद्दीनपुत्र मुबारक याने देवगिरीचे राज्य बुडविले. |
| इ. स. १३३४ | :घोरपडे-भोसले यांचा मूळ पूर्वज सुजनसिंह दक्षिणेत. |
| इ. स. १३४७ | :हसन गंगू बहामनी राज्याची स्थापना करतो. |
| इ. स. १३५२ | :सुजनसिंहपुत्र दिलीपसिंह यास बहामनी राज्यात "खाशांच्या घोडेस्वारांचा मुख्य" हे पद. |
| इ. स. १३९८ | :घोरपड्यास मुधोळ जहागीर प्राप्त. |
| इ. स. १४७१ | :भीमसिंहास "राजा घोरपडे बहाद्दर"हा किताब. |
| इ. स. १५६५ | :तालीकोटची लढाई. विजयनगर साम्राज्याचा अस्त. कर्णसिंह व भीमसिंह यांचा पराक्रम. |
| इ. स. १५७८ | :संताजीचा पणजोबा वल्लभजी महाराष्ट्रात स्थायिक. |
| इ. स. १६४५ (सु.) | :संताजीचा जन्म. |
| इ. स. १६७४ (नंतर) | :संताजीस शिवाजी महाराजांच्या लष्करात जुमलेदाराचा हुद्दा. |
| इ. स. १६७७ | :हंबीररावाबरोबर कोप्पल प्रांतावरील स्वारीत संताजीचा पराक्रम. |
| नोव्हे. १६७९ | :संताजी शिवाजी महाराजांच्या जालन्याच्या स्वारीत. रणमस्तखानाशी लढाई. |
| इ. स. १६८१ | :संताजीची कर्नाटकात मोहीम. पठाण-बेरडांचा पराभव. अनेक ठाणी सर. संभाजी महाराजांची प्रशस्ती. |
| १ फेब्रु., १६८९ | :संगमेश्वरावर संभाजी महाराज कैद. संताजीचे पिते म्हाळोजी घोरपडे स्वामिकार्यावर ठार. संताजी, खंडो बल्लाळ इत्यादी जिवानिशी सुटून रायगडाकडे. |
| ९ फेब्रु., १६८९ | :राजाराम महाराजांचे रायगडावर मंचकारोहण. |
| ११मार्च, १६८९ | :मोगली छावणीत संभाजी महाराजांची हत्या. |
| ५ एप्रिल, १६८९ | :राजाराम महाराज रायगडाबाहेर पडतात. |

| | |
|---|---|
| सप्टेंबर १६८९ | :संताजीचा बादशाही छावणीवर हल्ला. छावणीचे सोन्याचे कळस कापले. परत येताना रायगडास वेढा घालून बसलेल्या जुल्फिकारखानावर हल्ला. |
| २६ सप्टें., १६८९ | :राजाराम महाराजांचे पन्हाळ्याहून जिंजीकडे प्रयाण. |
| ऑक्टो.-नोव्हें. १६८९ | :बिदनूरच्या राणीवर चालून जाणाऱ्या जाननिसारखान, मतलबखान व सर्जाखान यांचा संताजीकडून पराभव. |
| ऑक्टो.-नोव्हे. १६८९ | :संभाजी महाराजांना कैद करणारा शेख निजाम संताजीकडून जखमी व पराभूत. |
| नोव्हें. १६८९ | :राजाराम महाराज जिंजीस पोहोचतात. |
| ३ नोव्हें., १६८९ | :रायगड येसूबाई व शाहू राजे यांच्यासह मोगलांच्या ताब्यात. |
| २०/२५ एप्रिल १६९० | :साताराच्या पायथ्याशी सर्जाखान संताजीकडून पराभूत व कैद. |
| जून १६९० | :म्हसवडजवळ संताजी-धनाजीचा लुत्फुल्लाखानावर हल्ला. |
| ६ जुलै १६९० | :संताजीचा लुत्फुल्लाखानाच्या खटावमधील छावणीवर रात्रीचा छापा. मोगलांची दाणादाण. |
| ऑगस्ट १६९० | :जुल्फिकारखान जिंजीच्या पायथ्याशी पोहोचला. वेढा चालू. |
| २३ नोव्हें., १६९० | :नेमाजी शिंदे, माणकोजी पांढरे व नागोजी माने मोगलांकडून निघून स्वराज्यात दाखल. |
| इ. स. १६९१ | :या साली मे पूर्वी केव्हातरी संताजीस सेनापतिपदाची प्राप्ती. |
| जून १६९१ | :संताजीचा जाननिसारखान व तहव्वूरखान यांच्यावर विजय. |
| १६ डिसें., १६९१ | :असदखान व कामबक्ष जिंजीच्या पायथ्याशी पोहोचतात. |
| ऑगस्ट १६९२ | :मराठे पन्हाळा मोगलांकडून घेतात. |
| सप्टें.-ऑक्टो. १६९२ | :संताजी-धनाजीचा बेळगाव-धारवाड प्रदेशांत धुमाकूळ. |

| | |
|---|---|
| १३ डिसें., १६९२ | :इस्माईलखान मखा धनाजीकडून कैद. |
| १४ डिसें., १६९२ | :अलिमर्दानखान संताजीकडून कैद. गनिमी काव्याची अप्रतिम लढाई. |
| १६ डिसें., १६९२ | :जिंजीपुढे मोगलांची दाणादाण. कामबक्ष असदखानाकडून कैद. वेढा उठतो. |
| ५ जाने., १६९३ | :संताजीचा जुल्फिकारखानावर देसूर येथे हल्ला. |
| जाने. १६९३ | :जुल्फिकारखानाची राजाराम महाराजांकडे तहाची याचना. सुरक्षित माघार घेऊ देण्याची परवानगी. संताजीचा रुसवा. |
| २२ जाने., १६९३ | :मोगलांची जिंजीपुढून वांदिवॉशकडे माघार. |
| ७ फेब्रु., १६९३ | :संताजीचा कासिमखानावर हल्ला. खान पराभूत. कांचीपुरममध्ये आश्रय. जुल्फिकारखान साहाय्यास धावून येतो. |
| मार्च १६९३ | :संताजी त्रिचनापल्लीस वेढा घालतो. |
| मार्च १६९३ | :बहिर्जी घोरपडे व याचप्पा नाईक यांची बंडखोरी |
| २३ एप्रिल, १६९३ | :त्रिचनापल्लीचा नायक शरण. |
| एप्रिल १६९३ | :राजाराम महाराज तंजावरच्या भेटीस. |
| मे १६९३ | :संताजीचा राजाराम महाराजांशी बिघाड. संताजी सेनापतिपदावरून दूर. धनाजीची नेमणूक. |
| मे - जून १६९३ | :बंडखोर बहिर्जी व याचप्पा यांचा राजाराम महाराजांशी वेलोरजवळ झगडा. |
| जुलै - ऑगस्ट १६९३ | :संताजी २० हजार घोडदळानिशी महाराष्ट्रात येतो. |
| ऑक्टो. १६९३ | :जुल्फिकारखान वेढा घालण्याच्या इराद्याने जिंजीपुढे पुन्हा दाखल. |
| ऑक्टो. १६९३ | :संताजीची नजिबखान बहादूर याच्याशी लढाई. |
| ऑक्टो.- नोव्हें. १६९३ | :हिंमतखानाशी संताजीच्या धावपळीच्या लढाया. विक्रमहळ्ळीजवळ हिंमतखान, हमीदुद्दीनखान व ख्वाजाखान यांच्याशी लढाई. हिंमतखान संताजीच्या पाठलागावर. |
| नोव्हें. १६९३ | :संताजी उत्तर कर्नाटकात. चौथाईची वसुली. |
| नोव्हें.-डिसें., १६९३ | :संताजी जिंजीच्या अर्ध्या वाटेवरून परत. |

| | |
|---|---|
| जाने. - फेब्रु.१६९४ | :संताजीची गोवळकोंडा प्रदेशात मोहीम. |
| फेब्रु. १६९४ | :जुल्फिकारखान जिंजीचा वेढा उठवून तंजावरच्या स्वारीवर. |
| फेब्रु. १६९४ | :संताजी मोहिमेवरून महादेव डोंगराकडे परत. |
| फेब्रु. - मार्च १६९४ | :संताजी-धनाजीची दिलजमाई. |
| मार्च १६९४ | :जुल्फिकारखानाचा तंजावरवर हल्ला. |
| मार्च १६९४ | :राजाराम महाराजांकडून बहिर्जीचे समाधान. महाराज बहिर्जीस तंजावरच्या मदतीस पाठवितात. |
| मे १६९४ | :तंजावरचे शहाजीराजे मोगलास शरण. |
| मे १६९४ | :संताजी उत्तर कर्नाटकात मोहिमेवर. |
| जून १६९४ | :संताजी भूपालगडाकडे परत. |
| जुलै १६९४ | :रामचंद्रपंत, संताजी व धनाजी यांची साताऱ्याच्या प्रदेशात संयुक्त लष्करी मोहीम. |
| १५ सप्टें., १६९४ | :जुल्फिकारखानाचा जिंजीस पुनरपि वेढा. राजाराम महाराजांची विकट अवस्था. |
| सप्टें., १६९४ | :जुल्फिकारखान याचप्पा नायकाचा वध करतो. |
| सप्टें.-ऑक्टो. १६९४ | :जुल्फिकारखानाची जिंजीहून वांदिवॉशकडे माघार. |
| ऑक्टो. १६९४ | :शंकराजी नारायण संताजीस उपदेश करतो. पंचवीस हजार स्वारांनिशी संताजी कर्नाटकच्या स्वारीवर रवाना. प्रथम गोवळकोंड्याकडे. |
| ऑक्टो.-नोव्हें. १६९४ | :संताजी विजापूर प्रदेशाकडे. हिंमतखानाशी अनेक लढाया. |
| डिसें. १६९४ | :संताजी रायचूर प्रदेशात. हिंमतखानाशी लढाई. |
| जाने. १६९५ | :संताजी खानदेशात मोहिमेवर. धरणगावाहून बुऱ्हाणपुरावर स्वारी. बुऱ्हाणपूरच्या सुभेदाराचा पराभव. बुऱ्हाणपूरची लूट. |
| फेब्रु. १६९५ | :संताजीच्या स्वारीच्या वार्तेने सुरतेत घबराट. |
| फेब्रु. १६९५ | :संताजीचा नंदुरबारवर हल्ला. |
| मार्च १६९५ | :संताजी मोहिमेवरून साताऱ्याकडे परत. |
| मार्च १६९५ | :जुल्फिकारखान जिंजीच्या आसमंतातील किल्ले जिंकतो. |

| | |
|---|---|
| मे १६९५ | :परळी येथे संताजी आपल्या पुतण्यांची लग्ने साजरी करतो. |
| जुलै १६९५ | :संताजीचा खटाव ठाण्यास वेढा. |
| सप्टें. १६९५ | : संताजीची चंदन - वंदनच्या पायथ्याशी हमीदुद्दीनखानाशी लढाई. |
| ऑक्टो. १६९५ | :जुल्फिकारखानाचा वेलोर किल्ल्यास वेढा. |
| ऑक्टो. १६९५ | : संताजीची उत्तर कर्नाटकात मोहीम. रामदुर्गास वेढा. |
| नोव्हें. १६९५ | : संताजी गदगच्या परिसरात. नंतर चित्रदुर्गकडे. |
| नोव्हें. १६९५ | : संताजीचा कासिमखान, खानाजादखान इत्यादी मोगल सरदारांवर महान विजय. कासिमखानाची आत्महत्या, इतरांची शरणागती. |
| डिसें. १६९५ | :जुल्फिकारखान वेलोरचा वेढा उठवितो. अर्काट येथे आश्रयास. |
| जाने. १६९६ | :हिंमतखान बसवापट्टण येथे अडचणीत. शहाजादा बेदारबख्तास त्याच्या साहाय्यास जाण्याचा हुकूम. |
| जाने. १६९६ | :धनाजी आपल्या फौजेसह जिंजीच्या प्रदेशात. |
| २० जाने., १६९६ | :बसवापट्टणजवळ संताजीची हिंमतखानाशी लढाई. खान ठार. |
| २५ फेब्रु., १६९६ | :संताजीची हमीदुद्दीनखानाशी लढाई. संताजीची माघार. |
| मार्च १६९६ | : धनाजी जिंजी किल्ल्यात दाखल. |
| मार्च १६९६ | :संताजीच्या हमीदुद्दीनखानाशी धावपळीच्या लढाया. हमीदुद्दीनखानाचा बादशहाकडून सत्कार. संताजी जिंजीकडे रवाना. |
| एप्रिल १६९६ | :संताजी आपल्या फौजेसह जिंजीच्या प्रदेशात. |
| एप्रिल १६९६ | :संताजीची जुल्फिकारखानाशी अरणी येथे लढाई. |
| ८ मे, १६९६ | :संताजी आपल्या फौजेनिशी जिंजीत दाखल. |
| मे - जून १६९६ | :संताजीचा राजाराम महाराजांशी बिघाड. संताजी आपल्या फौजेसह जिंजीबाहेर. संताजी सेनापतिपदावरून दूर |
| जून १६९६ | :संताजीची राजाराम महाराज, धनाजी यांच्याशी |

| | |
|---|---|
| | लढाई. अमृतराव निंबाळकर ठार. |
| जुलै - ऑगस्ट १६९६ | :संताजीचा जुल्फिकारखानाशी संघर्ष. |
| सप्टें. १६९६ | :संताजीचा अर्कोटला वेढा. |
| सप्टें. -ऑक्टो. १६९६ | :संताजी-जुल्फिकारखान संघर्ष चालूच. संताजीच्या हाताखालची फौज आपल्याकडे आणण्यात राजाराम महाराज यशस्वी. जुल्फिकारखान संताजीच्या पाठलागावर. |
| नोव्हें. १६९६ | :संताजी महाराष्ट्राच्या मार्गावर. धनाजी व हणमंतराव निंबाळकर संताजीच्या मागावर. |
| नोव्हें. - डिसें. १६९६ | :धनाजीचा संताजीवर हल्ला. संताजी पराभूत असहाय होऊन महाराष्ट्राकडे पलायन. |
| डिसें. १६९६ | :धनाजी संताजीच्या पाठलागावर. दुसऱ्या बाजूने जाने. १६९७ गाजिउद्दीन फिरोजजंगही पाठलागावर. |
| मार्च - एप्रिल १६९७ | :संताजी साताऱ्याच्या प्रदेशात. धनाजीशी शेवटच्या चकमकी. |
| एप्रिल १६९७ | :दहिगावच्या लढाईत संताजीचा पुरता मोड. |
| एप्रिल - मे १६९७ | :संताजीस विपन्नावस्था. शंभुमहादेवाच्या डोंगरात आश्रय. |
| जुलै (पहिला आठवडा) | संताजीचा नागोजी मान्याकडून खून. |
| ९ जुलै, १६९७ | :नागोजीचे बादशहाकडून अभिनंदन. |
| फेब्रु. १६९८ | :नागोजी ब्रह्मपुरीच्या छावणीत बादशहास भेटतो. |
| १५ ऑगस्ट, १६९८ | :नागोजीस बादशहाकडून ७ लक्ष ७८ हजार दामाची जहागीर बहाल. |

***

# औरंगजेबास दहशत लावली !

"**मोंगलाचे घोडे पाण्यावर आले असता पाणी न पीत, त्यांस मोंगली लोकांनी म्हणावे जे पाण्यामध्ये धनाजी व संताजी दिसतो की काय ?** रात्री दिवसा कोणीकडून येतील, काय करतील असे केले. मोंगलाई फौजेत आठही प्रहर भय बाळगीत. पादशाहासि हे बघून आश्चर्य जाहले की...... हे मराठे आदमी नव्हत, भूतखाना आहे !"

**- बखरकार मल्हार रामराव चिटणीस**

"राजेश्री संताजी घोरपडे सेनापती लष्कर यासी - राजश्री छत्रपती स्वामी कर्नाटकात जाते समई तुम्हास या प्रांते (महाराष्ट्रात) ठेवून गेले होते. त्या समई इकडे गनिमाची धामधूम होऊन त्याने कुल देश व दुर्गं हस्तगत केली होती. राज्यामध्ये काही अर्थ उरला नव्हता. कुल मऱ्हाटे याही यांनी इमानास खता करून गनिमाकडे गेले. याही (संताजीने) राजश्रीच्या पायासी बहुतच एकनिष्ठा धरून इमानास खता न करिता जमाव करून सेख निजाम व सर्जाखान व रणमस्तखान व जानसारखान येसे उमदे वजीर बुडविले! जागाजागा गनिमास कोटगा घालून नेस्तनाबूद केला आणि देश सोडविला! **राज्य रक्षणतेच्या प्रसंगास असाधारण श्रम केले! औरंगजेबास दहशत लावली!"**

**- रामचंद्रपंत अमात्यांची सनद**

"समृद्ध शहरांवर हल्ला करून त्यांचा नाश करणे आणि नामांकित सेनानींवर तुटून पडणे यात संताजीची खूपच प्रसिद्धी झाली होती. ज्याला ज्याला म्हणून संताजीशी मुकाबला करण्याचा आणि लढण्याचा प्रसंग आला, त्याच्या त्याच्या नशिबी खालील तीनपैकी एक परिणाम ठेवलेला असे - एकतर तो मारला जाई किंवा जखमी होऊन संताजीच्या कैदेत सापडे किंवा त्याचा सपाटून पराजय होई आणि त्याचे सैन्य व बाजारबुणगे गारद होत. आपण जीवानिशी सुटलो हाच आपला पुनर्जन्म झाला, असे त्यास वाटे....युद्ध करण्यासाठी जिकडे जिकडे म्हणून तो नालायक आणि हलकट संताजी तयार होऊन जाई तिकडे तिकडे त्याचा मुकाबला करण्यास बादशहाच्या प्रतिष्ठित सरदारांपैकी एकही तयार होत नसे! **जगाला धडकी भरून सोडणारी फौज घेऊन तो कोठेही पोहोचला की नरव्याघ्राप्रमाणे असलेल्या अनुभवी योद्ध्यांची हृदयें कंपायमान होत!"**

**- खाफीखान - औरंगजेबाचा समकालीन चरित्रकार**

मराठीदेशा
FOUNDATION
www.marathidesha.org

9 788192 802879